श्री.

# ज्ञानेश्वर चरित्र आणि ज्ञानेश्वरी चर्चा



लेखकः--प्रो. शं. गो. वाळिंबे, एम्. ए.,
मराठीचे प्राध्यापक, होळकर कॉलेज, इंदूर.



प्रस्तावना लेखकः—प्रिन्सिपॉल शं. वा. दांडेकर, एम्. ए.,
सर परशुरामभाऊ कॉलेज, पुणें.



शालिवाहन शक, मार्गशीर्ष १८७२
ख्रिस्त शक, डिसेंबर १९५०

किंमत
रुपये साडे तीन

प्रकाशक—

श्री. मो. गो. वाळिंबे
मयूर एजन्सी,
१७०, रामबाग, इंदूर सिटी.







मुद्रक:—

१ श्री द. ह. ओक
श्रीनाथ प्रेस लि., इंदूर

२ 'दोन शब्द' व प्रस्तावना
पृष्ठें ५ ते १६ या करितां
म. ग. दाते,
विश्वदीपक मुद्रणालय,
२२, यशवंत रोड इंदूर.

श्री

ज्यांचें मजवरील मातृवत् प्रेम
मायभाषेच्या विशेष
अभ्यासास कारण
झालें
त्या

श्रीमंत हर हायनेस, अखंड सौभाग्यवती
मातोश्री महाराणी इंदिराबाई-
साहेब होळकर, इंदूर
यांना

श्रीनिवृत्ति जन्मतिथि,
माघ वद्य १, गुरुवार शके, १८७२
१७०, रामबाग, इंदूर.

सादर समर्पित
—शं. गो. वाळिंबे

श्री.

ज्यांच्या सात्त्विक सहानुभूतीमुळे लेखकाम उचित मार्गदर्शन होत असतें, त्या

**गुरुवर्य वा. वा. ठाकूर, बी. ए.,**

तथा

**श्रीयुत बा. मो. जोशी, कारखानदार**

यांना

आदरभावाचा अंजलि कृतज्ञतापूर्वक लेखक अर्पण करीत आहे.

श्री निवृत्ति जन्मतिथि,
माघ वद्य १ गुरुवार, शके १८७२
१७० रामबाग, इंदूर.

—शं. गो. वाळिंबे

# अनुक्रमणिका



सविस्तर अनुक्रम पुढे दिला असून कंसांतलि आंकडा पृष्ठांकाचा समजावा.

— इति —

# दोन शब्द.

भारतीय तत्त्वज्ञानांतील अद्वैत विद्येचें मराठी मूलपीठ म्हणजे ग्रंथराज ज्ञानेश्वरी होय, आणि श्री ज्ञानेश्वर हे महाराष्ट्र वाणीचे श्रीमदाद्यशंकराचार्य होत. ज्ञानेश्वरी ही त्रिवेणी होय. गूढ अध्यात्मानुभवाच्या गंगायमुनेला अभिजात काव्याची सरस्वती इथेच येऊन मिळते. आज सहाशें साठ वर्षे होऊन गेलीं, या त्रिवेणीच्या कांठीं होणारा मराठीचा पवित्र जयजयकार महाराष्ट्राच्या कोपऱ्या कोपऱ्यांतून निनादत आहे, आणि त्या निनादाचे वैभवशाली पडसाद महाराष्ट्राबाहेरच्या भाषाभगिनींच्या महालांतून मधून मधून उमटलेले आजही ऐकूं येतात. मराठी ज्ञानेश्वरीचें सुरस भाषांतर भारताच्या राष्ट्रभाषेंत--हिंदी- मध्ये जसें झालें आहे तसेंच तें बंगाली, कानडी, तामीळ, गुजराथी आदि भाषांतूनही झालेलें आहे. श्री बाबू रामचन्द्र वर्मा यांची **'हिन्दी ज्ञानेश्वरी'** श्री स्वामी अखंडानंदमहाराजांनी केलेलें गुजराथी भाषांतर आणि पंडित कोदंडराव यांनी केलेलें तामील भाषांतर हीं भाषांतरें त्या त्या भाषिकांत विशेष वाचलीं जातात. हिन्दी ज्ञानेश्वरीचें अखंड पारायण आवडीनें व भक्तीनें करणारे एक गृहस्थ इंदूरांतच असतात. ज्ञानेश्वरीचें अध्याया-अध्यायारंभीचें प्रास्ताविक विवेचन वगळून केवळ अध्यात्माचा अभ्यास या दृष्टीनें केलेलें श्री बॅरिस्टर मनु सुभेदारांचें Gita Explained by Dnyaneshwar Maharaj हें पुस्तक आंग्ल भाषिकांत बरेंच प्रशंसिलें

जातें. इंग्रजी भाषांतराने ज्ञानेश्वरीचा प्रसार भारतेतर भाषिकांत झालेला आहे परंतु त्यापेक्षा अधिक प्रसार ज्ञानेश्वरीच्या संस्कृत भाषांतराने होणें शक्य आहे हें लक्षांत घेऊन ज्ञानेश्वरीचा सुंदर व सुबोध गीर्वाण अनुवाद जथ संस्थानचे माजी न्यायाधीश श्री रावसाहेब अनंत विष्णु खासनीस, यांनी केलेला आहे. रावसाहेब खासनीसांच्या विदग्ध वाणीची प्रशंसा अनेकांनी केली असून त्यांना 'गीर्वाण-ज्ञानेश्वर' अशी उपाधि मिळाली आहे. जागतिक कीर्तीचे हिंदी विद्वान् प्रो. राधाकृष्णन् यांनी हा ग्रंथ आंध्र विद्यापीठाच्या अभ्यासक्रमांत नेमावयाचें ठरविलें असून पेकिंग विद्यापीठांतील एका चिनी प्राध्यापकांनी चिनी भाषेंत त्याचें रूपांतर करावयाचें ठरविलें आहे. केंब्रिज विद्यापीठांतील एक प्राध्यापक श्रीयुत एफ. आय. रॅप्सन यानींही गीर्वाण ज्ञानेश्वरीची मुक्तकंठाने प्रशंसा केली आहे, सारांश असा की 'केतकी गंधमाघ्राय स्वय-मायान्ति षट्पदाः' या न्यायाने ज्ञानेश्वरीचा अध्यात्म-काव्य-गंध देश-विदेशवासीयांना अधिकाधिक आकृष्ट करीत असून ज्ञानेश्व-रांच्या जोडीने ज्ञानेश्वरीच्या मूळ भाषेला—मराठीला-विश्वकीर्तीचें माहात्म्य प्राप्त होण्याचीं सुचिन्हें दिसूं लागलीं आहेत.

विश्वकीर्तीच्या या महात्म्यावर त्यांच्या भाषिकांनी अनेक ग्रंथ लिहिणें हें केवळ साहजीक होय. आदर, भक्ति तत्त्वग्रहण, वाङ्मयचिकित्सा अशा अनेक दृष्टींनी त्यांच्यावर वाक्सुमनें वाहलीं गेलीं, व त्यांना स्वतंत्र शास्त्र सांगणाऱ्या ऋषींचे स्थान

देऊन 'दर्शन' कार म्हणूनही गौरविण्यांत आलें आहे. किंबहुना त्यांच्यानंतर झालेल्या महाराष्ट्रांतील बहुसंख्य संतांनी आपल्या निर्मल, पवित्र वाणीने त्यांच्याच शिकवणीचा प्रपंच केला आहे. ज्ञानेश्वरांच्या एका संप्रदायाचे अनेक संप्रदायही झाले आणि ज्ञानेश्वरीच्या त्यांच्या त्यांच्या अधिकृत प्रतीही वेगळ्या समजण्यांत येऊं लागल्या. प्रत्येक संप्रदायांतून साक्षात्कारानुभवाच्या साध्या करितां निर्मळ अद्वैत भक्तीची तांत्रिक शिकवण दिली जात असली तरी कालांतराने साध्यापेक्षा साधनालाच वाजवीपेक्षा अधिक महत्त्व आलें, आणि विवेकयुक्त डोळस भक्तीऐवजी आंधळी श्रद्धा 'राणीव' करूं लागली. हाही काळ संपला आणि आता आंधळी श्रद्धा आणि डोळस भक्ति यांचे क्षेत्र रेखीव होऊन

वर म्हटल्या प्रमाणे अली कडील काळांत तत्त्वग्रहण, वाङ्मय-चिकित्सा या दृष्टींनी देखील आदर किंवा भक्तीच्या बरोबरीने ग्रंथ लिहिलें जाऊं लागले आहेत. अशा चिकित्सेमुळे श्री ज्ञाने-श्वर दर्शन यथार्थपणें होऊं शकेल हें उघड आहे. अलीकडील काळांत अध्यात्मशिक्षणाकरिता वाहिलेल्या कित्येक संस्था महाराष्ट्रांत आणि महाराष्ट्राबाहेर स्थापन झालेल्या आहेत आणि त्यांतून ज्ञानेश्वरांच्या ग्रंथांचा अभ्यास होत असतो. कित्येक संस्था तर केवळ ज्ञानेश्वर ग्रंथाध्ययनाकरिताच जन्माला आलेल्या आहेत. त्यांच्या नांवाने नियतकालिकें चालविणें हें ह्या काळांत सहज शक्य झालें आहे व तसें तें चाललेंही. गेल्यावर्षीच साऱ्या

महाराष्ट्रांत आणि महाराष्ट्रेतर मराठी भाषिकांच्या प्रांतांतून अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाच्या आदेशानुसार श्री ज्ञानेश्वरीचा अकरावा हीरक महोत्सव साजेशा थाटाने साजरा करण्यांत आला आहे. अकराव्या हीरक महोत्सवाच्या महान् पर्वाच्या निमित्ताने आपणही एक एकशेंअकरा दलांचे वाक्पुष्प भक्तिभावाने या वागीशाच्या चरणीं अर्पण करावें अशा बुद्धीने प्रस्तुत पुस्तकाचें लेखन करण्याचें लेखकाने योजिलें. ज्ञानेशाची कृपा आणि थोरांचा आशीर्वाद लाभल्याने हाती घेतलेले काम यथाशक्य पूर्ण झाले आहे

पुस्तकाचें स्वरूप प्रबंधात्मक असून प्रकरणवारीने विभागणी करण्याऐवजी ती परिच्छेदवारीने केली आहे एका परिच्छेदांतून दुसरा परिच्छेद आपोआप सुरू व्हावा आणि अखेरीस सर्व परिच्छेदांची जणु एक माळाच व्हावी अशी योजना या पद्धतीमागे होती, ती कितपत सफल झाली आहे तें सूज्ञ ठरवितीलच. परिच्छेदांना दिलेले मथळे आकर्षक किंवा अन्वर्थक ठेवण्याची दक्षता घेतली आहे. पहिले छप्पन परिच्छेद चरित्राला वाहिले असून पुढील तीन चतुर्थांश भाग ज्ञानेश्वरी-चर्चेस दिला आहे. विवेचन शक्य तो सुगम व्हावें, व चिकित्सा अनाग्रही पद्धतीने व्हावी, आणि एकंदर पुस्तक पूर्वग्रहनिरपेक्ष वाचकास माहितीपूर्ण व अभ्यासकास उद्बोधक व्हावें ह्या उद्देशाने हा प्रयत्न केला आहे. साधारणतः प्रत्येक विधान साधार

असून अभ्यासकांकरितां आधार किंवा संदर्भ दाखविणाऱ्या तळटीपा विपुल प्रमाणांत घातल्या आहेत. ज्ञानेश्वरचरित्र आणि ज्ञानेश्वरी चर्चा यांचीं विविध अंगें या प्रबंधांत आलेलीं आहेत. या विविध अंगांचीं शक्य तितकी अद्यावत् माहिती येथे होईल असा विश्वास वाटतो. कारण आजपावेतों एतद्विषयक झालेल्या संशोधनाचा शक्य तितका अधिक फायदा घेऊन हा प्रबंध लिहिला आहे. सर्वच संशोधनें, किंवा संशोधनांतीं निघालेले निष्कर्ष लेखकाला, महाराष्ट्रापासून दूर असलेल्या या ठिकाणीं प्राप्त झालेले नसल्यानें, किंवा त्यांचा परामर्ष घेणें शक्य न झाल्यानें ज्ञानेश्वरांचा संपूर्ण अभ्यास या ग्रंथांत येऊं शकला नाहीं याची लेखकास जाणीव आहे. ज्ञानेश्वरीविरहित ज्ञानेशाच्या इतर कृतींचा उल्लेख या पुस्तकांत आला असला तरी मुख्य चर्चा ज्ञानेश्वरी पुरतीच सीमित ठेवलेली आहे, त्यामुळेही अनेक उणीवा यांत राहिलेल्या आहेत याची सुद्धा लेखकास जाणीव आहे; म्हणून या प्रबंधांत आलेली माहिती, आणि केलेली चर्चा ही जिज्ञासु वाचकास कांही प्रमाणात कां होईना, उपयुक्त वाटली आणि अभ्यासकास त्याच प्रमाणांत कां होईना परंतु मार्गदर्शक ठरली तरी केल्या प्रयत्नाचें चीज झाल्याचें समाधान लेखकास लाभूं शकेल.

ज्ञानेश्वरीचें अध्ययन ज्या अनेक ग्रंथांवरून मला करावयास मिळालें त्या सर्व ग्रंथांच्या कर्त्यांचा मी आभारी आहें. 'ज्ञानेश्वर-

वैभव'कार श्री केशवदत्त महाराज यांचाही मी आभारी आहे. ज्ञानेश्वरीचें खरें रहस्य कळण्यास अधिकारी विद्वानाच्या मुखाने–किंबहुना गुरुमुखानें केलेलें श्रवण नितांत आवश्यक ठरतें-ह. भ. प. गु. प्राचार्य सोनोपंत दांडेकर यांच्या सारख्या संप्रदायश्रेष्ठ अधिकारी विभूतींचीं प्रवचनें ऐकावयास मिळाल्याने लेखकास प्रस्तुत पुस्तक लिहिण्याचा धीर येऊं शकला. प्रस्तुत पुस्तकाला त्यांनी प्रस्तावना लिहिण्याचें मान्य केल्याने त्यांचे ऋण दुपटीने वाढलें आहे. हें कृपाऋण, फेडण्याच्या पलीकडचें असल्याने केवळ उल्लेख करीत आहें. 'अशीच करुणा असो हरि कधी न भंगो पिता' एवढेंच मागणें आहे.

जत संस्थानचे माजी न्यायाधीश श्री. रावसाहेब अनंत विष्णु खासनीस यांच्या प्रत्यक्ष भेटीचा योग अचानक जुळून आला. यांच्याशीं केलेल्या चर्चेचा उपयोग अर्थातच झाला आहे. लेखक त्यांचा त्याबद्दल कृतज्ञ आहे. येथेच त्यांनी उल्लेखिलेल्या आणि इतरत्र ऐकलेल्या ज्ञानेश्वर चरित्र विषयक एका घटनेचा उल्लेख करणें योग्य होईल. प्रचलीत समजुतीप्रमाणे श्री ज्ञानेश्वरांनी शेवटीं समाधि घेऊन अवतार कार्य संपविलें असें आहे, परंतु ज्ञानेश्वरांनी घेतलेली ही समाधि आपणहून घेतलेली नसून तत्कालीन समाज-अध्वर्यूंनीं त्यांना ती घ्यावयास लावली, आणि त्यांना तसें करावयास भाग पाडल्यावर समाधि-स्थानांतून बाहेर येतां येऊं नये म्हणून त्यांनी एक शिळा त्या स्थानावर पक्की बस-

वून टाकली, अशी एक दंतकथा आहे. या दंतकथेचा अर्थ असा की तत्कालीन समाज धुरीणांनी ज्ञानेश्वरांचा 'साक्रेटीस' केला अशाच प्रकारची एक दंतकथा श्री संत तुकारामाबद्दलही प्रस्तुत लेखकाने देहू गांवांतच ऐकली होती. त्या कथेचें तात्पर्यही असेच होते की विरोधकांनी तुकारामाचा मागमूसही उरूं न देतां 'ते सदेह स्वर्गांत गेले' असा त्याचा गौरवपूर्ण प्रचार केला. अशा विरोधकांना 'ज्ञानेश्वरांनी जिवंत समाधि घेतली' किंवा 'तुकाराम विमानांत बसून सदेह वैकुंठास गेले' असे सांगून वास्तविक गौरव करावयाचा नसतो तर त्या त्या महात्म्याच्या मोठेपणाचें आपल्या फायद्या करिता Capital करावयाचें असतें. कारण मोठमोठ्या महात्म्यांच्या नांवाखाली कांही ना कांही सावळा गोंधळ नेहमीच चालतो. ही कार्यकारणपद्धति खरी वाटली तरी ज्ञानेश्वर तुकारामा नतर यांच्या आध्यात्मिक अधिकाराचा दुरुपयोग करणारी कोणी व्यक्ति इतिहासाला ज्ञात नसल्याने आणि अशा अमानुष घटना घडल्याचे बलवत्तर पुरावे पुढे येत नसल्याने अशा स्वरू-पाच्या दंतकथांवर विश्वास ठेवणें प्रस्तुत लेखकास अयुक्त वाटतें. ज्ञानेश्वरांचे वडील विठ्ठलपंत यांना देहत्याग करावा लागला व तो प्रसिद्ध आहे, असाच कांही प्रकार ज्ञानदेव-तुका-रामा संबधीं खरोखरच झाला असता तर तो गेल्या चार सहा शतकांत लपून राहता ना असो.

आभाराचें एक गोड काम करून प्रस्तुत दोन शब्दांतर्गत उपोद्घात संपवितो. आपल्या निरलस कार्यपद्धतीने, अक्षर

साहित्यसेवेने, आणि परोपकारी साधु-वृत्तीने प्रसिद्धिपराङ्मुख असतांनाही प्रसिद्धीस आलेले मध्यभारतांतील तीन वाङ्मय पुरुष, जणु येथील ब्रह्मा, विष्णु, महेश यांचा साभार उल्लेख केल्यावाचून हें निवेदन संपवितां येत नाही. प्राचार्य डॉ. ह. रा. उर्फ दादा साहेब दिवेकर प्राध्यापक ग. वा. उर्फ भाऊसाहेव कवीश्वर, आणि श्रीयुत वि. सी. उर्फ तात्या साहेब सरवटे यांचा प्रत्यक्षाप्रत्यक्ष संबंध आलेला नाही अशी मध्यभारतीय कृति सापडणें कठीण. फार वर्षांपूर्वी प्रस्तुत लेखकाने, कराचीला जाऊन, तेथील 'रविकिरण' ह्या नाणावलेल्या नियतकालिकाचें संपादकत्व स्वीकारलें आणि साहित्याच्या प्रांगणांत जाहीरपणे पहिलें पाऊल टाकलें तें श्रद्धेय तात्यांचा आशीर्वाद घेऊनच ! डॉक्टर साहेब येथील प्रत्येक चळवळीचे नांवाप्रमाणे प्रत्यक्ष 'दादा'च आहेत. त्यांचे मार्गदर्शन लाभल्याने प्रस्तुत पुस्तकाचें स्वरूप निश्चित करण्यांत आलें. भाऊसाहेबांचा जात्या अबोल स्वभाव माझ्या बाबतींत तरी अकृत्रिम बंधुभावामुळे बोलका झाला, व लेखन-मुद्रणांत त्यांच्याकडून वेळोवेळीं महत्त्वाच्या सूचना मिळत गेल्या. आपला अमूल्य वेळ खर्च करून हातीव आणि छापीव पानें त्यांनी नजरेखालून घातलीं आहेत. पुस्तकाच्या बरेपणाचें श्रेय पुष्कळ अंशीं त्यांनाच आहे. अशी प्रस्तुत लेखकाची समजूत आहे. इति।

१९-१२-१९५०<br>
'विश्रामभवन'<br>
१७०, रामबाग, इंदूर.

**शं. गो. वाळिंबे**

# —: प्रस्तावना :—

लेखकः प्रिन्सिपाल शं० वा० दांडेकर, एम्. ए.
( सर परशुरामभाऊ कॉलेज, पुणें. )

**'ज्ञानेश्वर चरित्र आणि ज्ञानेश्वरी चर्चा'** हा प्रा. वाळिंबे यांचा प्रबंध म्हणजे श्री. ज्ञानेश्वर व ज्ञानेश्वरी यांच्या अभ्यासकास एक उत्कृष्ट मार्गदर्शिका आहे. या निबंधाचे सांगतां येण्यासारखे असे खालील विशेष आहेत:- --

(१) हें पुस्तक लिहित असतां प्रा. वाळिंबे यांनीं ज्ञानदेव व ज्ञानदेवी या विषयावरील अद्ययावत् उपलब्ध असलेले इंग्रजी, मराठी वाङ्मय अभ्यासण्याचे श्रम घेतलेले आहेत. यामुळें या दोहों विषयीं काल्पर्यंत काय म्हटलें गेलें आहे या विषयीं अभ्यासूला विनासायास माहिती मिळण्याची सोय झाली आहे.

(२) दुसरा व महत्त्वाचा विशेष म्हणजे प्रा. वाळिंबे यांनी हे ज्ञानदेवी वाङ्मय व त्यावरील ग्रंथ निपुणपणानें पाहिले आहेत व त्या अभ्यासानें मिळवलेल्या माहितीचा उपयोग वेगवेगळ्या विषयांची चर्चा करतांना कुसरीने केला आहे.

(३) तिसरा विशेष म्हणजे चर्चा करित असतांना व विषयाच्या दोन्हीं बाजू मांडतांना शक्य तोंवर आपला समतोलपणा न

सोडण्याचा प्रयत्न केला आहे, व तो प्रयत्न चांगला साधला आहे असें म्हणण्यास बिलकूल हरकत नाहीं. एखाद दुसरा आळंदीच्या ब्रह्मावृंदासंबंधींच्या वर्णनासारखा प्रसंग असा दाखवता येईल कीं ज्या ठिकाणीं निष्कारणच कडक भाषा वापरली आहे कारण आजच्या कसोटीनें सहाशें वर्षांपूर्वीच्या ब्रम्हवृंदाकडे बघणें तितकें बरें होणार नाहीं. असा एखादा प्रसंग सोडल्यास चर्चेची भाषा सुद्धां विषयाच्या चर्चेस साजेशीच आहे.

(४) चौथा विशेष असा कीं या पुस्तकास निबंधाचें स्वरूप असल्यानें जरी यांत प्रकरणें नाहींत तरी यात शीर्षकें दिलीं आहेत व तीं चर्च्य विषयास अनुरूप, वाचकांची मनोभूमिका विषय ग्रहण करण्यास आगाऊ तयार करून ठेवणारी व आकर्षक अशीं आहेत.

(५) पाचवा विशेष म्हणजे संपूर्ण निबंधाची भाषा टसठशीत व चटकदार आहे. व विवेचन असंदिग्ध आहे.

(६) सहावा विशेष म्हणजे ज्ञानदेव व ज्ञानदेवी याबाबत चर्चिले जाणारे बहुतेक विषय या निबंधांत हाताळलेले आहेत.

इतके विशेष अथवा गुण दाखवल्यानंतर महत्त्वाचे नसले तरी आढळून येणारे एकदोन दोषहि दाखवणें अवश्य आहे.

पहिला दोष म्हणजे छपाई घाई घाईनें झाल्याने कांहीं मुद्रणाचे दोष राहून गेले आहेत.

दुसरा व महत्त्वाचा दोष असा की एक दोन ठिकाणीं मा बरोबर नाही. पण हा लेखकाचा दोष नसून त्याला मिळालेल्या माहितीचा आहे. उदाहरणार्थ पान ४९ वर ज्ञानेश्वरी नेवासें येथे मोहनीराजमंदिरांत लिहिली असा उल्लेख आहे तो बरोबर नाही मोहनीराजाचे मंदिर नेवाशांत आहे व ज्ञानेश्वरी नेवाशात लिहिली आहे हें खरें आहे. पण ज्ञानेश्वरी मोहनी-राजाच्या मंदिरात लिहिली हें विधान चुकीचें आहे. मोहनी-राजाच्या मंदीरापासून अर्ध्या मैलावर असणाऱ्या एका मंदीरांत ती लिहिली गेली. तें स्थान मध्यंतरीच्या काळांत मुसलमान आपली मशीद म्हणून बळकावून बसले होते. नेवासे येथील हिंदू, कै. नारायणराव गुंगाळ, कै. दादासाहेब करंदीकर प्रभृति मंडळींनीं हायकोर्टापर्यंत भांडून, ती जागा हिंदूंची आहे हें कोर्टांतून सिद्ध करून घेतलें आहे. व ज्या खांबाजवळ बसून ज्ञानेश्वरांनी ज्ञानेश्वरी तयार केली, असे सांगतात तो खांबही आज त्या मंदिरांत विद्यमान आहे. पण प्रो. वाळिंबे यांनीं प्रो. तुळपुळे वगैरेचीं जीं पुस्तकें वाचलीं त्यांतच चुकीची माहिती दिली आहे व म्हणून ती चूक या निबंधात ही हिराहिली आहे.

असाच दुसरा उल्लेख ज्ञानेश्वरांच्या समाधीचा. ब्राम्हणांनीं समाधि घेण्यास ज्ञानदेवांना भाग पाडलें असें कोणीच म्हणू शकत नाहीं व म्हणत नाही. तुकारामबावा संबधीं कांहीं ब्राह्मणे-तर वृत्तीचे लोक, ब्राह्मणांनी तुकारामबोवांचा खून केला असे

म्हणतात तरी ज्ञानदेवासंबंधी तसें म्हणतांना प्रस्तुत लेखकानें ऐकले नाही. व त्याचें कारणहि सरळ आहे. ज्ञानदेवांच्या समाधीचे अभंग समाधिकाळीं उपस्थित असणाऱ्या नामदेवांनीं रचले आहेत ते ज्ञानदेवांची समाधि म्हणून वारकऱ्यांत प्रसिद्ध आहेत व हजारों वारकरी त्यांचे रोज पारायण करीत आहेत. अशा स्थितींत ज्ञानदेवासंबंधी वार्ताच उठणें अशक्य !

येवढा उल्लेख करण्याचें कारण, या महत्त्वाच्या वार्तासंबंधी खुलासा करणें अवश्य वाटलें म्हणून !

प्रो. वाळिंबे यांनीं हें सुंदर पुस्तक लिहून ज्ञानदेव व ज्ञानदेवी यांच्या अभ्यासकांची चांगली सोय केली आहे. तिचा फायदा ज्ञानदेवांच्याविषयीं कुतूहल असणारा वर्ग घेईल अशी खात्री आहे.

माघ शु. १ शके १८७२ } शं. वा. दांडेकर.
पुण्यपत्तन.



श्री.

# ज्ञानेश्वर चरित्र आणि ज्ञानेश्वरी चर्चा



ज्ञानियांचा राजा गुरु महाराज ।
म्हणती ज्ञानदेव ऐसें तुम्हां ॥
ब्रह्मादिक जेथे तुम्हां वोळगणें ।
इतर तुळणें काय पुढे ॥
तुका म्हणे नेणें युक्तीची ती खोली ।
म्हणुनी ठेविली पायीं डोई ॥

## १. मराठीचे पुराणपुरुष.

मराठीचे पुराण पुरुष श्रीज्ञानदेव आणि ग्रंथराज श्रीज्ञानेश्वरी म्हणजे प्राचीन मराठी समाज आणि मराठी वाङ्मय यांतील क्रांतीचीं निशाणें होत. कर्मकांडांत सर्वस्व मानणारा तत्कालीन कर्मठ समाज, आपल्या आध्यात्मिक अधिकाराचा विचार न करता महान् कर्मयोगी ज्ञानेश्वरांच्या तीर्थरूपांना—श्री विठ्ठलपंतांना, अत्यंत कठोर असें देहान्त शासन करावयास सिद्ध झाला! ब्रह्मानंद सदृश भक्तिरसाचा घोट घेणाऱ्या साध्वी मिराबाईस कौटुंबिक रूढींच्या अपमानाचा आडपडदा घेऊन एकीकडे तिचेच स्वकीय विषाचा घोट घेण्याची आज्ञा देतात, तर दुसरीकडे गटबाजीच्या स्वार्थसिद्धीस्तव प्रखर बुद्धिनिष्ठा व डोळस सदसद्विवेक यांचा पूज्य पुरोहित साक्रेटिस यास नसते आरोप ठेवून तत्कालीन

अधिकारारूढ पक्ष दिवसाढवळ्या यमसदनास पाठवितो ! तिसरीकडे जगाला शांतीचा संदेश देणाऱ्या ईशपुत्रास खिळे-ठोक झालेली दिसते ! ! जगांत समाजाने फर्माविलेलीं किंवा लोकशाहींतील अधिकारारूढ शासकांनी आज्ञापिलेलीं सारींच शासनें न्यायतः नेहमीच कुठे बरोबर असतात ! आणि विद्यमान कलियुगांत नकली पक्षातीततेच्या पांढऱ्या बुरख्याआड थोर देवतांच्या, लोकसेवकांच्या वा त्यांच्या विचारवादांच्या नांवाखाली काळ्या घातपाताचा सावळा गोंधळ किती निष्ठुरपणे चालूं शकतो हें सांगावयास का पाहिजे ? म्हणूनच तेराव्या शतकांतील आळं-दीच्या असहिष्णु ब्रह्मवृंदाने भ्रामक रूढीला स्वतः बळी पडून मिथ्या लोकाचाराच्या वेदीवर धीमत् श्री विठ्ठलपंत आणि महासती सौ. रुक्मिणीदेवी यांना बळी दिलें याबद्दल आश्चर्य वाटत नाही, वाईट मात्र वाटतें. अपकृत्य केंव्हांही झालें असलें आणि त्याचे बरेवाईट परिणाम भोगणारा समाज वा व्यक्ति काळाच्या अतूट उतरणीवर फार पुढे, अगदी विस्मृतीच्याही पुढे निघून गेली तरी त्या अपकृत्याची विस्मृति होऊं शकत नाही, तें अपकृत्य म्हणजे तत्कालीन समाजाच्या मानभावीपणाचा मानदंड होय, व तो पाहूनच पश्चात्कालीन समाज आपल्या चुका सुधारूं शकतो, किंबहुना याच कारणाने अशा कृत्यांची नोंद कालपुरुष इतिहासाच्या शिला-स्तंभावर अत्युच्च भागीं करवितो. ज्ञानेश्वरांच्या कुटुंबाची ऐहिकदृष्ट्या झालेली वाताहत कालपुरुषाने इतिहासाच्या स्मृतिशिलेवर अशीच कोरून ठेविली आहे. तेराव्या शतका

पावेतों बऱ्हंशीं अकल्प वाटलेल्या लोकविलक्षण योगायोगाने जन्माला आलेली, प्रतिकूल आणि परित्यक्त परिस्थितींत वाढलेली, ब्रह्मकुलांतील जन्मप्राप्त अधिकारालाच काय पण संस्कारालाही पारखीं झालेलीं आणि पारखीं होऊन कोरान्नालाही महाग झालेलीं हीं ज्ञानदेवादि भावंडें आपल्या वयाची पंचविशीही धड उलटण्या पूर्वींच अभूतपूर्व चमत्कार करून नंतरच्या पिढीस मननदर्शनाने पुनीत होण्याकरिता आपली अक्षर वाङ्मयी मूर्ति मागे ठेवून निघून गेलीं.

## २. 'आई'ची साद

धर्मसंस्थापनेस्तव युगांयुगांतून संभवणाऱ्या श्री भगवान् कृष्णाचा अवतार म्हणून या युगपुरुषास महाराष्ट्रोन संबोधलें, आणि त्याच्या ग्रंथराजास सांप्रदायिकांनी विश्वप्रेमाची पूर्तीच अशा 'आई' या नितांत प्रेमळ नांवाने साद दिली तर त्यांत नवल कसलें. लोकोत्तर व्यक्तित्वाच्या ह्या दिव्य मंदिराची घडण कसकशी होत गेली आणि असामान्य कर्तृत्वाच्या शिवलिंगाची प्रतिष्ठापना त्यांत कशी झाली हें क्रमाक्रमाने बघूं या.

## ३. संतचरित्रें जुळविण्यांतील अडचणी; पुरेशा साधनांची उणीव.

ज्ञानेशादि प्राचीन संताबद्दल निश्चित आणि विस्तृत अशी अधिकृत माहिती उपलब्ध नाही हें सांगणें मराठीच्या अभि-

मानाला थोडें अवघड वाटत असलें तरी ती वस्तुस्थिति आहे, आणि भाषेच्या आणि भाषाप्रभूंच्या अभ्यासकाला या वस्तुस्थितीचीं कारणें देऊनच आपलें समाधान करून घ्यावें लागतें. ऐहिक गोष्टींना कवडीचीही किंमत न देणाऱ्या किंवा ‘ अवघें विश्वचि म.झें घर’ असें म्हणत म्हणत प्रामाणिकपणाने विश्वरूपत्व पावणाऱ्या ह्या संतांना ‘ स्व ’ बद्दल कांहीच बोलावेंसें वाटत नसे आणि त्यामुळेच प्राचीन संतवाङ्मयांतून ‘ स्व ’ चरित्र किंवा ‘ आत्म ’ चरित्राची उणीव नेहमीच दिसून येते. एवढेच काय पण स्वतंत्र चरित्राच्या ऐवजी लेखनांतून तरी ‘ स्व ’ बद्दल म्हणावें तर तेथेही निराशाच पदरीं पडते, सहज ओघाने आलेले त्रोटक उल्लेख आणि तत्कालीन राज्य, समाज, संस्कृति, परिस्थिति, प्रसंग इत्यादि विषयक प्रत्यक्षाप्रत्यक्ष वर्णन, लेखकाची भाषा, तिचा ढौल, आणि ग्रंथाची शिस्त म्हणून लेखनांतीं करावयाच्या स्वनामाचा, पितराचा किंवा गुरूचा आणि शक्यतर पितृवंश वा गुरूवंशाचा नामनिर्देश, समाप्तिस्थल, समाप्तिकाळ, यांची सूचना यांतून मिळणाऱ्या तुटपुंज्या साधनसामुग्रीवरच समाधान मानावयाची पाळी येते.[1] कित्येकवेळा तर ही सामुग्रीही फसवी असते कारण कांही कवींच्या कालनिर्देशांतील तपशीलातच [ वार, तिथि, नक्षत्र, संवत्सरनाम आणि शक किंवा संवत्

१. कांहीं ग्रंथकार तर शिस्त म्हणून सांगितलेल्या बाबींतही कांहीं उल्लेख वैकल्पिक ( optional) म्हणून वगळतात तेव्हां तर पंचाइतच होते !

यांतच ] मेळ बसत नाहीं ! ! कधी लेखक स्थलाचा वा कालाचा उल्लेख करीत नाही. कधी भाषेकडे पाहतांना ज्या कालांतील ग्रंथ असावा अशी खात्री असते त्या काळापेक्षा ती आधुनिक ठरते आणि इतर प्रमाणें नसलीं तर ग्रंथाचा उल्लेखित काळच प्रक्षिप्त असावा की काय अशी शंका येते.[२] कधी एकाच ग्रंथकाराच्या दोन कृतींतील भाषा किंवा भाषासंरणी व रचनापद्धति इतकी वेगळी दिसते की ग्रंथकाराच्या एकाव्यक्तित्वाचाच संशय येऊं लागतो ! ! [३] कधी भिन्न ठिकाणीं भिन्न परंपरा दिसते,[४] व परंपरा जमली तर कर्त्याचें नांव स्वतःच्या ऐवजी दुसऱ्याचें घातल्याचेंही उदाहरण सापडतें ![५]

---

२. उदाहरणार्थ मराठीचा आदि कवि मुकुंदराज आणि त्याचा विवेकसिंधु.

३. उदाहरणार्थ अभंगकार ज्ञानेश्वर व ज्ञानदेवीकार ज्ञानेश्वर ह्या दोन व्यक्ति असाव्यात असा वाद, किंवा यथार्थ दीपिकाकार वामनपंडित व श्लोकात्मक रचना करणारा वामन पंडित ह्या दोन व्यक्ति असाव्यात हा वाद.

४. श्रीसंत निळोबा आणि बहिणाबाई यांनी संत तुकारामाच्या दोन भिन्न गुरुपरंपरा दिल्या आहेत. पहा— 'पांगारकरकृत श्रीतुकारामचरित्र 'चार गुरुपरंपरा' पृ. २२३ ते २३२

५. महानुभावीय कवि पंडित दामोदर व केशव पंडित यांनी परस्परांचीं नांवें आप आपल्या काव्यांत घातलीं आहेत.

## ४ ज्ञानेश्वरींतील उल्लेख.

खुद्द ज्ञानेश्वरीकडे पाहतां वरील बाबतींत कांही बरा अनुभव येत नाही. ज्ञानेश्वरांच्या हातची स्वकालनिर्देशाची ओवी कोणत्याही उपलब्ध प्रतींत मुळींच नाही ! 'शके बाराशतें बारोत्तरें' ही समाप्तीची ओवी ज्ञानेशांची नाही ह्याबद्दल विद्वानांत एकमत आहे. ज्ञानेश्वरांनी काल निर्देश मुळींच केला नाही असें नाही परंतु तो "**ऐसें युगीं वरि कली....**" ज्ञा. १८-१७८१ असा मोघम आहे. त्यांनी "इंदुवंश विलासु" अशा "**श्रीरामचंद्रु**" म्हणजे रामदेवराव यादवाचा उल्लेख तत्कालीन "**क्षितिशु**" म्हणून १८-१७८३ मध्यें केला आहे आणि त्या पूर्वीच्या दोन ओव्यांतून " महाराष्ट्र मंडळांत गोदावरीच्या दक्षिण भागांत '**श्री महालया**' च्या **अनादि क्षेत्रांत** [ मोहिनी राजाचें प्रसिद्ध मंदीर असलेल्या नेवासें गांवीं ] असा स्थल निर्देश केला आहे.

ज्ञानेश्वरींतील '**तेथ आशा धूमें सांडिलीं पांचै कुंडें** ॥ ४-१२० ॥ या उल्लेखावरून पांच कुंडें ठेवणाऱ्या अग्निहोत्री कुलांत ज्ञानेश्वरांचा जन्म झाल्याचें अनुमान आणि 'ष' चा 'ख' आणि 'य' चा 'ज' असा उच्चार करण्याकडील प्रवृत्तीवरून ते यजुर्वेदी असावेत असें दुसरें अनुमान, अशीं दोन अनुमानें काढण्यांत येतात. [६] "**माहेषान्वय संभूतें**"

६. पहा—ग. कृ. आगाशे कृत ज्ञानश्वरी टिका उपसंहार पृ. ३१

[ ज्ञा. १८-१७८४ ] या उल्लेखावरून त्यांचें आडनांव 'म्हैसें' किंवा 'महिषे' असावें असाही एक तर्क आहे. [७] देशस्थ यजुर्वेदीयांत असें नांव नाही आणि 'माहेषान्वय' चा अर्थ नाथ परंपरेचा मूळ पुरुष 'आदिनाथ'=महेश=शंकर=त्याचा अन्वित असा आहे, त्यामुळे हा तर्क खरा ठरत नाही. असो. सारांश असा की स्वचरित्राची माहिती खुद्द संतांकडून फारशी मिळत नाही, [८] जी मिळते ती प्रथम घेऊन समकालीन किंवा निकट उत्तरकालीन संतांनी किंवा लेखकांनी भक्तिभावाने टिपून ठेवलेल्या माहितीची भर घालून आज तागायत चालत आलेल्या दंतकथांची विश्वसनीयता पारखून घेऊन संतचरित्रकारास आपलें चरित्र सजवावें लागतें. हें काम वाटतें तितकें सोपे नाही संतचरित्राची जुळवाजुळव हा एक स्वतंत्र अभ्यास झालेला आहे. आणि याकरिता संतांवरील अढळ परंतु डोळस श्रद्धा, शास्त्रीय चिकित्सेची प्रवृत्ति, संशोधनाची आवड आणि संशोधन करूं शकण्याइतपत अभ्यास नि विद्वत्ता यांची आवश्यकता असते. या गुणांच्या आयुधांनी सुसज्जित होऊन प्रसिद्धिपराङ्मुख संतांच्या चरित्रांचें बहुरंगी संशोधन अलीकडील काळांत हरिभक्त

---

७. पहा सदर पृ. ३९ किंवा वि. ल. भावे कृत 'महाराष्ट्र सारस्वत'

८. यास संत तुकारामाचा अपवाद आहे. कारण आत्मचरित्र सांगण्याचा उद्देश नसतांनाही त्यांच्या अभंगावरून पुष्कळसें वृत्त कळतें.

परायण कै. पांगारकरांनी केलें. त्यांनी त्यांच्या पूर्वीच्या शोधकांच्या प्रयत्नांचाही भरपूर उपयोग करून घेतला होता. मराठींत पांगारकरांच्या नंतर त्यांच्या उद्योगांत महत्त्वाची भर घालणारा समानशील संशोधक अद्याप निपजावयाचा आहे. ज्ञानेश्वरांच्या चरित्रास त्यांचे समकालीन संत नामदेव यांचे ' आदि ' चे अभंग आणि कांही संतचरित्रकार यांनी लिहून ठेवलेलीं चरित्रें यांचा मुख्यत्वें उपयोग होतो. कुलवंशाची माहिती जुन्या ताम्रपत्रावरून मिळते. एकंदर उपलब्ध माहिती थोडी आहे व ती संक्षेपाने पुढे दिली आहे.

## ५. कुलवृत्तांत व ज्ञानेशांच्या माता पितरांचा पहिला गृहस्थाश्रम.

श्री ज्ञानेश्वरांचे पणजे त्र्यंबकपंत म्हणून होते. या कुलांत माहित असलेले पहिले भगवद्भक्त तेच होत. त्यांचे पणजे हरिहर पंत कुळकर्णी शके १०६० च्या सुमारास आपेगांवचे कुळकर्ण पाहात. दक्षिणची काशी जें पैठण शहर त्याच्यापासून ४ मैलावर गोदावरीच्या उत्तर तीरीं हें आपेगांव वसलेलें होतें. शके ११२९ तील एका राजाज्ञापत्रका वरुन[९] त्र्यंबकपंत बीड देशीं देशाधिकारी होते असें कळतें यांच्या हरिपंत नांवाच्या पुत्राने तरवार गाजविली. तो धारातीर्थीपतन पावल्यामुळे[१०] विरक्त

९. पहा–श्री. ज्ञानेश्वर चरित्र–पांगारकर पृ. ३०

१० पहा–सदर पृ ३१

म्हणून उदास झालेले त्र्यंबकपंत परत आपेगांवीं आले. यांचे चिरंजीव गोविंदपंत आणि सून निराबाई. यांचे चिरंजीव विठ्ठल-पंत. हेच ज्ञानेश्वरांचे वडील होत. ज्ञानेश्वरांच्या आईचे नांव रुक्मिणी. हीं निकट पूर्वजांचीं नांवें देण्याचा उद्देश असा की द्विजत्वप्राप्तीच्या अभावीं ज्या नाथसंप्रदायांत श्री निवृत्तीमुळे हीं भावंडें शिरलीं त्या संप्रदायाचा संबंध या आपेगांवकर कुळकर्णी वंशाशीं फार जुना होता हें लक्षांत यावें, कारण गोविंदपंत व निराबाई यांना प्रसिध्द गोरखनाथाचे शिष्य गहिनी किंवा गैनी-नाथ यांजपासून ब्रह्मोपदेश झाला होता, एवढेंच नव्हे तर एका आख्यायिकेनुसार गैनीनाथांनी झोळींतून काढून दिलेल्या रक्षा-प्रसादाने निराबाईस राहिलेला गर्भ म्हणजेच विठ्ठलपंत होय.[११] याच गैनीनाथांनी पुढच्या काळांत श्रीनिवृत्तीला बोध केल्याचा उल्लेख खुद्द ज्ञानेश्वरींत आढळतो.[१२] ' डोळस वैराग्याची मूर्ति ' असे विठ्ठलपंत अल्पकाळांत वेदशास्त्राध्ययन संपवून तीर्थाटणास गेले आणि पश्चिमेकडील द्वारका, प्रभास इत्यादि तीर्थें करून परत दक्षिणेंत आले. दक्षिणेंतील तीर्थें करीत करीत विठ्ठलपंतांनी एका महान पर्वकाळीं श्रीक्षेत्र आळंदीच्या परिसरांत इंद्रायणीच्या पवित्र घाटावर पहिलें पाऊल ठेविलें. तो क्षण किती महत्वाचा होता ! त्या एका क्षणाच्या पोटांत भविष्याचें भाग्य सांठविलेलें होतें !

---

११ पहा–सदर पृ ९२

१२ पहा–गुरुपरंपरेच्या ओव्या ज्ञा. १८ वा अध्याय

या भाग्याचे नाट्यपूर्ण वर्णन आपल्या प्रासादिक वाणीने ह. भ. प. पांगारकरांनी केलें आहे.[१३] 'दुरिताचें तिमिर' नाहीसें करण्याकरिता 'स्वधर्म सूर्या'ची प्रभा फाकण्याची शक्यता ज्या क्षणाने निर्माण केली तो क्षण महान् पर्वकाळच नव्हे काय ? सिद्धेश्वराच्या देवळांत उतरलेला हा शुध्दशील अतिथि भावी सासऱ्याच्या घरीं गेला आणि पंधरवडा लोटला नाही तोच उभयपक्षीं दैवी दृष्टांत होऊन दैवघटित शुभमंगल व्हावयाचें ठरलें व नंतर लवकरच तें झालें ही. स्वप्नांत झालेल्या दृष्टांतांत "या कन्येचा स्वीकार कर, हिच्या पोटीं देव अवतरून विश्वोद्धार करतील" असा दिव्य संदेश असल्याने एरवी विरक्त असलेल्या भाविक विठ्ठलाने लग्नास संमति दिली असावी. लग्नानंतर विठ्ठल-पंताने भार्येसह आपेगांवीं जाऊन पुत्र वियोगाने हळहळणाऱ्या वृद्ध माता पित्याचें दर्शन घेतले आणि त्यांचा गृहस्थाश्रम सुरू झाला.

## ६. विठ्ठलपंताचें वैराग्य, संन्यास दीक्षा, व दुसरा गृहस्थाश्रम.

वास्तविक विठ्ठलपंत लहानपणापासूनच अत्यंत विरक्त होते. तारुण्यांतही यौवनाचा उपभोग घेण्याची तीव्र लालसा त्यांच्या ठिकाणी मुळांतच नव्हती. संसाराची पहिलीवहिलीं वर्षे नाविन्याने किंवा दृष्टान्तांतील आशेने थोडी बहुत बरीं गेलीं

---

१३ पहा ज्ञानेश्वर चरित्र पृ. ३४–३५.

परंतु पुढे मातापितरांचा वियोग, आणि अपत्यजन्माबद्दल निराशा यांमुळे विठ्ठलपंतांचें मन संसारास पूर्ण विटलें. पूर्वी संन्यासास परवानगी न देणाऱ्या रुक्मिणीनें एक दिवस दुश्चित्तावस्थेंत रागानें 'हो' म्हटलें आणि पडत्या फळाची आज्ञा घेऊन विठ्ठलपंत खरोखरीच घरांतून बाहेर पडले व काशीस जाऊन तेथील रामानंद यतीकडून (कांही प्रतींत श्रीपाद स्वामी हें नांव आहे) 'मला स्त्री पुत्रादिकांचा पाश नाहीं' असें खोटेंच सांगून संन्यासदीक्षा घेतली. नांव चैतन्याश्रम ठेवण्यांत आलें. चैतन्याश्रमाचें बेंड पुढे त्यांचे गुरु एकदा फिरत फिरत आळंदीस आले असतांना फुटलें, आणि क्रुद्ध होऊन त्यांनी चैतन्याश्रमास परत गृहस्थाश्रमांत जावयास भाग पाडलें. गुर्वाज्ञा म्हणून चैतन्य गृहस्थ झाला ह्या घटनेंतच भावी कथाबीजें आहेत. संन्याशाचा संसार ही घटनाच मुळीं लोकविरुद्ध होती. धर्माचे ठेकेदार ब्राह्मण यांनी तर या संसारास मान्यता दिली नाहीच, उलट या संन्याशाच्या घरांत जेव्हा निवृत्ति, ज्ञानदेव, सोपान, मुक्ता, हीं बालकें खेळूं लागलीं तेव्हां ब्रह्मवृंदाचा राग विकोपाला गेला असला पाहिजे.

## ७. जन्म आणि जन्मकाल.

चारही भावंडांचें जन्मस्थान आपेगांव हेंच असावें अशी समजूत आहे. पण जन्मशकाबद्दल दोन मतें आहेत. कारण

जनाबाईच्या एका अभंगांत 'त्र्याण्णवाचे शकीं ज्ञानदेव प्रकटेल' असा ११९३ चा तर तिच्याच दुसऱ्या एका अभंगांत 'सत्याण्णवाचे सालीं ज्ञानदेव जाले',-असा ११९७ चाउल्लेख आहे. दुसऱ्या उल्लेखांतील 'सालीं' ह्या फारशी शद्वावरून त्याचें महत्व कमी होत असलें तरी नामदेव, विसोबा खेचर, सच्चिदानंद बाबा यांचे अभंग आणि परंपरित समजूत यांचा आधार असल्याने उत्तर शक अधिक विश्वसनीय आहे. दोन्हीं मतें अशी:—

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १ लें मत | निवृत्तिनाथ | जन्मशक | ११९० | श्री. भावे, प्रा. दांडेकर प्रा. पारसनीस श्री. मोडक प्रा. रा. द. रानडे इत्यादिकांना मान्य मत |
| | ज्ञानदेव | ,, | ११९३ | |
| | सोपानदेव | ,, | ११९६ | |
| | मुक्ताबाई | ,, | ११९९ | |
| २ रें मत | निवृत्तिनाथ | जन्म शक | ११९५ | श्री. पांगारकर, श्री. भिडे श्री. न. चिं. कळकर इत्यादिकांना मान्यमत. |
| | ज्ञानदेव | ,, | ११९७ | |
| | सोपानदेव | ,, | ११९९ | |
| | मुक्ताबाई | ,, | १२०१ | |

ज्ञानेश्वरांचा जन्म श्रावण वद्य ८ म्हणजे गोकुळाष्टमीच्याच दिवशीं रात्रीं १२ वाजतां झाला अशी रूढ समजूत आहे, व त्यामुळे त्यांना भाविक लोक कृष्णाचा अवतार समजतात.

## ८ बहिष्कार बहिष्कृतांचा अलौकिक त्याग, अशास्त्रीय 'शास्त्राज्ञा' व देहांत प्रायश्चित्त.

वर सांगितल्याप्रमाणे ब्राह्मणादींचा राग विकोपाला गेलेला

होता. विठ्ठलपंतांचे आप्त त्यांना परके झाले, त्यांच्याशीं व्यवहार निषिद्ध झाला, केवळ ब्राह्मणांच्या जातीने त्याना बहिष्कृत केलें असें नव्हे तर ब्राह्मण जातीच्या पारमार्थिक कृपेच्या मक्तेदारीपुढे मान लवविणाऱ्या महार कुंभारादि जातींनीही त्यांना दया दाखविली नाही. घरांत वापरावयाला कुंभाराकडून गाडगें मिळावयाचीही पंचाईत [14] या कुटुंबाला पडण्याइतका हा बहिष्कार कडक होता. विठ्ठलपंतांनी गृहस्थाश्रम स्वीकारला तो कांही संन्यास झेपेना म्हणून नव्हे तर गुर्वाज्ञेने, आणि तीही गुर्वाज्ञा कां, तर पत्नीला झालेल्या अन्यायाचें प्रायश्चित्त म्हणून. अर्थात पत्नीला झालेला अन्याय धुवून काढण्यांत विठ्ठलपंतांनी साऱ्या जगाची परवा केली नाही आणि पत्नीला स्वीकारलें, तिचा त्याग केला नाही. हा त्याग अलौकिक होता यांत संशयच नाही. विवाहित आणि त्यांतही पुनरूढा (!) पत्नीचा त्याग करण्यापेक्षा विश्वविजयी साम्राज्याचा सम्राट होण्याचा मान सोडून देण्यांत ब्रिटिशांचा राजा आठवा एडवर्ड याने केवळ मोहाचें प्रदर्शन केलें असें म्हणतां येणार नाही. शुध्द प्रेमाकरिता कां होईना त्याने केलेला त्याग हा अपूर्व त्याग होय. त्या त्यागांत माणुसकी होती. विठ्ठलपंतांच्या

---

१४ पहा पांगारकर कृत ज्ञानेश्वर चरित्र पृष्ठ ९४. कुंभारानें गाडगें न देण्याची गोष्ट पुढे पैठणास घडली असली तरी त्या गोष्टीवरून आळंदी किंवा पैठण किंवा आपेगांव येथे या कुटुंबाला कोणत्या परिस्थितींतून जावें लागलें असेल तें ध्यानांत येतें म्हणून येथे उल्लेख केला आहे.

त्यागांत तीच माणुसकी होती. प्रा. आळतेकर लिहितात, "शास्त्र[15] लोकांच्या बाजूला होतें, माणुसकी विठ्ठलपंतांच्या बाजूला होती. जरी शास्त्र सामान्यपणे माणुसकीच्या संरक्षणासाठी निर्माण होत असतें तरी अशा कांही परिस्थिति निर्माण होतात की त्यांत शास्त्र व माणुसकी यांच्यात विरोध येतो. अशावेळीं शास्त्राचा त्याग करून माणुसकीची कास धरावी लागते"[16] ही कास तत्कालीन ब्रह्मवृंदाने धरली नाही; उलट त्यांनी प्रायश्चितार्थ याचना करणाऱ्या विठ्ठलास शिक्षा सांगितली. ही शिक्षा पुढील अभंगांत दिली आहे.

पाहती ग्रंथ सभाश्रेष्ठ महाजन । वैदिकशास्त्रज्ञ पुण्यश्लोक ।
देहान्त प्रायश्चित असे या बोलिले ।

यांतील 'वैदिक शास्त्रज्ञ' व 'ग्रंथ पाहती' हे दोन उल्लेख

---

१५ हे शास्त्रही लोकांच्या बाजूला नव्हतेंच. श्री. वेदान्त वागीश, महामहोपाध्याय श्रीधरशास्त्री पाठक यांनी ज्ञानेश्वरांची 'पितृतः शुद्धि व धर्म शास्त्र' या आपल्या 'श्री ज्ञानेश्वर दर्शन' मधील लेखांत मिताक्षरेंतील उतारे देऊन, पराशरस्मृति, धर्मसिंधु आदि ग्रंथांच्या आधारें देहान्त प्रायश्चित्त देणें हें अशास्त्रीय होतें, सहा महिने कृच्छ्रें करून जातकर्म संस्कारांनी शुद्ध होऊन संन्याशास गृहस्थ होतां येणें शक्य होतें, असें सिद्ध केलें आहे. तसेंच पुढे पैठणासही ब्रह्मवृंदाने ज्ञानेश्वरादिकांना शुद्धिपत्र दिल्याचा पुरावा अपुरा कसा आहे तेंही दाखविलें आहे. पहा ज्ञानेश्वर दर्शन भा. ला दर्शन प्रवेश पृ २० ते ३९

१६ पहा-प्रो. मा. दा. आळतेकर कृत श्री ज्ञानदेव पृ. ३०.

महत्वाचे आहेत. कारण विचक्षण बुद्धीस हे उल्लेख फसवे वाटतात.[१७] तरीही एवढें खरें की ब्राह्मणांची आज्ञा शिरसावंद्य मानून विठ्ठलपंतांनी प्रयागीं जाऊन आपला देह गंगार्पण केला व सती रुक्मिणीने पतीचेंच अनुकरण केलें.

## ९. पोरकेपण व शुद्धिपत्राची याचना.

मुलांचे लाड पुरविण्याचे तर राहोच, परंतु त्यांचे मौंजी बंधनादि आवश्यक संस्कार करण्याचेंही भाग्य मातापित्यांना लाभलें नाही. परंतु एवढ्यावर ज्ञानेश्वरादि भावंडांचें दुर्दैव थोडेच संपले होतें ! निवृत्ति, ज्ञानदेवांनी कोरान्न मागावें, आणि धाकट्या मुक्तेला सांभाळीत सोपानाने घरीं बसून रहावें, असे कांही दिवस गेल्यावर आळंदीच्या ब्राह्मण वर्गाच्या आज्ञेनुसार एक पत्र घेऊन ही भावंडें पैठणास आलीं व तेथील ब्रह्मवृंदाजवळ शुद्धिपत्र मागूं लागलीं.

## १० शुद्धिपत्राचें कारण—'यद्यदाचरति श्रेष्ठः.... आणि 'लोकसंग्रह'

वास्तविक, विश्वाला विशुद्ध करुं शकण्याइतकें पावित्र्य व ब्रह्मतेज, ज्यांच्या अंगीं त्या ज्ञानदेवादिकांना शुद्धिपत्राची जरूरच नव्हती. परंतु 'यद्यदाचरति श्रेष्ठस्तत्तदेवेतरोजनः ।। गीता ३-२१ ।।

---

१७ पहा मागे टीप क्रमांक १५

वर भाष्य सांगणाऱ्या ज्ञानदेवांना, लोकांना मार्ग दाखवून द्यावयाचा होता, **लोक-संग्रह**[१८] करावयाचा होता, विधि-निषेधाच्या पलीकडे पावलेल्या ज्ञानेश्वरांना सामान्य जनांना विधि-निषेधाची दृष्टि द्यावयाची होती. लौकिक दृष्ट्या, लोक समुदायास एकत्र आणणें, व त्यांचें आराधन करून त्यांना सत्कार्यास उद्युक्त करणें या लवचिक अर्थाने नव्हे, तर 'सकळ लोकसंस्था' [ Society ] 'रक्षणीय सर्वथा म्हणवूनिया' किंवा 'लोकस्थिति आघवी' 'नासिली' होऊं न द्यावी या व्यापक अर्थाने संन्याशालाही 'लोक-संग्रह' करावा लागतो

---

१८ गोपाळ ज्याप्रमाणे आपल्या धेनु—वासरादिकांना नुसतेंच सांभाळून नेत नाही तर त्यांच्यांत परस्पर सहकार्य वाढवून-एकमेकांना शिंगाने ढुशीही देण्याची पाळी न येऊं देतां सर्व एकाच दिशेने, ध्येयाने जातील व कळप मोडणार नाही अशी काळजी घेतो, त्याप्रमाणे समाजांतील व्यक्तींना एकत्र जमवून त्यांच्यांत सलोखा व सहभाव निर्माण करणें, विधि-अविधी मार्गांचें दर्शन करवून युक्त मार्गाने जाण्यासच सर्वांना प्रवृत्त करणें हा व्यापक अर्थ 'लोकसंग्रह' या शद्बांत आहे. त्या व्यापक अर्थानेच. लोकसंग्रह ' असा शद्ब, 'लोक संग्रहमेवापि संपश्यन्कर्तुमर्हसि ॥ ३-२० गीता ॥ किंवा 'कुर्याद्विद्वांस्तथासक्तश्चिकीर्षुर्लोकसंग्रहम् ॥ ३-२५ गीता ॥ इत्यादि ठिकाणीं भगवान् वापरतात, आणि या अर्थाचें विवरण श्रीमदाद्यशंकराचार्यांनी 'लोकस्योन्मार्ग प्रवृत्तिनिवारणम् या व्याख्येंत केलेलें आहे. इत्यादि बहुमोल विवेचन शके १८७१ च्या श्री गीताजयंतीच्या महोत्सवांत इंदूर येथे डॉ ह. रा. दिवेकर यांनी आपल्या भाषणांत केलें होतें. समग्र भाषण छापील स्वरूपांत जनतेपुढे येणें आवश्यक वाटतें.

म्हणून योग्यानेही कर्म सोडूं नये, उलट 'विशेषें आचरावें' आणि पुढे 'विश्व मोहरे लावावे' अशी शिकवण त्यांना द्यावयाची होती यास्तव—

अविधि आचरण परम दूषण । वेदो नारायण बोलियेला ॥
स्वधर्म अधिकार जाति परत्वभेद । उचित तें शुद्ध ज्याचें तया ॥
म्हणोनियां संतीं अवश्य आचरावें । जना दाखवावें वर्तोनियां ॥

असें म्हणून अगोदरच स्वस्वरूप पावल्याने शुद्धिपत्राची पर्वा न ठेवणाऱ्या निवृत्तीस ज्ञानदेवाने शुद्धिपत्र मिळविण्याकरिता मुद्दाम बरोबर नेलें होते.

## ११ लोकोत्तरांची लोकनिंदा आणि शुद्धिपत्राचा वाद.

तत्कालीन महाराष्ट्रांत ज्ञानदेवादिकांच्या जन्मापूर्वीच आपेगांवकर कुळकर्ण्यांच्या हकीकतीस संन्याशाचा संसार म्हणून प्रसिद्ध मिळालेली असणें शक्य आहे. अर्थात् अशा कुटुंबाला बहिष्कृत केल्याने 'कर्तव्य' केल्याचा आनंद मिळविलेल्या आळंदीकरांनी मुलांच्या मुंजी करण्याचे नाकारणें साहजिक होतें. परंतु सर्वच दोष स्वतःवर येऊं नये म्हणून त्यांनी स्पष्ट नकार न देतां या भावंडांना पैठणास जाऊन शुद्धिपत्र आणावयाची आज्ञा दिली असावी. आळंदीकरांनी भूतदयेने प्रेरित होऊन म्हणा किंवा अन्य कांही कारणाने एक पत्रही बरोबर दिलें होतें. पैठणस्थ ब्राह्मणांनी ज्ञानदेवांच्या विनंतीचा धिक्कार केला, आणि एवढेंच

नव्हे तर, एवढीशीं मुलें हरिकथा काय करतात, पुराण काय सांगतात, व वेदांत काय बोलतात म्हणून त्यांची टिंगल केली. त्यांच्या निवृत्ति, ज्ञानदेव, सोपान, आणि मुक्ता या नांवांतील श्लेष ओळखून त्याचीही टवाळी त्यांनी केली असावी[१९]

या टवाळखोरीचा पूर्ण पश्चाताप ब्राह्मणांना लवकरच झाला. रेड्या तोंडीं वेद वदविणें, पाठीवर मांडे तयार करणें, मृत पितरांना जेवावयास बसविणें, मृतास सजीव करणें, इत्यादि ज्ञानदेवाने केलेले चमत्कार पाहिल्यावर त्यांच्या अतिमानुषतेपुढे त्यांनी लोटांगण घातलें असल्यास नवल नाही.

"अलौकिका नोहावें" (ज्ञा. ३-१६९) अशी विचारसरणी असलेल्या ज्ञानेश्वरांनाही चमत्काराशिवाय नमस्कार करवून घेतां

---

१९. ज्ञानेशादिकांचीं हीं नांवें "कुतूहल उत्पन्न करणारीं आहेत" यांत शंकाच नाही. वडील विठ्ठल व आई रुक्मिणी आणि मुलांची नांवें अशीं काव्यमय ! संसारांतून निवृत्त होऊन ज्ञानरूपी सोपानाने चढून मुक्ति मिळवावी अशी हरदासी कोटी प्रसिद्धच आहे ! असा उल्लेख करून प्रा. मा. दा. आळतेकर म्हणतात, "हीं चार भावंडें जन्माला आलीं याबद्दल वाद नाही, किंवा मतभेद नाही. शेक्स-पियर होता किंवा नाही, आणि त्याच्या नांवावर प्रसिद्ध असलेलीं नाटकें त्याचीं कां प्रसिद्ध न्यायाधीश लॉर्ड बेकनने तीं लिहिलीं असा वाद जसा विलायतेंत गाजतो, तसा वादाच्या तडाक्यांत तरी ज्ञानेश्वर नाहीत हेंच आपण भाग्य समजावें." श्री ज्ञानदेव पृ. ३३-३४. असा वाद नसला तरी ज्ञानेश्वर एक का दोन, असा वाद निर्माण झालाच ! !

आला नाही हें खरें मानलें तरी त्यापेठे त्यांना शुद्धिपत्र मिळालें असावें असें मानावयास आधार नाही. पैठणच्या ब्राह्मणांनी शुद्धिपत्र दिलें असें कै. पांगारकरांनी म्हटलें आहे आणि शुद्धिपत्राचा नमूना आपल्या श्रीज्ञानेश्वर चरित्रांत छापला आहे. या शुद्धिपत्राच्या देणगीबद्दल शंकाच आहे. वरील चमत्कारांना, 'पुढील पिढींतील बावळट भाविकांची किंवा लफंग्यांची' [२०] बुद्धिभ्रष्टता किंवा जाहिरातबाजी समजणाऱ्या प्रा. मा. दा. आळतेकरांनी शुद्धिपत्र मिळालें नाही असें सिद्ध केलें आहे. अर्थात् मुंज होऊं शकलीच नाही. [२१]

शुध्दिपत्राच्या देणगीची खात्री निःसंशय पटण्यासारखा पुरावा उपलब्ध नाही त्यामुळे शुध्दिपत्राची देणगी देण्याइतकी ही सहिष्णुता तत्कालीन ब्रह्मवृंदाने दाखविलेली नसावी हें मानावें लागेंत. कदाचित् हें लक्षांत घेऊन असद्भावनेने तर नव्हेच पण जगाला खरें कर्तव्य, खरें ज्ञान आणि खरी भक्ति शिकविण्याच्या उद्देशानेच नवव्या अध्यायांत भोंदू कर्मठागिरीचे वाभाडे ज्ञानेश्वरांनी काढले आहेत. ज्ञानेश्वरांच्या ठिकाणीं कोणताही दोषार्ह आरोप न करतां असें म्हणावेंसें वाटतें की हृदय पिळवटून निघालेले तेथले उद्गार चरित्रवाचकच आहेत.

---

२० श्री ज्ञानदेव, पृ. ५७. २१. पहा. श्री ज्ञानदेव पृ. ५०,५१

## १२ 'निर्वंश होउनि ठरेल अखंड वंश ॥'

शुध्दिपत्राची देणगी संशयित असली तरी मौंजी बंधन झालें नाहीं ही बाब संशयातीत आहे. आणि मुंज नव्हे तर लग्न नव्हेच; संसारांत पडणें नको आणि वंशविस्तारही नको ! आपण भोगलेल्या दुर्दैवाचे वारस कोणी व्हावयाला नको ! कदाचित् ते म्हणाले असतील--

'की आमुचें कुळ असे जर ईश्वरांश ।
निर्वंश होउनि ठरेल अखंड वंश ॥ '[२२]

ते प्रत्यक्ष काय म्हणाले हें माहित नसलें तरी त्यांनी काय केलें तें माहीत आहे. निवृत्ति, ज्ञानेदव, सोपानदेव यांजबरोबर मुक्तानेही तोच निर्णय शिरोधार्य मानला-

## १३. 'तुका म्हणे आता । उरलो उपकारापुरता ॥'

वास्तविक भोगविलासांचें आकर्षण या भांवडांना कधीच वाटलें नाहीं आणि सामाजिक शिस्त या नात्याने त्यांनी केलें तें चांगलेंही असेल, किंबहुना त्यांत त्यांचा अभूतपूर्व त्याग दिसून येतो ही गौरवाची गोष्ट आहेच, परंतु असला त्याग त्यांना करावयास भाग पाडण्यांत पैठणस्थ ब्रह्मवृंदाने साध्या माणुसकीसही बळी दिलें हें उघड आहे. पूर्वीच अभेदरूप होऊन गेलेल्या या भांवडांना ब्रह्मवृंदाच्या निर्णयाचा कांहीच विषाद वाटला नाही, उलट

---

२२. या ओळी स्वातंत्र्यवीर 'सावरकरांची कविता' पृ. ७८ वरील दोन ओळींत सोयीचा बदल करून घेतल्या आहेत.

त्यामुळे त्यांचें अंत:करण अधिकच परमार्थाकडे वळलें आणि अवघें विश्वाचि माझें घर' अशी 'मती स्थिर' झाल्याकारणाने आपल्या अनुभवाचा फायदा अखिल जनतेस देऊन समाजांतील शूद्रादि निकृष्ट जातींचा, जन्माने नाही तर कर्माने निकृष्ट ठरलेल्या कर्मठांचा, आणि पाप्यांच्या पितरांचा उध्दार करण्याकरिताच आपलें उर्वरित आयुष्य त्यांनी वेचलें. किंबहुना ते आता केवळ उपकारापुरतेच उरले होते.

## १४ चरित्र आणि चमत्कार.

ज्ञानदेवांनी पैठणास गेल्यावर एका रेड्याकरवी वेदघोष करविला, पाठीवर मांडे भाजले, नेवासें मुक्कामीं मृत शरीर सजीव केलें, पुढे योगिराज चांगदेव व्याघ्रारूढ होऊन सर्पाचा चाबूक फिरवीत फिरवीत भेटीस आले असतांना, पडक्या अचेतन भिंतीस सचेतन करून तिच्यावरच आरूढ होऊन योगिराजांना सामोरे गेले अशा अनेक चमत्कारांच्या आख्यायिका ज्ञानदेवासंबधांत रूढ आहेत. ज्ञानदेवादिकांच्या पूर्वी त्यांच्या गुरुपरंपरेतील नाथपंथीय सत्पुरुष, महानुभावपंथप्रवर्तक श्री चक्रधर स्वामी, समकालीन नामदेव, गोराकुंभार, इत्यादि किंवा उत्तर कालीन एकनाथ, तुकाराम, रामदासादि संत विभूतींपैकी प्रायः प्रत्येकाच्या चरित्रांत अलौकिक चमत्कारांची भरती आहे. आपल्याकडील सारीं पुराणें, वरवर पाहतां अद्भुत् रम्य चमत्कारांच्या स्वप्नशालाच वाटत नाहीत का ? परंतु या अद्भुतामागील

अध्यात्म फारच थोड्यांच्या आकलनकक्षेंत येत असतें हें ही खरेंच आहे. श्री ज्ञानेश्वरांच्या चमत्कारांपैकी मृत शरीर उठवि-ल्याची आख्यायिका ज्याच्याबद्दल आहे, तोच 'सच्चिदानंद बाबा, पुढे ज्ञानेश्वरांचा 'आदरें ग्रंथ लेखक' झाला अशी समजूत आहे. तसेंच ज्या रेड्याच्या मुखाने—

रेडियांत आम्हांत कांही। भेद पाहतां किंचित् नाही।
आत्मा व्यापक सर्वां देहीं। भूत मात्रां सारिखा ॥

असें म्हणून ज्ञानेश्वरांनी वेद वदविले तो रेडा पुढे मालकाजवळ राहिला नाही, तर ज्ञानदेवाच्याच बरोबर गेला आणि त्यास पुढे आळें मुक्कामीं ज्ञानेश्वरांनी स्वतः समाधि दिली अशी आख्यायिका आहे. [ या समाधीचे एक छाया चित्र श्री ज्ञानेश्वरदर्शन भाग २ रा, यांत संपादकांनी दिलें आहे. ] या चमत्काराचा दिवस [ माघ शुद्ध पचमी शके १२०९ ] विशेष स्मरला जाणें, आणि वेदघोष आटोपल्यावर गारूड्याच्या खळाप्रमाणे त्याचा मागमू ही त्या जड बुद्धीच्या प्राण्यावर न राहण्याऐवजी त्याने जणु काय विरक्त होऊन [ अन्यथा दुसरें कोणतें कारण सांगणार ! ] ज्ञानदेवाबरोबर जाणें ह्या गोष्टी केवळ भोंदूगिरी-पेक्षा दुसरेंच कांही सुचवितात.

### १५ पंडितांचें मत.

यथार्थदीपिकाकार वामन पंडितांनी 'जगीं मिरवोनियां सिद्धि। आपल्याला टीकांची केली प्रसिद्धि ॥ ९-२७ ॥ अशी

जी टीका केली आहे ती ज्ञानदेवावरच होय अशी सार्वत्रिक समजूत आहे. डॉ. शं. दा. पेंडसे, डॉ. म. अ. करंदीकर यांनी ही ओवी त्या तडाख्याची किंवा टोमण्याची वाचक आहे असें स्पष्टपणे नमूद करून ठेविलें आहे. या विद्वानांच्या मतास मान द्यावयाचा असल्यास वामनपंडितांची साक्ष चमत्कारांच्या बाबतींत कोणत्या पक्षाकडे जाते हें वेगळें सांगावयास नको.[२३]

## १६ संतांचीं चरित्रें व आणि चमत्कारांचा सुकाळ.

संताच्या चरित्रांत चमत्कारांचा आढळ होणें ही बाब जगांतील सर्वच देशांत समान आहे, किंबहुना संत म्हटला म्हणजे साधारण जनता कांही चमत्कारांची अपेक्षा करते; एवढेच काय पण चमत्कारांतील वाढत्या विस्मयावरच संतांचें देवत्व अनुमानण्याची प्रवृत्ति सर्वच देशांत सर्वच काळीं साधारण जनतेंत आढळून येते, आणि ही प्रवृत्ति ओळखूनच आपापल्या आराध्य दैवताच्या किंवा पूज्यपाद गुरूंच्या मोठेपणाचा डंका पिटण्याकारिता मूळ असलें नसलें तरी चमत्कारपरिप्लुत वृत्त सांगण्याची संधि आंधळे भगत दवडीत नाहीत कित्येक वेळां हे चमत्कार प्रत्यक्ष होत नसून मागाहूनही चिकटविण्यांत येतात असें दिसतें. अशा बनवाबनवीच्या अतिरेकामुळे कित्येक

---

२३ पहा. श्री. ज्ञानेश्वरांचें तत्वज्ञान, पृ. ४७८ आणि ‘ साहित्य ’ त्रैमासिक, अंक फेब्रुवारी १९५० पृ. ४४.

बुद्धिवादी मंडळी चमत्कारांची शक्यता अणुमात्रही मानावयास तयार होत नाहीत.

## १७. सहिष्णु दृष्टिकोण, चमत्कारांचें कारण " सिद्धि "

वास्तविक सत्य हें कोणत्याही एका टोकाशीं नसतें तर दोन टोकांच्या मध्ये कोठेतरी असतें असें म्हणतात त्याप्रमाणे भाबड्या संतालयांतील आंधळेपणा, आणि बुद्धिवाद्यांची व्यावहारिक तर्कशास्त्राच्या वापरांत आढळून येणारी मर्यादित ग्रहणशक्ति जमेस धरून चमत्कारांचा विचार केला पाहिजे. कांही चमत्कारपूर्ण घटना वास्तविक नसतात, परंतु झाल्याचा भास होतो, अशा भासात्मक चमत्कारांना Mesmerism किंवा नजरबंदी म्हणतात. मेस्मेरिझम् हिप्नाटिझम् इत्यादि प्रकार इच्छाशक्तिच्या (Will power) जोरावर घडतात आणि तशी शक्ति येण्यासही कांही साधन करावें लागतेंच. परंतु ज्या चमत्कारांचा आपणांस विचार करावयाचा आहे ते असे भासात्मकतेच्या किंवा गुंगविण्याच्या बाजारू वृत्तीच्या पलीकडचे आहेत, आणि अशा चमत्कारांचें कारण 'सिद्धि' या पारिभाषिक नांवाने ओळखलें जातें. पातंजलयोगसूत्रांत, जन्म, औषधी, मंत्र तप, आणि समाधि हीं सिध्दींचीं कारणें मानलेलीं आहेत. १५ व्या शतकाच्या उत्तरार्धांत होऊन गेलेले श्री स्वामी नृसिंहसरस्वती यांच्या अनेक चमत्कारांचा उल्लेख सत्य मानावा लागतो. त्यांचे शिष्यवर

श्रीस्वामी वासुदेवानंद सरस्वती यांचें वास्तव्य माळव्यांत अनेक ठिकाणीं झालें असून त्यांच्या योगसिद्धीच्या घटना प्रत्यक्ष ज्यांनी पाहिल्या आहेत असे अनेक लोक आज हयात आहेत. अगदी अलीकडे मुंबईस मरीन ड्राइव्ह येथे फेब्रुवारी १९५० च्या दुसऱ्या पंधरवड्यांत गिरनार येथील श्रीरामदासजी महाराजांच्या, हवाबंद पेटींत आणि जलमय पेटींत अनेक तास राहून दाखविण्याच्या योग क्रिया वीस वीस हजारांच्या समुदायाने पाहिल्याचें वृत्त आणि त्या पाहून विज्ञानविशारदांनी तोंडांत बोटें घातल्याचीं वर्णनें प्रमुख वर्तमान पत्रांतून अनेकांनी वाचलीं असतील, आणि छायाचित्रेंही पाहिलीं असतील. या क्रियांतून यौगिक सामर्थ्य मान्य केलें जातें आणि तें दैवी नसलें तरी नित्यानुभवाचे मानुषी खास नव्हे. अर्थात् यौगिक सामर्थ्यास मान्यता दिल्यावर या योगसामर्थ्याच्या कमी अधिक शक्तिवर विश्वास ठेवावयास हरकत नसावी.

## १८ राजयोग, हठयोग, आणि ज्ञानेश्वरांचा "पंथराजु".

ह्या योगमार्ग आत्म्यांतील परमात्मपणाची जाणीव करून देणारा, त्याचें सर्वस्पार्शित्व सिद्ध करणारा एक मार्ग आहे. ह्या सर्वस्पार्शित्वाच्या साक्षात्कारास अंत:करणशुद्धि आणि मनोलय आवश्यक असतात, या मनोलयप्राप्तीचे मार्ग दोन. परमेश्वराच्या चरणकमलांचे ध्यान करून किंवा जप करून पूर्ण एकाग्रतेने मनोलय साधावयाचा किंवा विशिष्ट मार्गांनी जबरदस्तीने लय साधावयाचा, पहिल्यास **राजयोग** आणि दुसऱ्यास **हठयोग**

अशीं नांवें आहेत. ज्ञानेश्वरीच्या सहाव्या अध्यायांत पूर्ण समरसतेने ह्या हठयोगाचें वर्णन ज्ञानेश्वरांनी केलें असून त्यास 'पंथराजु' (ओवी १५२) म्हटलें आहे हठयोगास आवश्यक अशीं यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, धारणा, ध्यान व समाधि हीं अष्टांगें सांगितलेलीं आहेत. राजयोग किंवा हठयोग पैकी कोणत्याही मार्गाने जाऊन साक्षात्काराचे धनी होतां येते. 'धनी होतां येते' हें म्हणणें सोपें असलें तरी प्रत्यक्ष प्राप्ति

पैं गा मनुष्यांचिया सहस्त्रा । माझि विपाइलेयांचि एथ धिंवसा
तैसे यां धिंवसेकरां बहुवसां । माझि विरला जाणें ॥ ७·१०

अशा रीतीने फार थोड्यांना होत असते. अशा योगप्राप्तीमुळे 'अनिवार सिद्धि' उपजतात. पहा

प्राणापानजयो ज्यापाशीं । इंद्रियजयो असे ज्यासी ।
यावरी उल्हास मद्भक्तीसी । चित्त अहर्निशी मद्युक्त ॥
उद्धवा गा त्याच्या ठायीं । अनिवार सिद्धी उपजती पाही'''
एकनाथी भागवत १५-३२, ३३

या अनिवार सिद्धींचें सामर्थ्य

मग समुद्रापैलाडी देखे । स्वर्गींचा आलोचु आइके ।
मनोगत ओलखे । मुंगीयेचें ॥
..........चाले तरी उदकीं पाउल न लागे । ... ज्ञा.
६-२६९, २७०

इत्यादि ओव्यांतून ज्ञानेश्वरांनी वर्णिलें आहे.

## १९ क्षुद्रसिद्धि, गुप्तसिद्धि, महासिध्दि.

या सिद्धि तेवीस असून त्यांपैकी भूतभविष्याचें ज्ञान शीतोष्णादि द्वंद्वें सहन करणें, दुसऱ्यास पडलेलीं स्वप्नें किंवा मनोगतें सांगणें इत्यादि पांच 'क्षुद्रसिद्धि,' दूरदर्शन, दूरश्रवण, परकायाप्रवेश इत्यादि दहा 'गुप्तसिद्धि' आणि अणिमा, महिमा, लघिमा इत्यादि आठ 'महासिद्धि' असतात. या सिद्धि साधकाला क्रमाने प्राप्त होत असतात आणि त्या टाळून, निदानपक्षी स्वार्थाकरिता त्यांचा उपयोग कटाक्षाने टाळून साधकाने परब्रह्मतत्वाकडे जावयाचें असते. वर उल्लेखिलेल्या स्वामी रामदासजी महाराजाप्रमाणे सिध्दीच्या जेमतेम पहिल्या प्रकारांतील जलवायु स्तंभनादि क्रियापर्यंत पोहोचलेले [ परंतु दुर्दैवाने त्यांतच सर्वस्व मानून लोकांपुढे त्यांचें प्रदर्शन करीत बसून पुढचा मार्ग विसरलेले ? ] योगीराज आजही या देशांत आहेत हें उघड आहे. असो. अशा सिध्दि प्राप्त करून घेण्याकरिता हठयोगाने कुंडलिनी शक्ति जागृत करून ध्यावी लागते.

## २० षट्चक्रें, कुंडलिनी, चक्रभेद व धारणा.

आपल्या शरीरांत ज्ञानतंतूंची एक विशिष्ट व्यवस्था Sympathetic System असते. या ज्ञानतंतूंची व्यवस्था म्हणजे ज्ञानतंतूंच्या गाठी Ganglia आणि जाळीं Plexuses होत. हीं जाळीं सहा आहेत व तींच शरीरांतील

१ मूलाधारचक्र २ स्वाधिष्ठान चक्र ३ नाभिकमल, उर्फ मणिपूर, ४ हृत्कमल उर्फ अनाहत चक्र, ५ विशुध्द चक्र आणि ६ आज्ञा चक्र अशीं सहा चक्रें होत. यांतील नाभिकमल किंवा Solar Plexus उर्फ Abdominal brain याचे महत्व फार होय पहिल्यांत कुंडलिनीचें वास्तव्य असतें. ह्या कुंडलिनीस जागृत करण्याच्या यौगिक क्रियांत यश मिळवून प्राणशक्ति (Vital force ) ऊर्ध्व मार्गाने एका एका चक्राचा भेद करीत वर जाऊं लागली म्हणजे अलौकिक चमत्कार करण्याची शक्ति प्राप्त होते. मानसशास्त्राप्रमाणे आपल्या अंगची विद्युत्शक्ति [ Electric Force ] इच्छाशक्तिच्या जोरावर डोळयांनी किंवा हाताच्या बोटांनी दुसऱ्याच्या शरीरांत घालून त्याच्या मनावर ताबा मिळवितां येतो आणि मेस्मेरिझम हिप्नाटिझमचे प्रयोग करून दाखवितां येतात. आपलें शरीर अशावेळीं जणु एक विद्युत् यंत्र बनतें. वातावरणांतून सूक्ष्म वायुलहरी व प्रकाशलहरी जात असतात या भौतिक ज्ञानावर जसे वायरलेस टेलग्राफी, टेलेव्हिजनचे चमत्कार घडतात त्याच प्रमाणे अध्यात्मज्ञानाच्या जोरावर आत्मशक्तिचा साक्षात्कार झाल्यावर स्पर्श रस रूप गंधादि पंचभौतिक गुणांवर क्रमाने स्वामित्व मिळूं लागतें. बुध्दिप्रामाण्यावाद्यांनाही सिध्दि क्रमप्राप्त असते हें मान्य होऊं शकतें. हठयोग किंवा सिध्दि प्राप्त होण्याकरिता कुंडलिनी जागृत व्हावी लागते आणि ती हठयोगाने, मनोलयाच्या इतर अभ्यासाने, निष्ठायुक्त भक्तीने किंवा सद्गुरूच्या कृपेने जागृत होते.

## २१ थिऑसफीची साक्ष

थिआसफी ह्या आधुनिक धर्मपंथाला कुंडलिनीचें अस्तित्व, षट्चक्रें व त्यांचे भेदन, इत्यादि गोष्टी मान्य असून हीं चक्रें ईथर सारख्या पातळ द्रव्याचीं असतात असें थिऑसफिस्ट मानतात.

## २२ भौतिक शास्त्रें आणि अध्यात्म–योगशास्त्र

पदार्थविज्ञानशास्त्र, रसायनशास्त्र, प्राणिशास्त्र, इत्यादि भौतिक शास्त्रांतील मोठमोठीं रहस्यें समजून घेण्याकरिता त्या त्या शास्त्रांचा प्राथमिक अभ्यास अगोदर करावा लागतो. एक उदाहरण घेऊं या. युरेनियम धातूच्या अणूवर [U 235] वेगवान् न्यूट्रॉन आदळतांच अणूचे विघटन होतें, व पुष्कळ शक्ति प्रगट होते, व त्याचबरोबर त्यांतून आणखी न्यूट्रॉन देखील बाहेर पडतात. हे न्यूट्रॉन परत अणूवर आदळतात, व त्या न्यूट्रॉनमुळे आणखी युरेनियम अणु भंग पावतात, व त्यांतून परत शक्ति व न्यूट्रॉन निर्माण होतात. अशा रीतीने युरेनियम अणूच्या विघटनेची साखळी तयार होते व त्यांतून अनंतपट शक्ति बाहेर पडूं शकते. ह्या ज्ञानाच्या साहाय्यावरच भयंकर स्फोटक व घातक अशा अणुबॉम्बची योजना झालेली आहे. आता ह्यापुढेजाऊन अधिक घातक अशा एच् बॉम्बची (H-Bomb) किंवा त्याही पुढील पायरी ह्मणजे एक्स बाम्बची [ x Bomb ] योजना सिद्ध करण्यांत अमेरिका व इंग्लंड येथील मोठमोठे अणुतज्ञ

गुंतले आहेत. ह्या अणुबॉम्बच्या रहस्याची यथार्थ कल्पना सर्वसाधारण माणसास येत नाही, आणि यावयाची झाल्यास त्यास अगोदर मूलतत्वें Elements ह्मणजे काय, Energy म्हणजे काय, Electricity म्हणजे काय, धनविद्युत, ऋणविद्युत यांत काय फरक आहे, अणु म्हणजे काय, प्रोटोन आणि इलेक्ट्रान ही कशाचीं नांवें आहेत, यांचें मध्यकेंद्र (Nucleus) कसें तयार होतें इत्यादि अनेक गोष्टी शिकाव्या लागतात ह्यांची माहिती करून न घेणाऱ्याने निदानपक्षीं त्यांचें अस्तित्व तरी नाकारूं नये अशी अपेक्षा असते, व नाकारल्यास तें अज्ञानाचें प्रदर्शन समजलें जाते ! जीवपेशीशास्त्रांतील निसर्ग-निवड Nature-selection योग्यतम जीवाचा टिकाव, (Survival of the fittest) हीं तत्वें, किंवा मानसशास्त्रांतील वाट्सन्चा वर्तनवाद (Behaviorism) फ्राइडचा लैंगिकवाद, ॲडलरप्रणीत हीनगंड न्यूनगंड [Inferiority complex and superiority complex] किंवा मानसशास्त्रांतून 'मना'लाच हद्दपार करविणारें पाव्हलाव्हचें विशिष्ट प्रातिहत क्रियाचें (Conditioned Reflexes) तत्व, असल्या विषयावर मत देण्याकरितां तर राहोच परंतु ते समजून घेण्याकरिताही त्या त्या शास्त्रांतील प्राथमिक अभ्यास आवश्यक नाही काय ? तसेंच तत्वज्ञानांतील प्रतीति-प्रमेय (Problem of Perception) आणि त्या विषया-संबंधी डेकार्ट (Descarts) व लॉक (Locke) यांच्या भूमिका समजावून घेण्याकरिता त्याच शास्त्राची पद्धति अंगीकारावी लागेल.

योगशास्त्र हेंहि स्वतंत्र ' शास्त्र ' आहे, आणि त्यांतील षट्चक्र-भेदनादि सिध्दांत समजून घेण्यास व ॲटमबॉम्ब प्रमाणेच त्यांतही आढळून येणाऱ्या फलस्वरूप विविध सिध्दिप्रकारांवर मत देण्यास त्या योगशास्त्राचा अभ्यास आवश्यक आहे. तसेंच या शास्त्राविषयी कोणतेंही मत देतांना संबंधित व तुल्यविषय शास्त्रांतील निकषच वापरले पाहिजेत. दुर्दैव असें की आपल्या विद्वानांत आपल्याकडील वैदिक, औपनिषदिक, दार्शनिक, पौराणिक, वा भक्तिपंथीय अशा कोणत्याही तत्वज्ञानाला पाश्चात्य तत्वज्ञानाचा व भूमिकांचा निकष लावावयाची गुलामी वृत्तीची रूढी निर्माण झाली आहे. कालगतीची पर्वा न करीता आजतागायत टिकलेलीं उपनिषदें, कालपरवाच्या कॅण्ट-डेकार्ट्यांना पटल्यासच खरीं, एरवी तीं भ्रमचेष्टितें होत असें मानावयाचें काय ? वास्तविक पाश्चात्य निकष अजिबात लावूं नयेत असें प्रस्तुत लेखकास वाटत नाही, उलट, शक्य तेथे जरूर लावावेत, कारण पाश्चात्य समजुतीप्रमाणे ' शास्त्रीय ' समजल्या गेलेल्या पध्दतीने अध्यात्म योगादि शास्त्रे अभ्यासलीं गेल्यास त्यांतील रहस्यें अधिक सुस्पष्ट, सुलभ व परिणामत अधिक मान्य होतील, परंतु जेथे पाश्चात्य निकष थोटे पडतात तेथे ' पौर्वात्य ज्ञान म्हणजे गप्प ' असा आततायी सिध्दांत ठोकून देणें बरें नव्हे.

## २३ भौतिक शास्त्रांत 'निर्विचारवैशारद्य' नाही.

जीं पाश्चात्य शास्त्रें केवळ जडवादाच्या भूमिकेवरून

अवलोकन करीत असतील तीं जडातीत आध्यात्मिक अनुभवाच्या सृष्टीबद्दल मत देण्यास पात्र आहेत काय ? अतींद्रिय सृष्टीचा साक्षात्कार, किंवा निर्विचार स्थिति ठेवण्यांतील विशारदत्व, किंवा प्राविण्य असा अध्यात्मप्रसाद जाणण्याचें शास्त्र हें जडातीत आहे आणि त्याचे मार्ग आणि अंतिम फल ह्यांचा विचार केवळ तर्कानें करतां येणार नाही. भगवान् पतंजलींचें 'निर्विचारवैशारद्ये अध्यात्म प्रसादः' हें वचन उद्धृत करून वेदमूर्ति धुंडिराजशास्त्री विनोद म्हणतात, "पाश्चात्य तत्वज्ञानाच्या अत्युच्च भूमिका अद्यापि बौद्धिक विचारश्रेणींच्या पलीकडे गेलेल्या नाहीत; पाश्चात्य तत्वज्ञांमध्ये अजून 'निर्विचारवैशारद्य' आढळून येत नाही."[२४] डॉक्टर सुरेंद्रनाथ दासगुप्त यांचे समाधीने प्राप्त होणाऱ्या ज्ञानासंबंधींचे उद्गार येथील संदर्भांत लक्षांत ठेवण्यासारखे आहेत. ते ह्मणतात, '................This kind of knowledge will not of course, be knowledge in the familiar sense; for all समाधि knowledge is said to be non-conceptual, and so, of a different order......... . They represent a different dimension of knowledge completely foreign to phenomenal knowledge............ This new dimension of knowledge is thus said to supercede scientific knowledge................"[२५] वरील विस्तृत विवेचनाचे पुढीलप्रमाणे निष्कर्ष काढतां येतील.

---

२४ पहा. श्री ज्ञानेश्वर दर्शन, भाग २ रा, अध्यात्मखंड, पृ. ५३४. २५ पहा. Yoga-Psychology Page 437.

## २४ निष्कर्ष पहिला-चमत्कारांची शक्यता वादातीत आहे.

सारांश असा की प्राक्कालीन संतविभूतींनी जे चमत्कार केले म्हणून उल्लेख सापडतो त्यांपैकी सारेच कदाचित् प्रत्यक्ष झालेले नसतील, परतु म्हणून एकही झाला नाही असें म्हणतां येणार नाही. रेडयाच्या मुखांतून वेद वदविणें किंवा जठराग्नीची उष्णता योग सामर्थ्याने वाढवून पाठीवर मांडे भाजणें, अचेतन भिंतींत पुढे पुढे सरकण्याइतकें चैतन्य निर्माण करणें[२६] इत्यादि चमत्कार सिद्धास अशक्य नाहीत हें वरील विवेचनावरून लक्षांत येऊं शकेल. 'रेडे' आडनांवाचा कोणी ग्रहस्थ असेल; तो रेडयाप्रमाणे अप्रबुद्ध असेल; शिकत नसेल; त्यास ज्ञानेश्वरांनी

---

२६ ज्ञानदेवांच्या एका अभंगांत, सद्गुरु कृपेने भिंतीही चालतील, असा उल्लेख केलेला आहे. भिंत चालण्याचा चमत्कार, साऱ्या जगांत ज्ञानेश्वरा व्यतिरिक्त इतर कोणत्याही संताने केल्याचा दाखला मिळत नसल्याने, हा उल्लेख तसा चमत्कार ज्ञानदेवाने केला असल्याच्या रूढ समजुतीस बळकटी आणतो अभंग येणे प्रमाणे:

देव करी तरी काय न होई । दगडाचिये नाई तरिजेल ।। १ ।।
सूर्यकिरणावरी मुंगियाच्या हारी । अग्नीचें पाठारीं पीक होय ।। २ ।।
फुटतील पाय चालतील भिंती । मेरु मशक येती समतुका ।।३।।
ज्ञानदेव म्हणे अघटित घडे । गुरुकृपा जोडे परब्रह्म ।। ४ ।।

पहा-मराठी वाङ्मयाचा इतिहास, खंड १ला, पृष्ठ ५१३, लेखक-ल. रा. पांगारकर.

शिकविलें असेल आणि शिकल्यावर तो वेद सुध्दा शुद्ध म्हणूं लागला असेल, असल्या खुळचट कोट्या करून चमत्कारांना पांघरूण घालण्याचें कांही एक कारण नाही.

## २५ निष्कर्ष दुसरा--निर्णय देण्यापूर्वी अध्यात्मशास्त्राचा अभ्यास आवश्यक.

रसायनशास्त्र, प्राणिशास्त्र इत्यादि शास्त्रें नीट समजून घ्यावयास जसा त्या शास्त्रांचा प्राथमिक अभ्यास आवश्यक असतो त्याचप्रमाणे ज्ञानेश्वरी सारखे वाङ्मयग्रंथ आणि ज्ञानेश्वर, एकनाथ, तुकारामादि लोकोत्तर विभूतींचे आयुष्यग्रंथ दोन्ही समजून घेण्याकरिता भारतीय अध्यात्मशास्त्राचा प्रास्ताविक अभ्यास आवश्यक आहे कारण आखरांचिया चि भांभा । इंद्रियें जींति ।। ज्ञा. [७-२०२] किंवा अमृतातेंहीं पैजेसीं जींके ।। ज्ञा. [ ६-१४ ] असें मोहक वर्णन करावयाचा खरा उद्देश

तेणें कारणें मीं बोलेन । बोलीं अरुपाचें रूप दावीन ।
अतींद्रिय परि भोगवीन । इंद्रियाकरवि ।। [ ज्ञा. ६-३६]

हा आहे हें विसरतां कामा नये.

## २६ निष्कर्ष तिसरा—शास्त्राभ्यासाच्या अभावीं "वायसीं चंद्रु नोळखिजे" किंवा "रानिचं राउला नेलें" अशी स्थिति होते.

'ज्ञानेश्वरी ग्रंथ हा अध्यात्मग्रंथ आहे आणि यांतील अध्यात्मशास्त्र समजण्यास तितकें अंतरंग तयार असलेला मा अधिकारी

आहे, इतरांना तितकी पात्रता नसेल तर त्यांनी केवळ वाग्वैभवा-वरच खुष व्हावें,[२७] या ज्ञानेश्वरांच्या सौम्य सूचनेवर रसिक वाचकांनी खरोखरीच खुष होणें बरें नाही, कारण अध्यात्म-शास्त्राची **आवड** नसल्याने केवळ व्याकरण व भाषा यांच्या अभ्यासावर ज्ञानेश्वरीचा अर्थ काढूं पाहणाऱ्यांची 'जैसा वायसीं चंद्रु नोळखिजे। तैसा प्राकृतीं ग्रंथु हा नेणिजे। .... [ज्ञा.६-२९] अशा शेलक्या शद्वांत त्यांनीच केलेली सालंकारिक संभावना विसरतां येत नाही. भारतीय अध्यात्मशास्त्राच्या जणु प्रयोग-शाळाच ठरलेल्या संतांच्या आयुष्यग्रंथांचें परीक्षण करतांना वरील पंक्तींतील ध्वनित अर्थ लक्षांत ठेवला पाहिजे.

संतांनी केलेल्या चमत्कारांची आणि अनुभविलेल्या गूढ संवेदनांची ( Mysticism in Maharashtra चे विद्वान् कर्ते रानडे यांनी म्हटल्याप्रमाणे Super-sensuous experiences of the Mystics ची ) वासलात त्या शास्त्राचा विचार न करतां 'पुढील पिढींतील बावळट भक्तांची बुध्दिभ्रष्टता किंवा लफंग्यांची जाहिरातबाजी', अशा सारख्या अशिष्ट शब्दांनी लावावी काय ? टीकाकाराच्या अज्ञानास हसून वेळ घालविण्याऐवजी संजयाच्या मनांत धृतराष्ट्राविषयी १८ व्या अध्यायाच्या शेवटी शेवटी जो विचार आला तो सांगून चमत्कारांची शक्यता वादातीत आहे' हा मुद्दा संपवूं या.

---

२७ पहा ज्ञानेश्वरी १८. १७२८.

रानिचें राउला नेलेयां । दाही दिशा मानी सुनियां ।
कां रात्रि होये पाहालेयां । निशाचरां ॥
जो जोथचें गौरव नेणे । तेयातें भिंगुलवाणें ।
म्हणौनि अप्रसंगु तेणें । म्हणावा कि तो ॥

ज्ञा. १८-१६०६,१६०७

## २७ चमत्कार खराच !

ज्ञानेश्वरांच्या आयुष्यांतील इतर चमत्कारपूर्ण घटनांच्या सत्यासत्यतेबद्दल बरींच रणें माजलीं तरी त्यांच्या आयुष्यांत निदान एका चमत्काराला निश्चित स्थान आहे. वयाच्या अवघ्या १५ व्या वर्षींच ज्ञानेश्वरींसारखा असामान्य ग्रंथ निर्माण करणें हा एक चमत्कारच नाही काय ? Gita Explained by Dnyaneshwar Maharj ह्या आपल्या ग्रंथांत बॅरिस्टर मनु सुभेदार म्हणतात, "………Tradition ascribes to him numerous miracles, which impressed his contemporaries and which elicited love and reverence of posterity Cynics may disregard this tradition, but the great miracle in the work which is extant remains …. इत्यादि.[२८] असा

२८ पहा. बॅरिस्टर मनु सुभेदार कृत Gita Explained by Dnyaneshwar Maharaj, Page 53.

असामान्य ग्रंथ अभ्यासाशिवाय निर्माण होणें शक्य नाही. हा अभ्यास इतक्या लहान वयांत त्यांनी कोठे केला ?

## २८ "बालपणीं चि सर्वज्ञता"

वयाच्या अवघ्या पंधराव्या वर्षीच "तरि अवधान एकलें देइजे । मग सर्व सुखांसि पात्र होइजे" असें "प्रतिज्ञोत्तर" करण्याइतपत प्रगतप्रज्ञ झालेल्या विचक्षण बुद्धीस आणि "भावांचा फुलौरा होतु जाये मती वरी" अशा भावनिर्भर हळुवार अंत:करणाला "शब्देविण संवादिजे" अशा ब्रह्मज्ञानाने भरलेलें "शारदेचें लावण्य रत्न भांडार" किंवा "ग्रंथगुरुवतीचा ठाओ" यायोग्यतेचें रसाळ महाकाव्य निर्मिताना केवळ याच देहींचा अभ्यास पुरेसा झाला असेल असें वाटत नाहीं. मात्र असें म्हणण्यांत आंधळी भक्ति सुचवावयाची नसून 'तत्र तं बुद्धिसंयोगं लभते पौर्वदेहिकम् ॥'* या भगवद्वचनाचें महत्व सांगावयाचें आहे आणि उदाहरण दाखवावयाचें आहे. कित्येक बालकें लहानपणापासूनच बुद्धिमान् असतात, तर कित्येकांना साठी उलटावयाची वेळ आली तरी नाठी म्हणून नांवें ठेवण्याइतपतही बुद्धिचें वरदान लाभत नाही ! माता पितरांच्या बुद्धिशालित्वाचा वारसा लेकरांना मिळतोच असा नियम नाही, तेव्हा ज्ञानेश्वरांना लाभलेल्या या अलौकिक

---

*गीता ६-४३ 'त्यांत [म्हणजे पूर्वी सांगितल्याप्रकारें प्राप्त झालेल्या जन्मांत] पूर्वजन्मांतील बुद्धिसंस्कार त्याला प्राप्त होतो.'

देणगीचें कारण केवळ लौकिकांत शोधणें व्यर्थ होय हें उघड होईल. श्रीमदाद्यशंकराचार्य वयाच्या आठव्या वर्षींच चारही वेदांचे अध्ययन संपवून बाराव्यांत 'सकलशास्त्रविद्' झाले, आणि सोळाव्यांत आपलें प्रसिद्ध भाष्य करून बत्तीसाव्या अंत त्यांनी अवतारही संपविला. ज्ञानेश्वरांच्या चरित्रांतही हीच अलौकिकता दिसते. एवंच शंकराचार्य किंवा ज्ञानेश्वर यांच्या असामान्य बुद्धिमत्तेचें पहिलें कारण योगभ्रष्टाला लाभलेला पौर्वदेहिक बुद्धिसंयोग हें होय. [२९] या बुद्धिसंयोगाच्या जोरावरच आपेगांव आणि आळंदी येथे मातापितरांजवळ, त्र्यंबकेश्वरीं गैनीनाथाच्या गुहेंत

---

२९ ज्ञानदेवांच्या श्रेष्ठ योगित्वाबद्दल लिहितांना पुनर्जन्म किंवा Re-birth of Personality विषयी "There is wonderful scope for such speculation in reference to Dnyaneshwar Maharaj" असें मत Gita Explained by Dnyaneshwar Maharaj ह्या ग्रंथाचे कर्ते श्री बॅरिस्टर मनु सुभेदार देतात. या विवेचनाच्या आधारें ज्ञानदेवांच्या अति मानुषित्वाबद्दल ते लिहितात, "The educational opportunities, according to tradition, for Dnyandeo, were not in any sense extensive and yet there is the extra-ordinary grasp of great truths, and the cultivation of a distinctive style of expression and his power of logical exposition, which the writer has not come across in the literature of several languages with which he is familiar. When on top of this, there is a pretty complete treatise on practical Yoga incorporated in appropriate place in Chapter VI-a treatise which

आणि पुढे ज्या ज्या वेळीं त्यांचें सान्निध्य लाभलें तेव्हा, आणि विद्येचें माहेरघर ह्मणून नांवाजलेल्या पैठण क्षेत्रीं, या चार भावंडांचा अभ्यास झाला. शुद्धशील मातापित्यांच्या सान्निध्यांत नेमका कोणत्या विषयाचा अभ्यास या भावंडांनी केला असेल तें सांगता येत नसलें तरी संस्कृतचा प्रारंभिक अभ्यास, आणि नंतर भारत, भागवतादि ग्रंथांचें व पुराणांचें वाचन त्यांनी विठ्ठलपंताजवळ केलें असावें, असें म्हणण्यास हरकत नाही. भागवताचा ज्ञानेश्वरीवर पुष्कळच संस्कार झाला आहे.[३०] पैठणास

no novice could write and which is in itself a guide to those following the path of practical Yoga-even a twentieth century mind will have to bend in humble homage to this unique personality. On the principle that 'Jivo Brahamaiva Nāpara' which has universal acceptance in Hindu religion, the life of Dnyanadev as revealed from his work establishes in him a divinity far beyond the ordinary range of human beings. (Page 53)

३० भागवताचा व ज्ञानेश्वरीचा कांही संबंध नाही, किंबहुना भागवतग्रंथ ज्ञानेश्वरीनंतरचा आहे, असें मत कांही विद्वानांनी एकेकाळीं प्रतिपादलें होतें, त्या मतापासून आता आपण इतकें दूर आलों आहों की भागवतग्रंथ नुसता ज्ञानेश्वरपूर्वच आहे असें नव्हे तर त्या ग्रंथाचा सात्त्विक संस्कार फार मोठ्या प्रमाणांत ज्ञानेश्वरीवर झालेला दिसतो, किंबहुना भागवतधर्मीयांना ज्ञानेश्वरी मान्य होण्याचें कारण हेंच कीं भागवतांतील सिद्धांत ज्ञानेश्वरींत आले आहेत, असें मत आज उपलब्ध झालेल्या माहितीवरून सर्वमान्य होण्यास हरकत नाही. ( पहा-पांगारकरकृत मराठी वाङ्मयाचा इतिहास, खंड १ ला पृ. ५२१ ते ५२३.

आचार्यांचें महाभाष्य व शतश्लोकी, उपनिषदें,[३१] ब्रह्मसूत्रें, योगवासिष्ठ[३२] इत्यादि ग्रंथांचें वाचन झालें असावें. याच काळांत पातंजलयोग सूत्रांचा प्राथमिक अभ्यास त्यांनी आरंभला असावा. नाथपंथी साधु हे सर्व संस्कृतज्ञ किंवा पंडित नव्हते परंतु ज्ञानेश्वर उत्तम संस्कृतज्ञ होते याचा प्रत्यय कांहीं अध्यायारंभींच्या प्रास्ताविक भागावरून व त्यांनी केलेली ईश्वरस्तुति आणि गुरुस्तवनावरून येतो. **विशदबोधविदग्धा, विद्यारविंदप्रबोध, परापरप्रमदा-विलासिया, स्फुरदमंदानंदबहुला, स्वसंविद्रुमबीजप्ररोहणी,** इत्यादि अवजड, क्वचित् कर्णकटु व दुर्गम अशीं समस्त विशेषणे

---

३१ "दशोपनिषद तर त्यांच्या जिव्हाग्रीं वसत होतीं. 'भयादस्याग्निस्तपति......' ( कठोपनिषद् २-३-३ ) आणि 'भीषास्माद्वातः पवते......( तैत्तिरीय २-८ ) या दोन उपनिषद्वचनांचें स्पष्टीकरण ज्ञानेश्वरीच्या नवव्या अध्यायांत ( २८१ ते २९३ ) आलें आहे. बृहदारण्यकांतील 'स वै नैव रेमे तस्मादेकाकी न रमते स द्वितीयमैच्छत् ।' या मंत्राचें विशदीकरण म्हणजे ज्ञानदेवांच्या 'अमृतानुभवां' तील पहिलें शिवशक्तींचें प्रकरण होय. 'यस्य भासा सर्वमिदं विभाती' या कठोपनिषदांतील वचनाचा अनुवाद 'विभाति यस्य भासा । सर्वमिदं हा ऐसा । श्रुति काय वायसा । दकरू देती ॥' ( ७-२९० ) या अमृतानुभवांतील ओवींत आहे" डॉ तुळपुळेकृत 'पांच संतकवी' पृष्ठ १६.

३२ योगवासिष्ठाचा परिणाम ज्ञानेश्वरीवर क्वचित् क्वचित् झालेला आहे. त्याचा परिणाम अमृतानुभवावर जास्त झाला आहे. दोन्हींतील तत्वज्ञानांत विलक्षण साम्य आहे. 'अमृतानुभव' हें नांवही योगवसिष्ठावरूनच सुचलेलें असावें. पहा—सदर पृ. १७

केवळ अनुप्रासादि अलंकार विलास आणि संस्कृतज्ञता यांची दर्शक आहेत. [३३] 'भाष्यकारांते पूसतु' [ज्ञा.१८-१७०१] असें त्यांनी म्हटलें आहे यावरून गीतेवरील अनेक भाष्यें त्यांनी वाचलीं होतीं हें उघड आहे. [३४] तेराव्या अध्यायांत सुमारें ६० ओंव्यांमधून सांख्यशास्त्राचा संक्षेपाने विचार केला आहे. अध्यात्मविद्येचा प्राचीनतम लेख म्हणून समजलें गेलेलें, उपनिषदांतील ब्रह्मविद्येसही आधारभूत झालेलें, ऋग्वेदाच्या दहाव्या मंडलांत आलेलें जें प्रसिध्द नासदीय सूक्त, त्यांतील दुसऱ्या ऋचेचें जणु रूपांतरच ' अहोरात्रींचा पैलकडु.......... ' ।। ज्ञा. १६-१६ ।। इत्यादि ओवींत केलेलें दिसतें. [३५] 'बादिचें ब्रह्मसूत्र। देखणेपणें पवित्र । ........' ज्ञा. १३-६९, इत्यादि उल्लेखांत ब्रह्मसूत्राचें वाचन सूचित आहे. पुराणांचा उल्लेख ' पुराणें इयें विखीं । मत पत्रिका ' असा ज्ञा. १३-६७ मध्ये व इतरत्र आहे. ' व्यासांचा मागोवा घेंतु ' असा ज्ञा. १८-१७०१ मध्ये

---

३३ पहा—न. चिं. केळकरकृत 'ज्ञानेश्वरी सर्वस्व' पृष्ठ २५३-२५४

३४ ' भाष्यकारांतें ' या शब्दांतील ' रा ' वर अनुस्वार आहे किंवा नाही हा एक वादाचा विषय झाला आहे. राजवाडे प्रतींत तो आहे. डॉ. पेंडसे यांनी एकंदर २१८ स्थळांची तुलना करून भाष्यकार म्हणजे केवळ शंकराचार्यच असें सिद्ध केलें आहे. ( पहा—श्रीज्ञानेश्वरांचें तत्वज्ञान पृ. १६६-१६८ ) त्या अनुरोधाने ' रा ' वरील अनुस्वार बहुमानार्थी समजावा लागेल. ३५ पहा.—डॉ. तुळपुळेकृत ' पांच संतकवी ' पृ. १६

केलेल्या व्यासऋणाच्या स्पष्ट निर्देशाशिवाय पहिल्याच अध्यायांत २८ ते ४९ या ओव्यांत परमार्थाची जन्मभूमि, कलाकौतुकांचें जन्मस्थान, प्रत्यक्ष चातुर्यास शिक्षण देऊन शहाणें करणारी शाळा, असा व्यासकृत महाभारताचा गौरवपर उल्लेख करून शेवटीं व्यासमहर्षीचें थोरपण थोडक्यांत सांगण्याकरिता 'व्यासोच्छिष्टं जगत्रयं' चे अनुस्वार उडवून मराठी अनुवाद केला आहे.

ज्ञानेश्वरांचे प्रत्यक्ष अध्यापक गुरु कोण हें कळण्यास साधन नाहीं, परंतु निवृत्तिनाथाचा गुरु म्हणून त्यांनी केलेला उल्लेख केवळ शिष्टाचारापुरता नाहीं. अनन्यगतिक भक्ति आणि श्रध्दा यांचा तेथे आढळ होतो. आपलें सारें कर्तृत्व केवळ गुरुकृपेचें फळ आहे अशी त्यांची अव्यभिचारी निष्ठा आहे. निवृत्तिनाथ जन्माने त्यांचे थोरले भाऊ आणि परंपरेने दीक्षागुरु होते. निवृत्तिनाथांचे गुरु श्री गैनीनाथ ( गहिनीनाथ ) यांजजवळ हठयोगाचा अभ्यास निवृत्तिनाथाने केला असला पाहिजे. त्या हठयोगाचा पातंजल योगशास्त्रानुसार संपूर्ण अभ्यास ज्ञानेश्वरांनी केला होता असें सहाव्या अध्यायांतील योगप्रक्रियावर्णन सिध्द करतें. अधिकारवाणीचें तेज असलेली ही माहिती केवळ ऐकीव असूं शकत नाहीं. हें ज्ञान त्यांनी गुरूपासून सक्रिय, सप्रयोग समजून घेतलें असलें पाहिजे.[३६] गैनीनाथाजवळ व निवृत्तिजवळ, पहिले पाठ पढून पुढे स्वतंत्र बुध्दिने हा अभ्यास त्यांनी वाढविला

---

३६ पहा —प्रा. ग. स. दीक्षित कृत 'ज्ञानेश्वरींचें शास्त्रीय मंथन'

असावा. पाठीवर मांडे भाजण्याचा यौगिक चमत्कार त्यांनी [३७] केल्याचा उल्लेख मागे आलाच आहे. प्रा. गं. स. दीक्षितांनी ज्ञानेश्वरांना ' आयुर्वेदही पूर्ण अवगत होता असें मत आपल्या ' ज्ञानेश्वरीचें शास्त्रीयमंथन ' या पुस्तकांत दिलें आहे, तें मात्र बरोबर नाही असें न. चिं. केळकर यांचें मत आहे. [३८] ज्ञानदेवांच्या शिक्षणासंबंधाने श्री. पांगारकर म्हणतात, 'तैसी दशेची वाट न पांता । वयसेचिया गावां नैयंतां । **बालपणीं चि सर्वज्ञता । वरी तेयातें** ॥ तिये सिध्द प्रज्ञेचेनि लोभें । मन चि सारस्वतें दुभे । मग सकल शास्त्रें स्वयंभें । निगति वाचें ॥ [३९] अशा सिध्द कोटींतील ते सिध्दप्रज्ञ होते....सामान्य पंडित ग्रंथाध्ययनानंतर म्हणजे परोक्ष ज्ञानानंतर अपरोक्षानुभव पाहतात पण शंकराचार्य किंवा ज्ञानेश्वरमहाराज त्या विरळ कोटींतील महात्मे गुरुकृपेने आधी अपरोक्षानुभवसंपन्न होतात, आणि स्वानुभवाच्या दृष्टीने मग अध्यात्मग्रंथ पहात असतात ........' [४०]

## २९ ज्ञानेश्वरांची गुरुपरंपरा आणि शिष्यपरंपरा.

ज्ञानेश्वर नाथपंथी होते असें त्यांनी स्वतःच दिलेल्या **'गुरुक्रम'** संबंधीच्या ओव्यांवरून उघड होतें, मात्र नाथपंथाचें

---

३७ कांही आख्यायिकांतून हा चमत्कार सोपानदेवाने केल्याचा उल्लेख आढळतो. ३८ पहा -- न. चिं. केळकरकृत ' ज्ञानेश्वरी सर्वस्व' पृ. २७४,२७५, ३९ ज्ञानेश्वरी ६ —४५१, ४५२. ४० पहा— पांगारकरकृत ' ज्ञानेश्वरमहाराज ' पृ. ८४, ८५

'कानफाटे' नावानें ओळखलें जाणारें स्वरूप हें मूळचें किंवा ज्ञानदेवकालीन नव्हे हें येथे लक्षांत ठेवलें पाहिजे. ( याचा सविस्तर विचार पुढे केला आहे. ) ज्ञानेश्वरांनी आपली गुरु-परंपरा पुढील ओव्यांतून दिलेली आहे. ( अध्याय १८ ओवी १७३० ते १७४२ )

क्षीरासिंधुपरिसरीं । शक्तिचां कर्णकुहरीं ।
तेणें* कैं श्रीत्रिपुरारी । सांघितलें जें ॥१७३०॥
तें क्षीरकल्लोळा आंतु । मकरोदरिं गुपितु ।
होंता तयाचा हातु । पैठें जालें ॥ १७३१ ॥
तो मछप्रसवसंगी । भग्नावयव चौरंगी ।
भेटला तो सर्वांगिं । संपूर्ण जाला ॥ १७३२ ॥
मग समाधि अव्यया इया । भोगाचा वास नां इया ।
ते मुद्रा श्रीगोरखराया । दिधली मीनीं ॥ १७३३ ॥
तेणें योगाब्जिनी सरोवरु । विषयविध्वंसैक वीरु ।
तिये पदीं कां सर्वेश्वरू । अभिषेकिला ॥ १७३४ ॥
मग तेहीं तें शांभव । अद्वयानंद वैभव ।
संपादिलें सप्रभाव । श्री गायणिनाथीं ॥ १७३५ ॥
तेणे कलिकलितभूतां । आला देखौनि निरुता ।
आज्ञा श्रीनिवृत्तिनाथा । दीधली ऐसी ॥ १७३६ ॥
अनादिगुरुशंकरा । पासौनि शिष्य परंपरा ।
बोधाचा हा सवंसारा । । जाला आमतें ॥ १७३७ ॥

---

* पाठभेद ' नेणों '.

तो हा घेउनि आघवा । कलि गीलितेयां जीवां ।
सर्व प्रकारिं धावा । करी पां वेगां ॥ १७३८ ॥
आधिं तो तवं कृपालु । वरि गुरुआज्ञेचा बोलु ।
जाला जैसा वरिषाकालु । खवणलें मेघां ॥१७३९॥
मग आर्त्तांचेन ऽ॰ रसें । गीतार्थ ग्रंथनामिसें ।
वरिखला शांतरसें । तो हा ग्रंथू ॥ १७४० ॥
तेथ पुढां मी बापिया । मांडलां आर्त्तं आपुलेया ।
कीं यया साठिं यवडेया । आणिलां यशा ॥ १७४१ ॥
एवं गुरूक्रमें लाधलें । समाधिधन जें आपुलें ।
तें ग्रंथिं बांधौनि दीधलें । गोसावीं मज ॥ १७४२ ॥

**भावार्थः**—क्षीरसागराच्या परिसरांत श्रीत्रिपुरारीने (आदिनाथ शंकराने) शक्तीच्या ( पार्वतीच्या ) कानांत केव्हांतरी ( फार पूर्वी ) सांगितलेलें ज्ञान क्षीरसागरांतील एका मत्स्याच्या पोटात गुप्त रूपाने असणाऱ्या ( श्रीमहाविष्णूस उर्फ ) मत्स्येंद्रनाथास प्राप्त झालें. त्या ज्ञान प्रभावाने त्याने सप्तशृंग पर्वतावर आढळलेल्या भग्नावयव चौरंगीस सावयव संपूर्ण केलें. मग भोगशून्य अव्यय समाधिसुखाची आपली मुद्रा मत्स्येंद्राने योगकमलिनीचें जणु प्रत्यक्ष सरोवर असणाऱ्या, विषयविध्वंस करणाऱ्या ( शूर ) विरागी गोरक्षास दिली. ते शंभूपासून निघालेलें[४१] अद्वैतज्ञान,[४२] ज्ञान सामर्थ्यासह[४३] श्रीगायणीनाथांनी

---

४१, ४२, ४३, येथील शब्दांचे अर्थ नीट न समजल्याने सन १८८४ साली 'पुणें वैभव' छापखान्यांत छापलेल्या आणि ग्रंथकाराचे नांव नसलेल्या एका 'आळंदी येथील प्रसिद्ध साधु, कवि

गोरक्षा पासून संपादिलें, आणि कलिग्रस्त जीवांच्या उद्धारार्थ "अनादिगुरु शंकरा पासून आम्हांप्रत परंपरेने आलेल्या ह्या ज्ञान विस्तारासह ( बोधैश्वर्यासह ) धावून जा " अशी श्रीनिवृत्तीस आज्ञा केली. निवृत्ति आधीच कृपाळू आणि त्यांत गुर्वाज्ञा झालेली ! वर्षाकाळांत मेघांनी खवळून खूप पाऊस पाडावा त्या प्रमाणे आर्त प्रेमामुळे गीतेचा अर्थ सांगण्याच्या मिषाने त्यांनी मग शांतरसाचा वर्षाव सुरु केला. तो वर्षाव म्हणजेच हा भावार्थ दीपीका ग्रंथ होय. (त्या शांतरसाचें प्राशन करण्यांत आढळलेली) माझी आर्त चातकवृत्ति पाहून (पारितोषिक म्हणूनच की काय) वरील **गुरुक्रमाने** लाभलेलें समाधिधन ग्रंथांत निबद्ध करून त्यांनी मला दिलें. एवंच ह्या ग्रंथनिर्मितीचें भव्य यश त्या सद्गुरूने मला मिळवून दिलें आहे.

या ओव्यांतून एक शक्ति (हिलाच पुढे उदोनाथ म्हणत,) [४४] व दुसरा चौरंगीनाथ सोडला, तर ज्ञानेश्वर आपल्या वैयाक्तिक

---

व तत्ववेत्ते श्रीज्ञानेश्वर महाराज यांचें चरित्र ' या नांवानें प्रसिद्ध झालेल्या चरित्रांत पृष्ठ ३८ वर ' शांभव ' हा गोरक्षाचा पट्टशिष्य, त्याचा ' अद्वयानंद ' हा शिष्य, या अद्वयानंदाचा ' प्रभव ' हा शिष्य आणि या प्रभवाचा शिष्य गैनीनाथ होय अशी माहिती दिली आहे ! ! ग्रंथास बारा ओळींची एक प्रस्तावना आहे व तींत सदहु ग्रंथ पूर्वी ' तत्त्वविवेचक ' मासिकांत येऊन गेल्याचा उल्लेख आहे.

४४ पहा महाराष्ट्रीय ज्ञानकोश ( केतकर ), ' न ' पृष्ठ १९६

परंपरेपलीकडे माहिती देत नाहीत असें दिसतें. हा 'गुरुक्रम' थोडक्यांत असा सांगतां येईल:–




ज्ञानदेवाच्या गुरुपरंपरेंत जसे सर्वत्र ' नाथ ' दिसतात. त्याप्रमाणे त्यांच्या शिष्य परंपरेंतही ' नाथ ' मंडळी आहेत. हा नाथ संप्रदाय मूळच्या भागवत किंवा नारायणीय धर्माहून भिन्न आहे किंवा कसें याचा विचार करण्यापूर्वी श्री ज्ञानदेवांचें पुढील चरित्र अवलोकन करूं या.

## ३० ज्ञानेश्वरीची जन्मभूमि, 'जेथ जगाचें जीवनसूत्र'

पैठण, आळंदी, आपेगांव, नेवामें इत्यादि ठिकाणी शके १२०९ ते १२१२ च्या दरम्यान हीं भावंडें रहात

असावींत. रेड्याच्या मुखाने वेद वदविण्याचा आणि ब्राह्मणाच्या घरीं श्राद्धदिनीं मृत पितर प्रत्यक्ष जेवावयास बसविल्याचा, असे दोन चमत्कार पैठणास घडल्याचें सांगतात, तर पाठीवर मांडे भाजल्याचा चमत्कार आळंदीस झाल्याचा उल्लेख आहे या दोन चमत्कारापेक्षा अधिक महत्वाचा असा चमत्कार नेवाशांतील होय. नेवासें येथे हीं भावंडें गेलीं असतांना नेवाशाचा कुळकर्णी '**सच्चिदानंद**' या नांवाचा होता, तो मृत झाल्याचें वर्तमान यांना समजलें. त्याची पत्नी शवाभोंवतीं आक्रोश करीत होती. सकारुणिक होऊन ज्ञानेश्वरांनी त्या शवावरुन हात फिरविला आणि तें शव उठून बसलें! ज्ञानेश्वरींचा 'आदर्श लेखक' झालेला 'सच्चिदानंद बाबा' हाच. पुनर्जन्म मिळालेला हा पुरुष ज्ञानदेवास सर्वभावें शरण गेला असल्यास नवल नाही. ज्या गांवीं ही घटना घडली तें नेवासें गांव ह्या चमत्कारावरिता नसलें तरी '**ज्ञानेश्वरीची जन्मभूमि**' म्हणून पवित्र क्षेत्र समजलें जातें. या क्षेत्रास महालयाक्षेत्र, म्हाळसापूर इत्यादि नांवें आहेत. प्रवरानदीचे कांठावर हें गांव वसलें असून गांवाच्या पंचक्रोशींत इतर क्षेत्रें आहेत आणि जवळच प्रवरा आणि गोदावरी यांचा संगम झालेला आहे, त्यामुळे गोदावरीच्या दक्षिण तीरावरील पंचक्रोशीक्षेत्र असें या क्षेत्रास ज्ञानेश्वरांनी संबोधलें आहे. या क्षेत्रांत

मोहिनीराजाचें[४५] मंदिर असून तेथेच एका खांबास* टेकून ज्ञानेश्वरांनी आपल्या ज्ञानेश्वरी ह्या अप्रतिम ग्रंथाची रचना केली. ज्ञानेश्वरी ही संतसज्जनांच्या मेळाव्यांत प्रवचनरूपाने सांगितली असावी असें तिच्यांतील वर्णनावरून वाटतें. एका बाजूला उच्चासनावर सद्गुरु श्रीनिवृत्ति आणि लहान भावंडें, आणि दुसऱ्या बाजूला व पुढे इतर संतगृहस्थादि श्रोतेजन बसलेले आहेत, श्रीज्ञानदेव आपल्या निर्मल वाणीने प्रवचनाची गंगा दुथडी भरून वाहवीत आहेत, श्रोते निमज्जन करून डुलत आहेत, निवृत्ती मात्र स्थितप्रज्ञासारखे बसून अद्वयानंदांत निमग्न होत्साते मधूनच कांही किरकोळ सूचना प्रवचनकर्त्यास देत आहेत, असें दृश्य वाचका-

---

४५ 'मोहिनीराज' हें पुरुषवाचक नांव असलें तरी मोहनी-राजाच्या मूर्तीच्या हातांत बांगडया असतात. अंगात चोळी असते. याचें कारण असें की समुद्रमंथनाच्या वेळीं दानवांना अमृत मिळूं नये या उद्देशाने त्यांना भुरळ पाडण्याकरिता मोहिनीच्या रूपाने आलेला विष्णु म्हणजेच मोहिनीराज होय. म्हणून नांव पुरुषवाचक आणि बाह्यवेष स्त्रीवाचक असें हें रूप आहे. या मोहिनीराजास 'महालया' किंवा म्हाळसा म्हणतात. यास्तव नेवासें म्हणजेच महालयाक्षेत्र किंवा म्हाळसापूर होय.

* ज्या खांबाजवळ बसून ज्ञानेश्वरांनी ज्ञानेश्वरी लिहिली त्याठिकाणी एक भव्य स्मारक श्री ज्ञानेश्वर मंदिर जीर्णोद्धार मंडळी, नेवासें, ह्या संस्थेकडून व्हावयाचें असून इ. स. १९४९ सालीं तेथील मंदिराची कोनशिला ह. भ. प. प्राचार्य सोनोपंत दांडेकर यांच्या हस्तें बसविण्यांत आली.

पुढे जिवंतपणे उभें करावयाचे सामर्थ्य ज्ञानेश्वरांच्या चित्रस्पष्ट शैलींत आहे. असो. ह्या ' महालया ' स ' जगाचें जीवनसूत्र ' म्हणून ज्ञानदेवांनी पूजिलें आणि त्याच्या चरणाशीं बसून त्यांनी महाराष्ट्राकरिता **आध्यात्मिक जीवनसूत्राचा आदर्श** निर्माण केला.

## ३१ ज्ञानेश्वरीच्या स्थलकालाची चर्चा.

ज्ञानेश्वरीमध्ये ज्ञानेश्वरी कोठे लिहिली या संबंधीचा स्पष्ट उल्लेख केलेला आहे तसा काळाचा उल्लेख केलेला नाही, व जो आहे तो केवळ ' कलियुगांत ' (केव्हातरी) इतका मोघम आहे. मात्र काळाचा अधिक निश्चित असा उल्लेख स्वतः ज्ञानेशांनी केला नसला तरी सच्चिदानंद बाबांच्या कोणा चाहत्याने केलेला आहे. स्थलकालासंबंधीच्या ओव्या पुढे दिल्या आहेत.

ऐसें युगीं वरि कली । आणि महाराष्ट्रमंडलीं ।
श्री गोदावरिचां कुलीं । दक्षिणिलीं ॥ ज्ञा. १८-१७८१ ॥
तेथ भुवनैक पवित्र । अनादिपंचक्रोशक्षेत्र ।
जगाचें जीवनसूत्र । जेथ श्रीमहालसा ॥ १८-१७८२ ॥

कालदर्शक ओवीः—

शके बाराशतें बारोत्तरें । तैं टीका केली ज्ञानेश्वरें ।
सच्चिदानंद बाबा आदरें । लेखक जाला ॥

वरील ओव्यांवरून ज्ञानेश्वरीची रचना नेवासें येथे झाली ही गोष्ट सिद्ध आहे परंतु ज्ञानेश्वर एक का अनेक असा वाद माजला

असतांना अनेक ज्ञानेश्वर मानण्याकडे प्रवृत्ति असलेल्यांना ज्ञानेश्वरी नेवासेंतच लिहिण्यांत आली हें मत अमान्य होतें. आज तो वाद शमल्यासारखा दिसला तरी वाङमयीक वाद हे नेहमीच चिरंजीव होत असल्याकारणाने पुढे पुन्हा तो वाद डोकें वर काढणार नाही असें नाही. महालयाक्षेत्राच्या उल्लेखाची वरील ओवी आज प्रक्षिप्त मानण्याचें कांही कारण दिसत नाही, आणि जोपावेतो ती प्रक्षिप्त आहे असें ठरत नाही तोपावेतो तिच्यांतील अर्थ आणि त्या अर्थाची रूढ समजूत चुकीची गणावयाचें कारण नाही.

स्थलाची निश्चिति अशी सांगता येते, परंतु कालाची निश्चिती वरील ओवीवरून नीट होत नाही. कारण साधारणत: जुन्या पोथ्यांतून आपला ग्रंथ ज्या दिवशीं लिहून झाला असेल त्या दिवसाचा वार, तिथि, महिना, शक आणि संवत्सरनाम इतक्या गोष्टी निदान पक्षीं देत असत. परंतु एका शकाशिवाय इतर कोणताही तपशील वरील ओवीचा लेखक देत नाही. याचीं कारणें अनेक असूं शकतात. कदाचित् ज्ञानदेवोत्तर कालीं केव्हातरी होऊन गेलेल्या कोणा सच्चिदानंदबाबाने ही पोथी लिहिली असेल व त्या वेळीं नक्की वार, तिथि, माहित नसल्याने केवळ शकच त्याने लिहून ठेवला असेल. पण असें समजावयाचें तर 'हा सच्चिदानंद बाबा तोच की ज्याने ज्ञानेश्वरीटीका टीका-कर्त्याच्या प्रत्यक्ष मुखाने ऐकून लेखनकामाठी केली,' ही रूढ

समजूत आणि ज्ञानेश्वराने मृतास सजीव केल्याचा त्याच्याबद्दलचा चमत्कार, दोन्ही खोटें असें म्हणावें लागेल. परंतु तसें खोटें समजण्याकरिता महत्वाचा असा इतर पुरावा पुढे येत नाही तो पावेतो हा 'सच्चिदानंदबाबा' नेवाशाचा मृत कुळकर्णीच होय असें मानावयास हरकत नाही आणि तोच हा ओवीचा लेखक असल्यास [४६] त्याने तिथिवाराचा उल्लेख कां गाळला ह्याचें कारण सांगण्याइतकें संशोधन अद्याप व्हावयाचें आहे असा निष्कर्ष काढणें सोयीचें होईल. कोणी सांगावें, कदाचित् तिथि, वार लिहिलेली वरील ओवीच्यावर शोभू शकणारी एखादी सच्चिदानंदाचीच ओवी पुढे मागे उपलब्ध होईल देखील !* परंतु अशा समजावणीपेक्षा कै. राजवाडे यांचा निष्कर्ष अधिक युक्त वाटतो. ते म्हणतात, "ती ओवी ज्ञानदेवानंतर कोणीतरी रचलेली आहे, आणि तीही सच्चिदानंद बाबाने नव्हे तर सच्चिदानंदानंतरच्या त्याच्या कोणा चाहत्याने लिहिली असावी." [४७] ( शिवाय ह्याच

---

४६ प्रा. मा. दा. आळतेकर यांचे हें मत आहे. पहा—'श्रीज्ञानदेव' पृ. ६२ * या ओवीपुढे ९२ चा आकडा असून, राजवाडे प्रतींत शेवटच्या ओवीपुढे ८८ चा आकडा आहे. या दोन आकड्यांमधील आकड्यांच्या ओव्या असू शकत नाही काय ?

४७ पहा राजवाडे संपादित ज्ञानेश्वरीची प्रस्तावना, पृ. ६८. राजवाडे यांनी सदर्हु ओवी ज्ञानेश्वरशिष्य सच्चिदानंदाची नाही हें दाखविण्याकरितां 'बाबा' हें रूप त्याकाळीं प्रचलीत नसून 'बावा' हें रूप होतें हें कारण दिलें आहे. तसेंच 'वप्पा > बप्पा > बावा >

सच्चिदानंदाची असती तर त्याने निश्चित तिथि, वार, मास इत्यादि लिहिलें असतें. )

अशा विचारावरून वरील ओवीचा लेखक सच्चिदानंदबाबा नंतरचा कोणी तरी आहे असें मान्य झालें म्हणजे तिथी-वाराच्या गळलेल्या उल्लेखाच्या कारणांचाही बोध होतो, आणि वर म्हटल्याप्रमाणे सच्चिदानंद बाबाच्या चमत्कारास खोटें म्हणावयाचें ही कारण उरत नाही.

शके १२१२ ह्या काळाचेंही दुसरें एक प्रमाण ज्ञानेश्वरींतच आहे व ते स्थलदर्शक ओवीच्या पुढील ओवींत सांपडतें.

तेथ इंदुवंशविलासु । जो सकलकलां निवासु ।<br>
न्यायातें पोखीत क्षितीशु । श्रीरामचंद्रु ॥ज्ञा. १८-१७८३ ॥

ह्या ओवींतील श्रीरामदेवराय यादव हा राजा 'शके १२१२ मध्यें गादीवर होता. हा उल्लेख निर्णायक नसला तरी ' शके

---

बापा > बाबा अशी परंपराही दिली आहे. ही परंपरा मान्य करतां येत असली तरी ज्ञानेश्वरकालीं ' बाबा ' रूप नव्हतेंच असें त्यांनी सिद्ध केलेलें नाही, उलट शके ११९५ च्या म्हणजे ज्ञानेश्वरी रचनेच्या पूर्वी १७ वर्षें लिहिल्या गेलेल्या पंढरपूरच्या चौऱ्यांशीच्या शिलालेखांत ' बाबा ' असें रूप आलेलें आहे, इत्यादि कारणें देऊन " ही ओवी म्हणजेच ' लेखनसीमा ' व सच्चिदानंद बाबाचें ' मोर्तबसूद ' मानावयास हरकत नाही " असें डॉ. रा. ग. हर्षे यांनी स्वसंपादित ' ज्ञानदेवी'च्या प्रस्तावनेंत पृष्ठ ७ वर सिद्ध केलें आहे.

१२१२ हा निर्मिती शक आहे ' या रूढ समजुतीस पोषक खास आहे.

## ३२ ज्ञानेश्वरीचें ' बारसें ' कोणी केलें ?

श्रीज्ञानेश्वरांनी श्रीमद्भगवद्गीतेवरील आपल्या महान् टीकेस कोणतेंही नांव दिलेलें नाही, तेव्हां त्यांच्या ग्रंथास मिळालेल्या ' **भावार्थ दीपिका**, ' '**ज्ञानदेवी**' किंवा '**ज्ञानेश्वरी**' इत्यादि नांवांचा उगम शोधावयास हवा. संस्कृत ग्रंथांतून ' इतिश्री ' ची स्वतंत्र ओळ ग्रंथाच्या शेवटीं संस्कृतांतून असते त्याप्रमाणेच प्राकृत ग्रंथांतूनही एरवी प्राकृताचा अभिमान कितीही असला तरी इतिश्रीची ओळ संस्कृतांतूनच देण्याची पद्धत असे. विवेकसिंधु, एकनाथी भागवत, दासबोध, श्रीगुरुचरित्र इत्यादि मान्यवर ग्रंथांतही ही रूढी पाळलेली दिसते. स्वतः ज्ञानेश्वरांच्या 'अनुभवामृता'तही ही रूढी आहेच; परंतु ज्ञानेश्वरींत मात्र नाही. साखरेबुवा, आठले, इत्यादिकांच्या प्रतींतून अध्यायांतीं ' इतिश्री ज्ञानदेव विरचितायां **भावार्थ दीपिकायाम्**....' अशी ओळ असली तरी प्राचीनतम समजल्या गेलेल्या राजवाडे प्रतींत आणि इतर कित्येक प्रतींतून ही ओळ नाही. शिवाय अशी ओळ स्वतः ज्ञानेश्वरांनी घातलेली असती तर त्या ओळींतील ' **भावार्थ दीपिका** ' हें ग्रंथनाम त्यांनी आठहजार आठशें च्याण्णव ओव्यांपैकी एकींतही कोठे घातलें नसतें काय ? ' हा **भावार्थु** आतां न बोलावा ' ( ज्ञा. ३-१७ ), ' हा

**गीताभाव** निका ' ( ज्ञा. २-५११ ), '**भावार्थाचें** गिरिवरू ' ( ज्ञा. १२-११ ) इत्यादि ठिकाणीं आलेले शब्द ग्रंथनामवाचक नाहीत, फार झाल्यास त्यांत ग्रंथनाम सूचना आहे असें म्हणतां येईल. ज्ञानदेवाचे शिष्य विठोबा खेचर याच्या एका अंभगांत '**भगवद्गीता टीका । केली भावार्थ दीपिका** ' असें म्हटलें आहे, व यावरून '**भावार्थदीपिका** ' या नांवाने हा ग्रंथ ओळखला जात असावा असें अनुमान करतां येतें. '**ज्ञानदेवी** ' आणि '**ज्ञानेश्वरी** ' हीं नांवेंही ज्ञानेश्वरांनी स्वत: कोठेच उल्लेखिलेली नाहीत, एवढेंच काय पण त्यांच्या भावंडांच्या वाङ्मयांतही हीं नांवें नाहीत, तत्कालीन संत मंडळांतही ' मराठी गीतादेवी ', ' गीते वरील टीका, ' ' प्राकृत टीका ', ' देश भाषा टीका ' इत्यादि नांवें रूढ होतीं. तत्कालीन पद्धतीप्रमाणे टीकाकर्त्याच्या नांवास 'ई'कार जोडून टीका ग्रंथाचे नांव रूढ होऊं शके, किंवा स्वत: टीकाकार तें नांव देई. जसें ' सोपानदेवी ', ' श्रीधरी, ' ' वामनी, ' ' मुक्तेश्वरी ' इत्यादि. या पद्धतीस अनुसरून **ज्ञानेश्वरी** आणि **ज्ञानदेवी** हीं नांवे रूढ झालीं; भक्तश्रेष्ठ नामदेवाने '**मराठी गीतादेवी** ' या उल्लेखाप्रमाणेच '**नामा म्हणे ग्रंथ श्रेष्ठ ज्ञानदेवी,** ' '**गीतालंकार, नाम ज्ञानेश्वरी** ' किंवा ' जाऊनि ज्ञानेश्वर बैसले आसनावरी । **पुढे ज्ञानेश्वरी ठेवियेली,** ' असे उल्लेख केले आहेत. श्री स्वामी एकनाथांनी

पुढे तीनशें वर्षांनी संशोधलेल्या आवृत्तीच्या शेवटीं समारोपांत '**ज्ञानेश्वरी**' असाच उल्लेख केला आहे.

वर '**भावार्थ**' शब्दाविषयींचे जसे कांही उल्लेख उद्धृत् केले आहेत तसेच '**गीतार्थ**' शब्दाविषयींचेही उल्लेख ज्ञानेश्वरींत आहेत. 'जे मी **गीतार्थ** कवळू पहे' (ज्ञा. १-६६), 'गीतार्थु हा निका। ज्ञानदेव म्हणे आइका' (ज्ञा. ४-२२२), 'जो **गीतार्थाचे** करा। परगुणें संता' (ज्ञा. १८-१५१३), 'या कारणें मियां **गीतार्थु मऱ्हाटिया**। केला....' (ज्ञा.१८-१७१४), 'मग आर्त्ताचेन ॐ रसें। **गीतार्थग्रंथन मिसें**। वरिखला शांत रसें। तो हा ग्रंथू॥' (ज्ञा.१८-१७४०) हे आणि या सारखेच कांही इतर उल्लेख उद्धृत करून श्री. अ. बा. रसाळ म्हणतात, "प्रसंगानुरूप अनेकवार उच्चारलेल्या, योजलेल्या '**गीतार्थ**' शब्दावरून तो ग्रंथनाम-संकेत असावा असें स्पष्ट दिसतें."[४८] श्री. रसाळांचे सर्व उल्लेख बारकाईने व ससंदर्भ तपासतां असे दिसतें की केवळ ग्रंथनामवाचक असा त्यांत एकही उल्लेख नाही, आणि पूर्वी उल्लेखिलेल्या 'भावार्थ' शब्दांतील सूचना म्हणजे ग्रंथनाम ज्याप्रमाणे नव्हे त्याचप्रमाणे वरील उल्लेखांत कदाचित् अंतर्भूत असलेली सूचना म्हणजेही ग्रथनाम नव्हे. एकूण, सदरहू ग्रंथ-

---

४८ श्री ज्ञानेश्वर दर्शन भाग १ ला, साहित्यखंड, पृ. १६७ पहा.

राजास ज्ञानेश्वरांनी स्वत: दिलेलें कोणतेही नांव न आढळल्याने मित्रवर नामदेवाच्या अभंगांत आलेली ज्ञानेश्वरी, ज्ञानदेवी हीं दोन आणि शिष्यवर विसोबा खेचर याच्या अभंगांत आलेलें– ‘भावार्थदीपिका’ हें तिसरें अशीं तीन नांवें आजतागायत चालत आलीं आहेत असा निष्कर्ष निघतो.

## ३३ ज्ञानेश्वरीच्या कालासंबंधी प्रा. फाटकांचें नवीन मत. मत अग्राह्य.

ज्ञानेश्वरीच्या पाठीवर जन्माला आलेल्या ग्रंथसंततिचा विचार करण्यापूर्वीं येथे प्रा. न. र. फाटक यांच्या मताचा उल्लेख केला पाहिजे. ज्ञानेश्वरीचा काळ शके १२१२ हा त्यांना अमान्य नाही, परंतु ही ज्ञानेश्वरी लिहीण्यापूर्वीच त्यांनी नामदेवासमवेत तीर्थयात्रा केल्या आणि त्यावेळीं उत्तर हिंदुस्थानाच्या भूभागांत मुसलमानांनी घातलेला हैदोस, मांडलेला उच्छेद, हिंदूंची राजकीय, सामाजिक आणि धार्मिक अवकळा हें सारें पाहिल्यावर ‘कलिकालित भूतां’चा उद्धार करण्याकरिता कळवळून जाऊन त्यांनी ज्ञानेश्वरी लिहिली व तींत प्राप्त परिस्थितींत योग्य ठरणारा बोध केला असे त्यांचे मत आहे. ते म्हणतात, “... तार्थें उध्वस्त झालीं, देवळें जमीनदोस्त होऊन त्यांच्या जागीं प्रचंड मशिदी उभारल्या गेल्या, धर्मग्रंथांच्या अभ्यासाचे आखाडे उधळले, या स्थितीमध्ये निराशेच्या आहारीं न जातां हिंदुसमाज आपलें स्वत्व कसें कायम राखील, या काळजींतून ‘ज्ञानेश्वरी’

ग्रंथ जन्मास आलेला आहे ....... या तीर्थयात्रेमुळे त्यांना उत्तरेकडील मुसलमानी राज्यपद्धतीचे संकटाची कल्पना उत्कृष्ट प्रकारें येऊन स्वजनांच्या उध्दाराची कळकळ अधिक तीव्रता पावली असावी ........ नंतर त्यांनी गीतेची टीका लिहिली असणें जास्त संभाव्य व सयुक्तिक वाटतें ........मुसलमानांचे आक्रमण यशस्वी होण्याला हिंदु समाजांतील स्वार्थ कारणीभूत असल्याचें रहस्य तीर्थयात्रेच्या निमित्तानें आकलन केल्याप्रमाणे ज्ञानेश्वरांनी गीतेची टीका तयार केली आहे ........,,[४९]

## ३४ मत अग्राह्य; कारण १ लें-ग्रंथनिर्मितीस तीर्थांचा प्रवास आवश्यक नाही.

जो 'उपकारापुरता' च उरला आहे अशा ज्ञानेश्वरासारख्या महात्म्यास लोकाकरिता कळकळ वाटणें हें केवळ साहजिकच नसून त्यांच्या महात्मेपणाचे एकमेव लक्षण आहे, आणि ज्ञानेशांना हें लक्षण शंभर टक्के लागू पडतें. ज्या समाजाने त्यांची छी:थू केली आणि त्यांना माणसांतून उठविलें त्या समाजाचा सूड न घेतां, एवढेच काय पण कधी अधिक्षेपही न करतां त्यांच्या अज्ञानास हंसून तें दूर करण्याकरिता झटणाऱ्या, अपकारांची फेड उपकाराने करणाऱ्या ज्ञानेशांची ही कळकळ किती तीव्र असावी हें आपणास सहज कळूं शकतें. आजूबाजूच्या समाजांतील अज्ञानाचें कारण, तत्कालीन चुकीच्या धर्मसमजुतींत

४९ पहा ज्ञानेश्वर आणि ज्ञानेश्वरी पृ. १०५, १०७ व ११०

होतें हें त्यांना कळल्यानेच सद्धर्माची शिकवण त्यांनी दिली. परचक्रांचे अरिष्ट प्रत्यक्ष आलें नसलें तरी येईल किंवा येऊं शकेल हें त्यावेळी उत्तरेकडून येणाऱ्या निर्वासितांच्या लोंढ्यावरून त्यांना कळूं शकणें अशक्य नव्हतें. दुर्दैवाने आजच्या भारताच्या फाळणीनंतर उद्भवलेल्या भीषण परिस्थितींत पाकिस्तानांतून हिंदुस्थानांत येणाऱ्या निर्वासितांची करुण कहाणी सामान्य जनतेस प्रत्यही ऐकावी लागत आहे. आंधळेपणा हा भक्तिप्रमाणे राजकारणांत ही त्याज्यच होय, पण हटवादीपणाने डोळस असून डोळे बांधून न घेतले तर मात्र आजचा हृदय जागेवर असलेला कोणताही भारतीय पाकिस्तानांतुन येणाऱ्या निर्वासितांची खरी परिस्थिती जाणतो आणि जाणून शोक विव्हल होतो. परिस्थिति जाणण्याकरितां त्याला स्वतःला पाकिस्तानांत जाण्याची आवश्यकता नसते. ही जर कोणाही माणसाची परिस्थिति तर मेणाच्या गोळ्यापेक्षाही मऊ हृदयाचे ज्ञानेश्वर उत्तरेकडे गेल्याशिवाय तिकडील भेसूर परिस्थिति जाणूं शकले नसतील असें म्हणणें मनाला पटत नाहीं. शिवाय त्यांच्या ठिकाणचें अलौकिक योगसामर्थ्य जमेस धरतां ज्ञानेश्वरीसारख्या ग्रंथनिर्मिताकरिता तीर्थांचा प्रवास आवश्यक ठरत नाही, व रा. फाटकांची कल्पना चुकीची वाटते.

### ३५ मत अग्राह्य; कारण २ रें–ज्ञानदेवाची भूमिका मूळसिंचनाची.

दुसरें असें की स्व-पर असा भेद मानणारे ज्ञानेश्वर नव्हते,

तरीही सबंध समाजचा समाज परकीयांच्या राजकीय बंधनांत जाण्याची भीति उत्पन्न झाली असतांना मित्रसमाज विरुद्ध शत्रु-समाज असा भेद ज्ञानेश्वरांनी मानला असावा आणि स्वसमाजास योग्य तो बोध ज्ञानेश्वरींतून केला हें रा. फाटकांचें म्हणणें ( पूर्ण अनिच्छेने ) मान्य केलें तर ' शत्रु ' ची व्याख्या करूं शकणाऱ्या ज्ञानदेवांतील 'संता' ला परक्या शत्रूपेक्षा घरच्या शत्रूचें अस्तित्व अधिक घातक वाटलें नसेल काय असा प्रश्न येतो. मग देवदेवतांच्या पाषाणपूजेंत गुंगलेल्या, घृतकल्या मधुकल्याची चट लागलेल्या, स्वार्थानें आंधळे होऊन उन्नतीची वाट विसरलेल्या, क्षत्रियांच्या क्षात्रतेजाचें व ब्राह्मणांच्या ब्रह्मतेजाचें दिवाळें काढणाऱ्या, नकली आचारमार्गाचें कळकट आचारी झालेल्या, धार्मिक भोंदूगिरीची शिकार प्रत्यहीं होणाऱ्या, व्रतवैकल्याचे ' चिंतामणी ' पुजणाऱ्या, भ्रामक रूढीच्या वेदीवर खऱ्या साधुत्वाला बळी देणाऱ्या स्वसमाजांतील घोर अज्ञानाचा ' शत्रु ' त्यांना दिसला नसेल काय ? त्याचा नाश हें शहाण्याचें ' मूल-सिंचन ' नव्हे काय ? या आंतल्या शत्रूचें बंड पुरतें मोडल्या-शिवाय बाहेरच्या शत्रूचा सामना त्यांनी करावयास सांगणें हिताचें झालें असतें काय ? आणि ही शिकवण पचनीं पडलेल्या समाजास मुसलमानासारख्या कोणा धर्मांध व क्रूर जातीच्या आक्रमणाची सूचना देण्याची, किंवा तो समाज ' स्वत्व ' कसें राखील म्हणून कोणी काळजी करण्याची कांही जरूर आहे काय ? आणि जर तसें कारण नसेल, तर स्वसमाजाची अंतःशुद्धि

करविण्याकरितां हळहळणाऱ्या ज्ञानदेवास केवळ ‘परक्यांच्या आक्रमणाची सूचना मनांत वागविणारा’ असा कोणी समजल्यास ज्ञानदेवांच्या मोठेपणाचा तो अपमान तरी होईल किंवा मोठेपणा न समजल्याचें तें गमक तरी होईल.

## ३६ मत अग्राह्य; कारण ३ रें. स्पष्टास्पष्ट उल्लेख मुळीच नसल्याने शद्बांच्या अर्थाची ओढाताण.

तिसरें असें की, ज्या परकीय आक्रमणाच्या भीतीच्या पोटीं ज्ञानेश्वरीचा जन्म झाला असें ते समजतात त्या आक्रमणाचा प्रत्यक्षाप्रत्यक्ष उल्लेख ज्ञानेश्वरीत कोठेच सापडत नाहीं हे लक्षांत ठेवलें पाहिजे. आणि जेव्हा ‘स्वधर्म,’ ‘निजवृत्ति’ ‘कळिकलितभूतां’ इत्यादि शद्बांमधून रा. फाटक नवनवीन ध्वनि काढतात तेव्हा किंवा ‘जेतुलें आड पडे दिठी। तेतुलें वेचि विषयासाठीं मग तें स्त्री द्रव्य वाटी। शिश्नोदरां ॥ १८ ५५५॥ इत्यादि तामस वृत्तिवर्णनाच्या ओव्यामध्ये जेव्हा ते **म्लेंच्छांचा ‘तपशील’** पाहूं लागतात तेव्हा आधार देत नाहीत, उलट इतरत्र विवेचन करतांना “गीतेच्या टीकेत जरी यांपैकीं बऱ्याच गोष्टी दिसणाऱ्या नसल्या तरी त्या विचाराने कळायला कठीण नाहीत” असें म्हणून आधाराची उणीव झाकावयाचा निष्फळ प्रयत्न करतात. अर्थात् निराधार विधानावर म्हणजे केवळ अनुमानावर बसविलेलीं विधानें सिद्धांत म्हणून मान्य करतां येत नाहित.

## ३७ मत अग्राह्य; कारण ४ थें—ज्ञानेश्वरींतील अननुकूल उल्लेख.

चवथें असें की, कांहीं विशिष्ट शद्बांचे स्वताच्या कल्पनेस पोषक असें मुळांत नसलेले अर्थ काढावयाचे असतील, तर उघड आणि तोही एकच अर्थ असलेले आपल्या कल्पनेस अनुकूल असणारे शद्ब किंवा संदर्भ सरळ सरळ प्रक्षिप्त तरी ठरविले पाहिजेत किंवा लेखकाच्या माथीं खोटी विधानें केल्याचा दोष तरी मारला पाहिजे. ज्ञानेश्वरींत 'तेथ इंदुवंशविलासु । जो सकलकलां निवासु । न्यायातें पोखीत क्षितीशु । श्री रामचंद्रु ॥ ज्ञा. १८-१७८३ ॥ असा श्रीरामदेवराव यादवाचा अत्यंत गौरवानें उल्लेख केला आहे. ज्या लेखकाला तत्कालीन भयंकर परिस्थिति ९००० ओंव्या लिहूनही कोठेंच प्रत्यक्ष सांगावयाची तर काय परंतु सुचवावयाचीही इच्छा झाली नाही तो लेखक या एका ओवींतच मूळ काल्पिलेल्या परिस्थितीशीं विसदृश अशा सुखी व समृद्ध जीवनाचें चित्र काढील काय ? 'निजवृत्ति' तून अर्थ काढण्याच्या पद्धतीनें पाहतां राजाची कलाविदता आणि न्यायप्रियता यावरून प्रजेची सुबत्ता व स्वकार्यदक्षता सूचित होते असें कां समजूं नये ? त्यांनी एका ठिकाणीं (ज्ञा. १८-१६१४) दिलेल्या 'रावो तेथ कटक' या दृष्टान्तांत रामदेवरायाची सुसज्जित व परकी आक्रमणास पायबंद घालणारी प्रबळ सेना कां पाहूं नये ?

## ३८ मत अग्राह्य; कारण ५ वें — ज्ञानदेव एक का अनेक या वादाची साक्ष

पांचवें असें की, 'अगोदर ज्ञानेश्वरी आणि मग तीर्थयात्रा' हा रूढ समाज निराधार नाही. उलट ज्ञानदेव दोन का एक या वादांत एक ज्ञानदेव असें ठरवितांना अभंगांतील विठ्ठलाचा वाढता उल्लेख आणि ज्ञानेश्वरींतील अनुल्लेख यांची संगती लावण्याकरीता दोहोंची पूर्वोत्तरता मान्य करण्यांत येत असतें, त्या दृष्टीनें पाहतां तीर्थयात्रेमुळे जर दारुण परिस्थितीचे चित्र डोळयापुढे उभें राहून सूचक उपदेश बाहेर पडूं शकतो, तर त्याच तीर्थयात्रेमुळे स्फुरलेल्या अभंगवाणींतील विठ्ठलनामाच्या जयघोषाचे पडसाद ज्ञानेश्वरींत कां येऊं नयेत ?

## ३९ निष्कर्ष —प्रा. फाटकांचें म्हणणें "संभाव्य" असलें तरी "सयुक्तिक" नाही.

सारांश असा की प्रा. न. र. फाटक यांनी एका ठिकाणी म्हटल्याप्रमाणे त्यांचें म्हणणे 'संभाव्य' वाटलें तरी 'सयुक्तिक' वाटत नाही म्हणून पुरेसा आधार असलेले पुरावे जो पावेतो पुढे येत नाहीत तोपावेतो तरी रूढ समजूत मान्य करणेंच 'सयुक्तिक' ठरतें.

## ४० ज्ञानेश्वरीच्या पाठीवर—

ज्ञानेश्वरीच्या पाठीवर नेवासें येथेच दुसरा ग्रंथ जन्मास

आला. ज्ञानेश्वरी हा अत्युत्कृष्ट ग्रंथ खरा परंतु गीतेच्या अनुषंगाने जाणारा अतएव परतंत्र, याकरिता आपल्या अद्वैतानुभवावर स्वतंत्र ग्रंथ लिहावयाचे ज्ञानेश्वरांनी ठरविलें, आणि तोच '**अनुभवामृत**' होय. श्रीनिवृत्तीने अशा **स्वतंत्र** ग्रंथ-निर्मितीची आज्ञा ज्ञानेश्वरांना केली होती असें म्हणतात, आणि ही समजूत खरी धरल्यास 'अनुभवामृत' ज्ञानेश्वरीच्या पाठी-वरचें भावंड होय हें ओघानेच ठरतें. ज्ञानेश्वरींतील कवीचा आत्यंतिक संकोच व अनुभवामृतांतील कवीची निर्भय धिटाई यांतील वृत्तिविकास, आणि 'अमुक एका विषयावर पूर्वी पुष्कळच निरूपण केलें आहे तेव्हां आता द्विरुक्ति नको,' (अनुभवामृत ३-१७) म्हणून ज्ञानेश्वरीतील विशिष्ट भागाचा[५०] सूचित उल्लेख या दोहोंचा विचार करता दोन्ही ग्रंथांतील वडील-धाकुटेपण निश्चित ठरतें. या संबंधीचा वाद पूर्वी होऊन गेला आहे म्हणून येथे उल्लेख करणें अगत्याचें ठरतें.[५१] ज्ञानेश्वरीचें नामकरण स्वतः लेखकानें केलें नसलें तरी या ग्रंथाचें केलें होतें परंतु योगायोग असा की हा ग्रंथ लेखक-दत्त नांवाने विशेष ओळखला न जातां इतरांनी उल्लेखिलेल्या **अमृतानुभव** याच नांवाने ओळखला जातो. 'विवेकसिंधु'

---

५० गीता १४--६ वरील ज्ञानेश्वरींतील निरूपण.

५१ कै. वा. ब. पटवर्धन यांनी 'विलसन फायलॉलॉजिकल लेक्चर्स' मध्यें विरुद्ध मत मांडलें होते.

कार मुकुंदराज आणि ज्ञानेश्वर या दोघांनीही अनुक्रमें 'परमामृत' आणि 'अनुभवामृत' हीं आपापल्या ग्रंथांना दिलेली नांवें संस्कृत योगवासिष्ठांतील ६-१०-७० व ७१ या दोन श्लोकांवरून घेतलीं असावींत असें प्रा. डॉ. शं. दा. पेंडसे यांचें मत आहे.[५२] हा ग्रंथ ज्ञानेश्वरांनी तीर्थयात्रा आटोपून परत आल्यावर लिहिला असें प्रा. आळतेकरांनी म्हटलें आहे,[५३] परंतु त्यास आधार दिलेला नाही. नामदेवाच्या अंभगाप्रमाणे हा ग्रंथ लिहिल्यावर ज्ञानेश्वरांनी पंढरपूरला जावयाचें ठरविलें असें दिसतें. अमृतानुभवानंतरचा ग्रंथ **'योगवासिष्ठ'** होय. या नांवाचा एक ग्रंथ उपलब्ध आहे परंतु[५३] तो ज्ञानेश्वराचा नसून कोणा महानुभावीय लेखकाचा असावा असें समजतात. त्याचा विचार पुढे केला आहे. नेवासें, आळंदी, पैठण, आपेगांव या चारही ठिकाणीं हीं भावंडें जाऊन येऊन असत असा उल्लेख मागे केलाच आहे व ह्याच काळांत एकाच विषयाला वाहिलेल्या सुसूत्र ग्रंथ रचनेला लागणारें स्थैर्य या भावंडांना मिळालें असावें अशी कल्पना करतां येते म्हणून या काळांत श्रीनिवृत्तिनाथाचा '**निवृत्ति-सार**' हा ग्रंथ, सोपानदेवाची '**सोपानदेवी**' या नांवाची गीतेवरील समश्लोकी ओवीबद्धटीका, व मुक्ताबाईचे '**ताटीचे अभंग**' इत्यादि रचना ज्ञानेश्वरांच्या भावंडांनी केल्या असाव्यात. महाराष्ट्र सारस्वतकारांनी 'निवृत्तिदेवी' अथवा 'निवृत्तेश्वरी'

---

५२ पहा—'श्री ज्ञानेश्वरांचें तत्वज्ञान पृ. २६०,

पहा—५३ श्री ज्ञानदेव, पृ. १०१,

या नांवाची पोथी उपलब्ध असल्याचा उल्लेख केलेला आहे.[५४] सर्वच भावंडांनी अभंग, पदात्मक त्रुटित रचना पुष्कळच केलेली आहे, परंतु तींतील अधिकतर भाग ही मंडळी तीर्थयात्रेला गेल्यापासूनच्या काळाचा असावा.

ग्रंथरचनोत्तर या भावंडांनी तीर्थयात्रेस जावयाचें ठरविलें, आणि पंढरपुराकरिता प्रस्थानही ठेवलें.

## ४१ वाढत्या गौरवाचे धनी—

शुद्धिपत्राकरिता पैठणास गेल्यापासून ज्ञानदेवादि भावंडांचें अलौकिकपण लोकांच्या प्रत्ययास येऊं लागलें होतें. समाजांतील खालच्या आणि वरच्या, शिक्षित आणि अशिक्षित अशा दोन्ही थरांना ज्ञानेश्वर ज्ञानेश्वरी समाप्तीच्या काळापावेतो चांगलेंच माहीत झाले होते. त्यांचे रसाळ कवित्व आणि तत्वज्ञानांतील अमोघ नैपुण्य यांमुळे समाजास शिक्षण देणारा विद्वत्समाजही दिपून गेला असल्यास नवल नाही.

आपल्या वाढत्या गौरवाची जाणीव ज्ञानेश्वरांना नसेल असें थोडेच आहे परंतु गौरवाचा गर्व रौरवाला कारण होतो हें माहीत असल्याने अहंकाराच्या भावनेचा लेशमात्रही तेथ चिकटणें शक्य नव्हतें. 'आकाशा न लगे लेपु जैसा.' उलट वाढत्या वैभवाने

---

५४ पहा—महाराष्ट्र सारस्वत, भाग १ ला पृ. १३६,

त्यांची विनयवृत्ति वाढीस लागली. ते जसे ज्ञानियांचे राजे होते तसेच योग्यांचेही स्वामी होते. किंबहुना योगबलाने रेड्यास मनुष्यवाचा दिल्याचें व मृत मनुष्य उठविल्याचें त्यांचे वर्तमान ऐकल्यापासून एक दोन नव्हे तर चौदावेळा मृत्यु चुकवून चौदाशे वर्षे जिवंत राहिलेल्या तत्कालीन योगिश्रेष्ठ चांगदेवासही त्यांच्या दर्शनाची उत्कंठा लागली. स्वतः महान् योगी असूनही योग व ज्ञान दोहोंचे बलाबल ज्ञानेशांनी अनुभविलें होतें. अद्वैतानुभवांतील अमृतरहस्य निव्वळ योगासिद्धींत नाही, योगसिद्धी अत्यंत कठीण असली तरी ती साधनभूत होय, साध्य नव्हे हें अद्वैतानुभवांतील अमृतरहस्य त्यांना उमगलें होतें. योगसिद्धीच्या उर्मट अहंकाराने अहं–निरपेक्ष आत्मसिद्धीचें ध्येय कसें आकलन होणार ? कोणत्याही सिद्धान्तास प्रात्यक्षिकामुळे बळकटी येते, त्याप्रमाणे योगज्ञान आणि आत्मज्ञान यांच्यांतील श्रेष्ठाश्रेष्ठता सामान्य जनास प्रत्यक्ष कळण्याचा योग लवकरच आला.

## ४२ 'तीर्थरूप' ज्ञानेश्वर का 'चिरंजीव' ज्ञानेश्वर.

तीर्थयात्रेकरिता पंढरीच्या दिशेने निघालेलीं हीं भावंडें प्रथम आळंदीस आली आणि येथेच योगिराज चांगदेवाची भेट झाली. खानदेशांत एदलाबादेजवळील ‘ चांगदेव ’ गांवचे हे रहिवासी. यांनी तापीतिरीं घोर तपश्चर्या केली. महान् सिद्धपुरुष

अशी ह्या चांगदेव उर्फ चांगावटेश्वराची[५५] ख्याती होती. सर्वसिद्धि त्यांना प्राप्त झालेल्या होत्या. मृतास सजीव करणें हा तर त्यांच्या हातचा मळ होय, असें लोक समजत. ( मृत शरीरें तिरडीवर ठेवून स्मशानांत नेण्याऐवजी पाठीवर लादून चांगदेवाच्या आश्रमांत नेत असत किंवा कसें तें माहीत नाही.[५६] ) तपो-

---

५५ 'चांगदेव' या नांवाच्या अनेक व्यक्ति असाव्या किंवा अनेकांनी तें नांव धारण केलें असावें असें दिसतें. १४ शें वर्षांची हयात एकालाच देण्याचे कारणही हेंच असावें. वटेश्वर चांगा आणि मुधेश चांगा अशा दोन व्यक्तींचा गोंधळ कधी कधी करण्यांत येतो, कारण दोघांनी पुणतांबें येथेच समाधि घेतली. मुधेश हा चांगावटेश्वरानंतर दोनसव्वादोनशें वर्षांनी होऊन गेला. मध्ययुगीन चरित्र कोशांत चांगावटेश्वर, चांगा केशवदास आणि चांगा मरुद्गण हीं नांवें एकाचीच असून वटेश्वराचे पुणतांब्याचे वंशज आजही 'मरुद्गण' हें आडनांव लावतात अशी माहिती दिली आहे. चांगावटेश्वराने शके १२३४ मध्ये 'तत्वसार' ग्रंथ लिहिला. ५६ पुढील दंतकथा येथे लक्षांत ठेवणें बरें. ज्ञानदेव चांगदेवाची इतिहासप्रसिद्ध भेट होण्यापूर्वी एकदा चांगदेवाच्या आश्रमांवरून हीं भावंडें जात असतांना पुढे एक शव घेऊन चांगदेवाची समाधि उतरण्याची वाट पहात बसलेला एक घोळका त्यांना दिसला. मुक्ताबाई त्या घोळक्यांत शिरली आणि कारण समजल्यावर जवळच मरून पडलेल्या एका कुत्र्याची तंगडी उचलून त्या शवावरून ओवाळून तिने तें कुत्रें दूर भिरकावून दिलें. त्याबरोबर तें कुत्रें तर सजीव होऊन पळून गेलेंच परंतु शव ही सजीव झालें !

बलाने तेज:पुंज झालेला त्यांचा दिव्यदेह पाहून त्यांना लोक चांग ( चांगला ) देव म्हणत. अशा या चांगदेवाने आपल्या कीर्तीशी होड लावणारी ही व्यक्ति कोण म्हणून कुत्सामिश्रित कुतूहलाने वा मत्सराने ज्ञानदेवाची गाठ घ्यावयाची ठरविली. पुढे अहंकार आडवा येऊन गाठीचें काम पत्रावर भागवावयाचें ठरलें. परंतु तेथेही ' लाटण्या ऐसा न लवे । पाथर तैंवि न द्रवे ' असला ताठा आडवा आला. वयाने लहान असलेल्या ज्ञानदेवास **तीर्थरूप** तर लिहावयाचे नाही असें त्यांनी ठरवून टाकलें; परंतु योग्यतेने तीर्थरूपांचे तीर्थरूप ठरलेल्या त्या ज्ञान्यांच्या देवास **चिरंजीव** तरी कसें लिहावयाचें !

योगिराजांना हा विचार विषण्ण करूं लागला. ज्ञानेश्वराला काय लिहावयाचें ? 'तीर्थरूप' ज्ञानेश्वर का 'चिरंजीव' ज्ञानेश्वर !

## ४२ चांगदेवाचा 'हॅम्लेट' झाला.

अति विचाराची परिणती अकर्मांत होते असें ' विचार-विलसित ' अर्थात् ' हॅम्लेट ' या नाटकांत पाश्चात्यांच्या कालिदासाने दाखविलें आहे. योगकुशल चांगदेव 'ज्ञानेश्वरांना मायना काय लिहावा ' याचा अतिविचार करून हतबुद्ध झाला व शेवटी त्याने मायना तर राहोच पण मजकूरही कांही लिहूं नये असें ठरविलें. पत्र तर पाठवावयाचें आणि तें पाठविलेंही, परंतु कोरें ! लिहिण्यांत गुंतणें बरें नाही असा व्यवहारी विचार करून चांगदेवाने ' कोराकागद ' पाठविला आणि वर साळसूद-

पणे 'कागद' घेऊन जाणाऱ्या शिष्याकरवीं सर्वांना **तोंडी** नमस्कार सांगितले! कोरें पत्र पाठविण्याचा उद्देश कदाचित् वेळ आलीच तर यौगिक खेळ खेळून बाजू उलटवितां यावी असाही असेल.

## ४४ कोऱ्या पत्राचे उत्तर—'चांगदेवपासष्टी'

बाजू उलटविण्याची वेळ आलीच नाही, कारण अहंकाराने माखलेला चांगा अंतरंगांत कोराच होता हें जाणून ज्ञानदेवाने त्यास 'तत्वमसि' चा बोध करण्याऱ्या ६५ ओव्या, पत्राचें उत्तर म्हणून पाठविल्या. त्याच '**चांगदेवपासष्टी**' या नांवाने पुढे ओळखल्या गेल्या.

## ४५ आत्मविद्या आणि योगविद्या यांचा संग्राम की संगम. योगेश्वर विरुद्ध योगसम्राट्.

पासष्टी पावली पण कळली नाही, मजकूर समजला, पण उमजला नाही, उलट योगरहस्याचा अभ्यास पासष्टींत नसल्या-मुळे या मुलांच्यावर आपण सहजच छाप मारूं अशी चांगदेवाची खात्री झाली आणि ते भेटीस निघाले. नुसत्या नांवाने भीति उत्पन्न करणारा वाघासारखा क्रूर पशू, त्याची लळलळणारी जीभ, तीक्ष्ण दाढांमुळें भयंकर वाटणारा विक्राळ उघडा जबडा, त्याच्या पाठीवर बसलेली, मस्तकावरील जटाकलापाने व लाल इंगळा-सारख्या डोळ्यामुळे अधिकच उग्र भासणारी मूर्ति, भयानकतेंत

भर टाकणारा हातांतील त्रिशूळ, व यमधर्माचें काम सोपें करणारा सर्पराजाचा चाबूक, आणि या भीषण ध्यानाच्या मागे चांग्याच्या जयघोष करीत चालणारा १४०० शिष्यांचा तांडा! हें सारें दृश्यच असें कांहीं रौद्र होतें की पार्श्वगणासह प्रत्यक्ष कृतांतच मुलुखगिरीला निघाल्यागत वाटावें, मग ज्ञानदेवादिकांची काय कथा! सिद्धिसम्राटाचें हें विराटवैभव आळंदीच्या परिसरांत पसरले आणि इकडे एका पडक्या भिंतीवर ऊन्ह खात, वारा पीत, सुख संवादांत मग्न झालेल्या बालब्रह्ममूर्तीकडे वर्दी पोहोचविण्यांत आली. एवढा मोठा सम्राट् आला, त्याचा इतमाम ठेवतां येण्यासारखे वैभव नसले तरी सामोरें जाण्याचा साधा शिष्टाचार तर पाळला पाहिजे. ज्ञानेश्वरांनी तोच शिष्टाचार पाळला आणि चांगदेवाचा पुनर्जन्म झाला. ज्ञानेश्वरांनी अंगाखालच्या भिंतीस 'चल बये' म्हणून आज्ञा करतांच भिंत चालूं लागली आणि हीं भावंडें सम्राटास सामोरीं गेलीं.[57] निर्जीव भिंत

---

[57] प्रा. आळतेकर म्हणतात, "ही चालविलेली भिंत आळंदीस पुष्कळ दिवस होती, व भाविक यात्रेकरू तिची माती तोंडांत टाकून पुण्याई मिळवित. पण अशाने भिंत नाहीशी होऊं लागली म्हणून तिला आता पक्क्या चिरेबंदींत घालून ठेविली आहे, व यात्रेकरूंना तिला हात लावतां येतो पण खाऊन टाकतां येत नाही. आळंदीस देवळाच्या पुढे असलेला (सोन्याचा) पिंपळ आणि ही चालती भिंत या ज्ञानेश्वरकालीन वस्तु आहेत असें समजतात." श्रीज्ञानदेव पृष्ठ ८४

चालविण्याच्या या प्रकारास जगांत तोड नाही. हा चमत्कार तेव्हाच काय पण आज तागायत केवळ अद्वितीय ठरला आहे. चांगदेवास असें कांही होईल अशी मुळीच कल्पना नव्हती. साक्षात् योगेश्वराचें तें अचाट सामर्थ्य पाहून चांगदेव चकित झाला. तो हत बुद्ध झाला आणि शरण रिघाला. कारण जगांतील यच्चयावत् सचेतनांना कामी लावणारा तो योगसम्राट अचेतनावर साम्राज्य गाजविण्यास असमर्थ होता. स्वतःच्या (अल्प समजुती प्रमाणे ) अतुल, अजिंक्य, आणि अमोघ योगविद्येचा अहंकार वाहणाऱ्या त्या महापुरुषास स्वयंब्रह्म झाल्यावर ब्रह्मतेचाही अहंकार गिळून टाकणाऱ्या सत्वशुद्ध आत्मविद्येचा साक्षात्कार त्या क्षणीं झाला. सर्पाचा चाबूक धरणारा त्याचा हात लुला पडला; क्रूर वाघास जांघेने जखडणारी त्याची मांडी सुटली; आणि अहंकारशून्य होऊन घरंगळलेला त्याचा देह सरळ ज्ञानेश्वरांच्या चरणाशीं आला. ज्ञानेशांनी त्याचा धिक्कार केला नाही उलट त्याला हृदयाशीं लावलें. संग्रामसक्त योगविद्या आत्मविद्येला नुसती शरण गेली नाही, तर पुढे तिच्याशी एकरूप झाली. संग्रामेच्छेची परिणती संगमांत झाली.

योगयागविधि येणें नव्हे सिद्धि । वायांचि उपाधि दंभधर्म ॥
भावेविण देव न कळे निःसंदेह । गुरुवीण अनुभव कैसा कळे ॥

## ४६ गुरूपदेश देणारी पहिली व एकमेव कुमारी.

पासष्टीचा न समजलेला अर्थ समजावून देण्याची कामगिरी

मुक्ताबाईकडे आली, मुक्ताबाईचें शिष्यत्व अत्यंत आदराने पत्करून चांगदेव आत्मबोधाचा धनी झाला. चांगदेवाला, त्याची परीक्षा घेतल्यानंतरच हें ज्ञान देण्यांत आलें. या संबंधीची व इतर बऱ्याच आख्यायिका प्रसिद्ध आहेत. कारणपरत्वें 'निलाजऱ्या निगुऱ्या' असें 'चांग्या' ला म्हणणारी मुक्ताई अत्यंत तेजस्वी स्त्री असली पाहिजे. अनुभवाचे अधिष्ठान असलेले व योग परिभाषेने परिप्लुत असे तिचे अभंग तिच्या आध्यात्मिक अधिकार-संपन्नतेची साक्ष देतात. अशा अधिकारसंपन्न स्त्रिया महाराष्ट्राच्या परिसरांत ज्ञानदेवकाळीं किंवा नंतरच्या काळांतही फारच थोड्या होऊन गेल्या. महदाइसा, जनाबाई, बहिणाबाई, वेणाबाई इत्यादि हाताच्या बोटावर मोजतां येण्याइतक्याच ज्या अधिकार संपन्न स्त्रिया आपणाकडे होऊन गेल्या आहेत त्या सर्वांत मुक्ताबाई हीच श्रेष्ठ होय. ज्येष्ठ भावंडाच्या तेजामुळे तिचें तेज पडलें नाही-असें म्हणतात, त्या ऐवजी त्यांच्यांत एकरूप झालें असें म्हणणें आध्यात्मिक परिभाषेस धरून होईल.

## ४७ तीर्थयात्रा प्रकरण आणि प्रा. आळतेकरांचें मत. मत अग्राह्य.

ज्ञानदेवाच्या चरित्रांत यात्रेचें महत्व अतिशय आहे. या यात्रेचा खरा आधार नामदेवाचे 'तीर्थावळीचे अभंग' म्हणून प्रसिद्ध असलेले ५९ अभंग होत. या अभंगांची सूक्ष्म चिकित्सा करुन हे अभंग ''पंढरीमाहात्म्याचा पुरस्कार करण्यासाठी आणि नामदेवाचे

श्रेष्ठत्व वर्णन करण्यासाठी ज्ञानदेव-नामदेव कालानंतर कोणीतरी रचून ते नामदेवाच्या 'कोटी' अभंगांत ढकलून दिले असावेत हा ग्रह दृढतर होतो" असें स्पष्ट मत प्रा. आळतेकरांनी दिलें आहे[५८]. या अभंगांशिवाय 'भक्तिकथासार' 'भक्ति-कथामृत' धुंडिराजाचें 'भक्तिलीलामृत', 'कथाकल्पवृक्ष' इत्यादि आधारही पांगारकरासारख्यांनी घेतलेले आहेत. अभंगाशिवाय इतर आधारांतून चरित्राऐवजी 'कथा' 'अमृत' 'लीला' आणि 'कल्पना' यांनाच 'भक्ति' ने स्थान दिलेलें आहे हें उघड आहे म्हणून त्यांतील घटनांची ग्राह्याग्राह्यता ठरविणें फारच कठीण जातें. मात्र अभंगाबद्दल आळतेकरांचें मत ग्राह्य होत नाही कारण एकतर या अभंगांतील उल्लेख ग्राह्य धरूनच त्यांनी आपलें तीर्थ-यात्रेचें प्रकरण सजविलें आहे,त्यांतील नामदेवी-भावभाषेची प्रतीतीही मान्य केली आहे. व दुसरें असें की, एका श्रेष्ठ परंतु संकुचित सगुणोपासकाच्या तोंडचे, केवळ 'विटेवरीपाय कटेवरीहात' अशा पांडुरंगाशिवाय इतर देवतांकडे पहावयासही तयार नसलेला, त्यांचें पूजन करण्यास हात आखडून घेणारा, "तेणें पंथें माझे न चलती चरण। न ऐकती श्रवण कीर्ति त्यांची" असे म्हणणारा एवढेच काय पण विठ्ठलेतरांना 'देव' म्हणावयासही तयार नसलेला अशा हठवादी सगुणोपासकाचे हे अभंग आहेत.[५९] सर्वांभूतीं

---

५८ 'श्रीज्ञानदेव' पृष्ठ ९३, ५९ नामदेव यात्रेंतून मध्येच निघून आला असण्याचा संभव आहे. पहा प्रा. आळतेकर कृत 'ज्ञानदेव' पृष्ठ १०१

एकच विठ्ठल पाहणाऱ्या अद्वितीय अद्वैतोपासकाबरोबर असतांना त्यास फक्त योगी किंवा ज्ञानी समजून त्याच्या जवळ आपले भिन्न मत स्पष्ट बोलून दाखविणाऱ्या ( आणि म्हणूनच कदाचित् 'कच्चे मडकें' ठरलेल्या ) नामदेवाचे हे अभंग आहेत हें लक्षांत घेतां पंढरीपूजनाचा आणि पर्यायाने पंढरीपूजकाचा पुरस्कार तीर्थावळीच्या अभंगातून येणें किती साहाजिक होतें तें लक्षांत येईल. यास्तव वरील श्री. आळेतकरांच्या चिकित्सादृष्टीस मान देऊनही त्यांचा निर्णय अमान्य करावा लागतो. पंढरीमाहात्म्य व नामदेवाचें श्रेष्ठत्व, याशिवाय इतर महत्वाचे पुरावे जोपर्यन्त पुढे येत नाहीत तोपर्यंत तीर्थावळीच्या अभंगांचा आधार बऱ्हंशीं प्रमाण मानावा लागेल.

## ४८ ज्ञानेश्वर पंढरपुरीं येतात

नामदेवाच्या या अभंगांवरून केवळ ज्ञानदेव व नामदेव हे दोघेच यात्रेंत होते असें दिसतें, परंतु इतर भक्तांच्या उल्लेखावरून ज्यांना शक्य झाले असे निवृत्ति, सोपान, मुक्ताव्यतिरिक्त, नरहरीसोनार, चोखामेळा, गोराकुंभार, विसोबाखेचर, सावतामाळी इत्यादि संत बरोबर होते असें ठरतें. ज्ञानदेवादि भांवडें आळंदीहून पंढरीस आलीं त्यावेळी पंढरीच्या पंचक्रोशींत नामदेव हे पहिल्या प्रतीचे संत म्हणून प्रसिद्ध होते. प्रत्यक्ष देवाशीं बोलणें चालणें तर ठीकच पण देवाच्या सांगाती जेवण करण्याचाही त्यांचा अधिकार होता. त्याच्याशिवाय विठ्ठलालाही चुकल्या-चुकल्या सारखे होई; त्याच्याकरिता आणि त्याची दासी जनी

हिच्याकरिता विठ्ठल त्याच्या घरीं राबत असे, व रुक्मिणी दळण दळी असा त्याचा लौकिक होता. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे सगुण भक्तीचें साकार स्वरूप म्हणजे नामदेव होय. भक्तराजाच्या भक्तीने त्यास 'माथां मुकुट' करण्यापर्यंत देवाची मजल कशी जाते याचें समरसून वर्णन करणाऱ्या ज्ञानेश्वरांना पंढरीच्या राण्याचा हा चालताबोलता 'मुकुट' पहाण्याची तीव्र इच्छा यात्रेस निघतांना प्रथम पंढरपुरास घेऊन गेली. जसा नामदेवाचा तसाच ज्ञानदेवाचाही आध्यात्मिक अधिकार फार मोठा असल्याने परस्परांची कीर्ति परस्परांनी ऐकली असणें आणि स्वाभाविक निर्मल वृत्तीमुळे परस्परांच्या भेटीची उत्कंठा उभयतांना निर्माण झालेली असणेंही साहजिकच होते. सख्यत्वाने विठ्ठलाला पाहिजे तें सांगणें, किंवा करावयाला लावणें हें नामदेवाला अवगत असलें तरी ब्रह्म आणि माया, जीव आणि शिव, त्रिपुटीनिरास, निर्गुण-भक्ति, ज्ञानोत्तरभक्ति, इत्यादि पारिभाषिक शब्दांनी सूचित केले जाणारे विशेष त्याला नवखेच होते, आणि त्यांचें यथार्थ व आबालसुबोध उद्घाटन करणारा आचार्य आपण होऊन पंढरीस चालून येत असल्याचे कळल्यावर त्यास किती हर्ष झाला असेल, त्याची कल्पना नामदेवाचे एतद्विषयक गोड अभंग नुसते चाळले तरी येऊ शकेल. पंढरपुरास आल्यावर दोघे कडकडून भेटले, दोघांनाही जन्मास आल्याचें सार्थक झालेसें वाटलें, आणि पुढे एकमेकांशीं 'अंतरीचें गुज' करावयास मिळावें म्हणून त्यांची यात्रा सुरू झाली.

## ४९. यात्रास्थानें-ज्ञानेशांच्या पदरजानें पुनीत झालेलीं मध्यभारतांतील स्थळें-धार व उज्जेन.

यात्रा कोणत्या केल्या या संबंधी,

पश्चिम प्रभास आदिकरोनी द्वारका ।
पाहिल्या सकळिका मोक्षपुऱ्या ।
पंथीं पावन तीर्थें पाहिली सकळिक ।

असा मोघम उल्लेख नामदेवाच्या अभंगांत आहे. या मोघम उल्लेखावरून मोक्षदायक म्हणून प्रसिद्ध असलेलीं अयोध्या, मथुरा, माया ( हरिद्वार ), काशी, कांची ( कांजीवरम् ) अवंतिका ( उज्जयनी ) आणि द्वारका हीं क्षेत्रें व ह्या क्षेत्रीं जातांना वाटेंत लागणारीं किंवा जवळपास असणारीं तीर्थें त्यांनी केली असें दिसतें. **मध्यभारतांत उज्जनीस** ते आले होते हें उघडच आहे, आणि दुसऱ्या एका आख्यायिके प्रमाणे मांडवगडा-जवळील धारानगरीसही ते गेले असावेत. काशीला गेल्यावर तेथील त्रिस्थळी ( काशी, गया व प्रयाग ) त्यांनी केली असावी. हस्तिनापूर आणि आवढ्या नागनाथास घडलेल्या चमत्कारांच्या दंतकथा खऱ्या मानल्यास तीं स्थळेंही त्यांनी प्रवासांत पाहिलीं असें म्हणतां येईल. वरील लहानशा व मोघम आधाराखेरीज इतर कोणताही आधार नसतांना ज्ञानेश्वरांना उत्तरेस बद्रिकेदारापासून थेट दक्षिणेस रामेश्वरापर्यंत आणि पूर्व समुद्रापासून पश्चिम समुद्रापर्यंत हिंडविणारे हरदास होऊन गेले आहेत.[६०] या

---

६० पहा महीपतीकृत भक्तिविजय, अध्याय १२ [ आणि पारखकृत 'श्रीज्ञानेश्वर महाराजांचे चरित्र.' ]

तीर्थयात्रेंतील पुढील कथा विशेष प्रसिद्ध आहेत. (१) कऱ्हाड, येथे एका साहसी स्त्रीने स्वतःच्या पुत्रास मुद्दाम ठार मारून ज्ञानेश्वरावरील श्रद्धेच्या बळावर त्यास पुन्हा सजीव करवून पतींत उपरती घडवून आणली; २ आवढ्या नागनाथ येथील प्रसिद्ध ज्योतिर्लिंगाचे देऊळ नामदेवाने फिरविलें; ३ गोरक्षनाथाच्या भेटींत गोरक्षाने प्रत्येकाचें डोकें 'थापटणें' ह्मणून तपासलें आणि नामदेवाचे 'मडकें' कच्चें ठरविलें; ४ सातपुड्यांत एका विठ्ठलभक्त भिल्लाने त्यांना रक्षण दिलें. ५ धारानगरींत ज्ञानेशांनी सर्पदंशाने मेलेला ब्राह्मण पुत्र उठविला; ६ उज्जनीस वीरमंगळ ज्योतिषाने त्यांच्या चरणीं देहार्पण केलें; ७ काशीस प्रत्यक्ष विश्वेश्वरांनी सामोरे येऊन त्यांचें स्वागत केलें; ८ तेथे यज्ञांत त्यांना अग्रपूजेचा मान मिळाला ९ तेथेच मणिकर्णिका घाटावर मत्स्येन्द्रनाथ व गोरक्षनाथ यांचे दर्शन नामदेवादि सर्व संतांना झालें; १० गांवांत प्रसिद्ध रामभक्त कबीरसाधूची भेट झाली व भेटींत त्याने पंढरपुरीं कार्तिकी एकादशीस येण्याचें वचन दिलें; ११ दिल्लीस नामदेवाने मेलेली गाय उठविली; आणि १२ रुक्ष मारवाडांत खोल तळाशीं पाणी गेलेल्या एका विहिरींत नामदेवाने काठोकाठ पाणी उत्पन्न केलें. इत्यादि इत्यादि. या कथांचा खरेखोटेपणा परीक्षावयास हवा, परंतु त्या संशोधनासाठीं आवश्यक असलेल्या साहित्याची उणीव आडवी येते. असो. तीर्थयात्रा करीत करीत आणि विशेषतः संवाद सुखाचा आनंद लुटीत, ही मंडळी पंढरपुरास परतली. नामदेवाने तेथे यात्रेचे जंगी मावंदे केलें व सर्व मंडळी घरोघर गेली. ज्ञानेश्वरही आळंदीस आले.

**५० 'कच्चें मडकें' कोणी थापटलें ? गोरा कुंभाराने का गोरक्षनाथाने ?**

वरील कथांपैकी गोरक्षाने डोकें तपासल्याची कथा गोराकुंभाराच्या नांवावर सरसहा विकली जाते, परंतु एतद्विषयक अभंगाकडे पाहतां ही समजूत चुकीची असल्याची खात्री होईल. अभंग असा आहे.

गोरा (बोलाविला) जुनाट पै जुनें । हातीं थापटणें अनुभवाचें ॥
परब्रह्म म्हातारा निवाला अंतरीं । वैराग्याचे वरी पाल्हाळला ॥
सोहं शद्बें विरक्ति उरली अंबरी । पाती अणुभरी पाहिलेंपण ॥
म्हणे मुक्ताबाई घालूं द्या लोटांगण । जाऊं द्या शरण अव्यक्तासी ॥

येथील 'थापटणे,' साध्या कुंभाराचें नाही, गोराकुंभार नामदेवापेक्षा केवळ तीन वर्षांनी मोठा असल्याने 'परब्रह्म' 'जुनाट, पै जुनें' हे शद्ब त्याला उद्देशून नाहीत, व 'अव्यक्त' असण्याचा अधिकारही गोरा कुंभाराचा नव्हे. परंतु या तीन्ही गोष्टी गोरक्षाला मात्र बरोबर लागू पडतात, शिवाय एका आख्यायिकेप्रमाणे स्वताच्याच हाताने छाटलेले गोरा कुंभाराचे हात नामदेवाच्या कीर्तनाने फुटले होते हें खरें मानल्यास, उपकारकर्त्यास चार लोकांसमक्ष 'कच्चे मडके' ठरविण्याचा कृतघ्नपणा गोराकुंभार करीलसें वाटत नाही.[६१] ही

---

६१ एत- द्विषयक सविस्तर चर्चेकरिता 'श्रीज्ञानेश्वरदर्शन' दर्शनप्रवेश पृ. ६७ ते ६९ पहा.

सारी चर्चा येथें करण्याचे कारण असें की गोरक्षनाथ ह्या तीर्थ-यात्रेत ह्या मंडळींनां भेटले होते हें सिद्ध व्हावें. कारण पुढे एका ठिकाणी निवृत्तिचे गुरु गैनीनाथ असले तरी 'कृष्णभक्तीचा गुह्य भाव' गुरुच्या गुरुंनी त्यांना सांगितलेला होता, त्यांची भेट पूर्वीही अनेकदां झालेली असावी इत्यादि विवरण करावयाचें आहे.

## ५१ तीर्थयात्रा आणि वाङ्मय

तीर्थयात्रा सुरु होण्यापूर्वीं ज्ञानदेवाने अभंगरचना केली नसेलच असें म्हणतां येत नसलें तरी तीर्थयात्रोत्तर काळांत तशी स्फुट रचना अधिक झाली असावी. स्फुट रचनेंत प्रामुख्याने अभंग, आणि त्याशिवाय इतर पदें, गौळणी, किंवा भारूडसदृश इतर रचनाही आहे व ती सारी या तीर्थयात्रेच्या काळांत झाली असावी, त्यांच्या कित्येक अभंगांतून आणि इतर पदांमधून हटयोगपर, अध्यात्म तत्वज्ञानपर आणि क्वचित् कूट अशी विविधता दिसते परंतु बराच मोठा हिस्सा पंढरीच्या पांडुरंगाच्या आळवणीस वाहिलेला आहे. नऊ हजार ओंव्यांच्या ज्ञानेश्वरींत चुकूनही विठ्ठलाचें नांव न घेणारे ज्ञानेश्वर " सार सार सार विठोबा नाम तुझें सार.......... " असें म्हणून आर्तस्वाने त्यास आळवतात, आणि देवाच्या दारीं क्षणभर उभे राहून चारही मुक्तींचे स्वामी होण्याचा तुम्हां आम्हांला आदेश देतात. शुद्ध निर्गुणोपासकाच्या वाङ्मयांत घडून आलेल्या ह्या फरकाचें कारण या काळांत संत सज्जनांबरोबर त्यांनी

लुटलेलें सगुणभक्तिप्रेमाचें अलोट सुख हेंच. तीर्थयात्रेच्या काळांत ज्ञानदेवांच्या भावंडांनीही पुष्कळच अभंग–पदात्मक रचना केलेली असून तमिधून कांही सुदैवाने उपलब्ध आहे. या सर्वांचे अभंग ' हरिपाठाचे अभंग ' म्हणून ओळखले जातात.

## ५२ ज्ञानेश्वरीच्या तीर्थयात्रेचें दुहेरी महत्व.
## (अ) वारकरी संप्रदायाचें संजीवन.
## (आ) मराठीच्या पदरीं यात्रेचें पुण्य.

ज्ञानेश्वरांनी तीर्थयात्रा केली ती कांही पंडितमैत्री, सभासंचारादि व्यावहारिक लाभाकरितां केली नाही. त्यांनी केलेली पंढरीची वारी ही वारकरी संप्रदायाचे ते पुरस्कर्ते होते म्हणून केली असेंही नाही. उलट त्यांनी केलेली तीर्थयात्रा आणि पंढरीची वारी करावयाची पद्धत यांचा अन्योन्य संबंधही नाही. अद्वैतज्ञानप्राप्तीनंतरही लोकसंग्रहार्थ यथाविधि कर्में आचरीत राहण्याचा स्वतः केलेला उपदेश त्यांनी व्यवहारांत आणला असें म्हणतां येईल. कारणें कोणतींही असलीं तरी यात्रेमुळे झालेले परिणाम फार महत्वाचे आहेत. वारकरी संप्रदायाचा त्यावेळचा पुढारी नामदेव होय. वर नामदेवाच्या 'कच्च्या मडक्या'चा उल्लेख आलेला आहेच. केवळ सगुणोपासना आणि तीही एकदैवतनिष्ठ हटवादी सगुणोपासना केव्हांही कच्चेपणाचीच द्योतक ठरेल. सर्व देवतांच्या ठिकाणीं एकभाव आणि सगुणोपासनेकडून निर्गुणोपासनेकडे जाण्याच्या दृष्टीचा

निदान तात्विक स्वीकार केल्याशिवाय कच्चेपणा जावा कसा ? ह्याकरिता भक्तीबरोबर तत्वज्ञान पाहिजे, आणि या तत्व-ज्ञानाचा अभ्यास वारकरी संप्रदायास ज्ञानेश्वरीने पुरविला, त्यांच्या ज्ञानेश्वरीचा अभ्यास, तींत विठ्ठलाचें नांव कुठेही नसतांना, वारकरी संप्रदायास अनिवार्य ठरला आणि तींतील चिरंजीव तत्वज्ञानाच्या पायावर वारकरी संप्रदायाचे भव्य देऊळ उभारलें जाऊं शकलें. ज्याक्षणीं पंढरीच्या पायरीवर या विभूतीने पाय ठेवला त्याच क्षणीं वारकऱ्यांचा अर्जित काळ निश्चित झाला.

स्वत: ज्ञानदेवाने पुढे विठ्ठलाचे विपुल गुणकीर्तन करून आपले सगुणप्रेम सिद्ध केल्याने ज्ञानेश्वरीबद्दल उत्पन्न होणारा (काल्पनिक!) परकाभाव मुळींच नाहीसा झाला. नामदेव चोखामेळा, गोराकुंभार, सावतामाळी इत्यादि सर्वांच्याच अभं-गांतून येणारा भोळाभाव ज्ञानेश्वरापासून घेतलेल्या प्रभावी तत्व-ज्ञानाच्या अमृत सिंचनाने चिरंजीव झाला हें नाकबूल करतां येणार नाही.

एकूण त्यांच्या तीर्थयात्रेने त्यांना तर मोठेपण लाभलेंच परंतु खरें म्हणजे पंढरीचा वारकरी संप्रदाय संजीवित झाला. वारकरी संप्रदायरूपी शरीराचा मेंदू म्हणजे ज्ञानेश्वरी ग्रंथ असें यापुढे समजलें जाऊं लागलें आणि अशा ग्रंथाचा कर्ता ज्या ज्यां तीर्थक्षेत्रीं गेला त्या त्या ठिकाणीं संप्रदायाची महती वाढली. ज्ञानेशांची तीर्थयात्रा संप्रदायाच्या दृष्टीने वर लिहिल्याप्रमाणे

जशी महत्वाची ठरते तशीच भाषेच्या दृष्टिनेही ठरते. मराठीचा जन्म होऊन पांच शतकें झालीं असलीं तरी संस्कृताचा विरोध तिला सहन करावा लागतच होता. ज्ञानेश्वरांच्याच काय, पण पुढे एकनाथाच्या काळानंतरही हा विरोध अतिशय करडा असल्याने या संतांना मराठीची वकिली करावी लागे. ज्ञानेश्वर गेले त्या प्रत्येक क्षेत्रीं त्यांच्या श्रेष्ठ व्यक्तिमत्वाचा प्रभाव मराठीचा भाव वाढवीत असल्यास नवल नाही. महानुभाव पंथातील मराठीचा अभिमान जाज्वल्य असला तरी पंथनिविष्ट होता, आणि ज्ञानेशांच्या मराठीच्या अभिमानाचा वारसा महानुभावासुद्धा कोणत्याही पंथीयाला घेणें सहजशक्य असल्याने त्यांचें महत्व 'अखिल महाराष्ट्रीय' होते. सारांश ज्ञानेश्वरांच्या तीर्थयात्रा या पर्यायाने मराठी भाषेच्या तीर्थयात्रा ठरल्या आणि यात्रेचे पुण्य ज्ञानेशांच्या जोडीने किंवा कांकणभर अधिकच तिला लाभून तिची उन्नति झपाट्याने होऊं लागली.

## ५३ प्राचीन संतांच्या यात्रा.

जुन्या संतचरित्रांतून अनेक संतांनी तीर्थयात्रा केल्याचीं वर्णनें सापडतात. त्यांत ज्ञानदेव, नामदेव, कृष्णमुनी महानुभाव, एकनाथ, रामदास इत्यादिकांच्या यात्रा महत्वाच्या आहेत.

यांच्या यात्रांचें कथित अकथित उद्देश कांही असले तरी त्यांचा परिणाम सामाजिक तथा भाषिक दृष्ट्या अत्यंत इष्ट असा

झालेला आहे. पतित बापाच्या पोटीं आलेल्या ज्ञानदेवाने ब्राह्मण्याचें आगर अशा काशींत यज्ञप्रसंगीं अग्रपूजा घेणें, नामदेवाचे अभंग पंजाबांत भावपूर्वक गायिले जाणें, कृष्णमुनीमुळे मायभाषा नसूनही मराठीचा अभ्यास सुदूर उत्तरीं आदरपूर्वक केला जाणें, नाथामुळे प्राकृतवाणीचें गीर्वाणपूजकाकडून गीर्वाणमहापीठांतच स्वागत होणें आणि रामदासामुळे 'अवघा हलकल्लोळ' माजून स्वातंत्र्याचें 'आनंदवनभुवन' निर्माण होणें या गोष्टी महाराष्ट्राच्या सांस्कृतिक विकासाचे टप्पे ( mile stones ) होत.

## ५४ 'नमन' आणि समाधि

आषाढी कार्तिकीस पंढरपुरास जाण्याचा सर्व संतांचा शिरस्ता होता त्याप्रमाणे शके १२१८ च्या कार्तिक शु. १०स सर्व संतमंडळी जमली असतांना ज्ञानेश्वरांनी नामदेवादि संतांसमक्ष श्रीपांडुरंगास आपली जिवंत समाधि घेण्याची इच्छा सांगितली, व त्याने कार्तिक वद्य १३ स समाधि घेण्यास अनुमति दिली. ही समाधि आळंदीस सिद्धेश्वराच्या देवळाच्या डाव्या अंगास अजानवृक्षाच्या छायेखालीं दोन खणांची एक गुहा तयार केली होती तेथे त्यांनी घेतली (समाधीच्या वेळीं साक्षात् विठ्ठलाने कपाळीं केशरी गंधाचा टिळा लावून गळ्यांत हार घातला आणि रखुमाईने ओवाळलें अशी दंतकथा आहे.) आळंदीस सारा भक्त समुदाय लोटला. कार्तिक वद्य १३ गुरुवार

शके १२१८ दुर्मुखसंवत्सर, माध्यान्हकाळ हा समाधि-दिनाचा तपशील समकालीन संतांनी दिलेला असून जन्मशकाप्रमाणे त्यांत भिन्नमतें नाहीत. या दिवशीं ज्ञानेश्वरांचें वय बरोबर २१ वर्षे ३ महिने व ५ दिवस होतें. सर्व भक्तांच्या प्रेमाचें हें निधान समाधिस्थ होण्याची वेळ जसजशी जवळ येऊं लागली तसतसें एकेकाचें हृदय उलून जाऊं लागलें. "हे उपजे आणि नाशे। तें मायावशें दिसे। येरवीं तत्वता वस्तु जे असे। ते अविनाशचि॥" ह्या वेदांताने त्यावेळीं सांत्वन कसें होणार! ज्ञानेश्वरांनी १०८ ओव्यांचें **'नमन'** केलें आणि ते समाधीकडे जाऊं लागले. 'नमन' हेंच त्यांचें अखेरचें काव्य. हें ऐकतांना व नंतर निवृत्ति, सोपान, मुक्ता व नामदेव यांची स्थिति अत्यंत केविलवाणी झाली आणि जड अंतःकरणाने त्यांनी प्रसंगाला कसेंबसें तोंड दिलें. 'बाहिरि पद्मासन रचूनि। उत्तराभिमुख बैसोनि। जीवीं सुख सूनि। कर्मयोगाचां॥ आंतु मीनलेनि मनोधर्में। स्वरुप ( सूर्य ) प्राप्तीचेनि प्रेमें। आपीं आपु संभ्रमें। मिळावेया॥ ज्ञा. ८-९१,९२॥ अशा पद्धतीने ते समाधिकरिता मुद्दाम तयार केलेल्या गुहेंत बसले. खाली तुळशी-बेलाचें आसन होतें व पुढे ज्ञानेश्वरी होती. ज्ञानदेवाने निवृत्तीला नमस्कार केला, सर्वांचा निरोप घेतला आणि—

तीन वेळ तेव्हां जोडिलें करकमळ । झांकियेले-डोळे ज्ञानदेवें ॥
भीममुद्रा डोळां निरंजन मैदान । झाले ब्रह्मपूर्ण ज्ञानदेव ॥
नामा म्हणे आता लोपला दिनकर । बाप ज्ञानेश्वर समाधिस्थ ॥

नंतर निवृत्तिनाथ गुहेच्या बाहेर आले आणि समाधीवर त्यांनी शिळा बसविली. मग हजर असलेल्या संतांनी अत्यंत जड अंत:करणाने शिळा—पूजन केलें व समाधिस्थ ज्ञानेश्वरांचा निरोप घेतला.

## ५९ भावंडांचें निर्याण.

ज्ञानेश्वरांच्या समाधीचे अत्यंत हृदयस्पर्शी वर्णन नामदेवाने केलें आहे. ज्ञानेश्वरांच्या निर्वाणानंतर त्यांच्या भावंडांना जीवन नकोसें झालें. हीं भावंडें पुढे पुरते ८ महिनेही काढूं शकलीं नाहीत. सोपानदेवाने बरोबर महिन्याभराने शके १२१८ मार्गशीर्ष वद्य १३ स सासवडीं समाधी घेतली. सोपानाच्या मागे पांचच महिन्यानी मुक्ताईने निरोप घेतला. एदलाबादेजवळ तापीतीरीं ती ‘ आकाश मार्गाने विजेचा प्रचंड कडकडाट ’ झाल्यावेळीं अदृश्य झाली. हा दिवस वैशाख वद्य १२, शके १२१९ हा होय. बरोबर महिन्यानंतर शके १२१९ ज्येष्ठ वद्य १२ स निवृत्तिनाथाने त्र्यंबकेश्वरीं समाधि घेतली. ह्या भावंडांचे मृत्युशक समकालीन संतांनी उल्लेखिलेले असून त्यांत सर्वांचें एकमत आहे.

## ५६ जीवनाचा महोदधि घुसळून काढलेला उपदेशामृताचा सु–वर्ण कलश.

ज्ञानेश्वर गेले ! ते गेले नाहींत. ज्ञानेश्वरांनी आपला पार्थीव देह टाकला आणि ते अमर झाले. अवघ्या १५ वर्षांच्या अल्प कालांत जीवनाचा महोदधि घुसळून काढून उपदेशामृताचा कधींही कमी न होणारा सु–वर्ण कलश त्यांनी आपल्याला दिला आहे. "भलतेणें" तो ध्यावा आणि अमर व्हावें अशी त्यांची इच्छा आहे. ह्या सुवर्णकलशाच्या नुसत्या दर्शनानेंही ' मन स्वर्गा वांत वाकुलिया । हृदयाचा जीवीं गुतकुळिया । होती ........ ॥ ज्ञा. ७–१८५ ॥ अशी स्थिति होते.

हा अमृत कलश प्रत्यक्ष हातीं वागविण्याचा अधिकार ज्यांना सद्गुरुकृपेनें मिळाला त्या भाग्यवान् शिष्यांची परंपरा बघून ज्ञानेश्वरकालीन पंथोपपंथांचा विचार करूं.

## ५७ शिष्यपरंपरा.

निवृत्तीनेच ज्ञानदेव, सोपानदेव, आणि मुक्ताबाई यांना उपदेश दिला असा उल्लेख कांहीं संतांच्या अभंगांतून आढळतो; परंतु स्वामी एकनाथांनी 'ज्ञानदेवें........सोपान मुक्ताई बोधियेली ' असें म्हटलें आहे, आणि तेंही त्यांच्यावेळच्या रूढ समजुतीस धरून म्हटलें असलें पाहिजे. तें जमेस धरून **ज्ञानेश्वरांची शिष्यपरंपरा** अशी सांगतां येईल :–




---

६२ ज्ञानेश्वरीचा 'आदर्श लेखक' झालेल्या ह्या सच्चिदानंदबाबाने लिहिलेला 'ज्ञानेश्वर विजय' नांवाचा ग्रंथ अनुपलब्ध आहे. याचा दुसरा ग्रंथ 'मानसपूजा' असून त्यांत नाथसंप्रदायाची माहिती दिली आहे. पहा 'श्री भगवद्गीता-व्याख्यान, ज्ञानदेवी' पृ. ३३, सं. डॉ. रा. ग. हर्षे

६३ या सत्यामळनाथाने 'सिद्धांत रहस्य' उर्फ 'ललितप्रबंध' या ग्रंथांत एका प्रकरणांत ज्ञानेश्वरांचे चरित्र वर्णिलें आहे. ग्रंथ अप्रकाशित आहे. 'ग्रंथरचनेचा ओघ व विषयप्रतिपादन एकनाथांच्या पूर्वीचें दिसतें ... 'परंतु ५ व्या प्रकरणांत रामदास-तुकारामांना नमन आहे त्यामुळे काल निश्चित करणें कठीण आहे. पहा पांगारकरकृत मराठी वाङ्मयाचा इति. खं. १ [ पृष्ठें ४९९-५०० ]

वरील शिष्यपरंपरेंत विसोबाखेचराचें नांव ज्ञानदेवशिष्य आणि सोपनदेवशिष्य असे दोन्हीकडे दिलें आहे याचें कारण असें की **महाविष्णूचा अवतार । श्रीगुरु माझा ज्ञानेश्वर ॥**, असा एका अभंगांत आणि दुसऱ्या अभंगांत '**चांगयाचा अंगिकार मुक्ताईने केला । सोपान बोळला मजवरी ॥**' आणि '**माझी मूळपीठिका सोपान सद्‌गुरु । तेणे माथां करू ठेवियेला ॥**' असे वेगवेगळे उल्लेख केलेले आढळतात, यावरून दोघेही त्यांना गुरुस्थानीं होते हें स्पष्ट आहे. पांगारकर म्हणतात, "योगाची खेचरी मुद्रा देऊन मस्तकावर वरदहात ठेविला सोपानदेवांनी, व योगाची आणखी कांही रहस्यें सांगून अद्वैतबोध व भक्तिमार्ग यांचा उपदेश केला ज्ञानेश्वरमहाराजांनी ! शिवाय सच्छिष्यांना सर्व गुरुकुळ गुरुरूपच असतें. मुक्ताईने नामदेवांशी बोलताना 'ज्ञानदेवीं बीज वाढविलें जनीं । तेंचि आम्ही तुम्हीं संपादिलें', असें म्हटलें आहे विसोबांना जसा सोपानदेवाचा अनुग्रह, तसा मुक्ताईला निवृत्तिनाथाचा होता, तथापि त्या वेळच्या सर्वच भक्तमंडळांत ज्ञानेश्वरी आदि ग्रंथांच्या द्वारें ज्ञानेश्वरांनी अद्वैतभक्तीचा सर्वत्र प्रसार केला असल्यामुळे ज्ञानेश्वरांना तत्कालीन सर्व संत गुरुस्थानींच मानीत, सर्वांच्या अभंगांवर ज्ञानेश्वरांच्या वाणीची छाप पडलेलीही स्पष्ट दिसत आहे"[६४] याकरिता ज्ञानदेवांची शिष्यपरंपरा

---

६४ पहा– पांगारकरकृत म. वा. इतिहास. खंड १ ला पृष्ठें ५८६-५८७

केवळ वरील नांवांनी संपली असें म्हणतां येणार नाही. 'ज्ञानियांचा राजा' किंवा 'गुरु माऊली' म्हणून आळविल्या गेलेल्या ज्ञानेश्वरांना सारा वारकरी संप्रदाय पितृपूज्य मानतो. महाराष्ट्रांत आलेल्या संतमंडळींचे मुकुटमणी आचार्य किंवा अध्यक्ष ज्ञानदेवच आहेत व तो मान साऱ्या संतांनी त्यांना अत्यंत प्रेमाने दिलेला आहे. विसोबाखेचर नामदेवादि कांही थोडी मंडळी त्यांच्या योगमार्गाचेंही अध्ययन करूं शकली, त्या योगमार्गाचें रहस्य समजावून घेऊं शकली तरी ज्ञानेश्वरांनी सर्वसाधारण जनतेला केलेला उपदेश योगमार्ग निरपेक्ष अद्वैतभक्तिसुखाचा आहे, आणि त्यावेळचा भक्तांच्या मेळाव्याने सगुणभक्तीच्या मार्फत लाभणाऱ्या अद्वैतानंदाचा जयजयकार केलेला दिसतो.

## ५८ एकनाथ, तुकाराम हेही नाथपंथीच!

ज्ञानेश्वरानंतरच्या काळांतही त्यांच्या परंपरेला खंड पडला नाही. **'ज्ञानदेवें रचिला पाया'**[६५] या

६५ संतकृपा झाली । इमारत फळा आली ।।
ज्ञानदेवें रचिला पाया । त्याने बांधिलें देवालया ।।*
नामा तयाचा किंकर । त्याने केला हा विचार ।।
जनार्दनी एकनाथ । स्तंभ दिला भागवत ।।
भजन करा सावकाश । तुका झालासे कळस ।।
*पाठभेद —'उभविलें देवालया'

उक्तींतील उल्लेख केवळ लाक्षणिक अर्थाने नव्हे तर शब्दशः खरा दिसतो. कारण ज्ञानदेवानंतर पावणे- तीनशेंवर्षांनी झालेले स्वामी एकनाथ यांनी आपल्या गुरुपरंपरेंत 'तेंची मच्छेंद्रा लाधलें । पुढे परंपरा चालले ॥ तोचि बोध जनार्दनीं । एका लागतसे चरणीं ॥ ' असें म्हणून आपण त्याच पंथांतील आहोंत असें सुचाविलें आहे. एकनाथाची परंपरा किंवा पंथ आणि ज्ञानेश्वरांचा पंथ तत्वतः एकच होय असें दाखविण्यास अनेक प्रमाणें आहेत.[६६] एकनाथानंतरच्या काळांतही आदिनाथ शंकरापासून मत्स्येंद्र, गोरक्षादिकांची नांवें देऊन आपली परंपरा सांगणारे संत होऊन गेले. उदाहरणार्थ शके १४९० ते १५६० च्या दरम्यान हयात असलेले ज्ञानेश्वरांच्या अनुभवामृत या ग्रंथावर, आठ- पट मोठी टीका लिहिणारे शिवकल्याण यांनी अशी सोळा पुरु- षांची परंपरा दिली आहे.[६७] श्री संत तुकारामाची शिष्या बहिणाबाई यांनीही आपली परपरा थेट आदिनाथ—मच्छेंद्रनाथा- पासून सांगितली असून तीमध्ये ज्ञानेश्वरापासून तुकाराम महाराज सहावे दाखविले आहेत.[६८] ज्ञानदेवांनी रुजविलेला भागवतधर्म ज्ञानदेवोत्तरकाळीं विशाल वटवृक्षाप्रमाणे वाढू लागला आणि कांही अल्पसंख्य आणि अल्पविस्तर पंथ वगळल्यास

---

६६ पहा– 'श्री ज्ञानेश्वर दर्शन' खंड १ला पृ. ७०

६७ पहा– मराठी वाङमयाचा इतिहास खंड १ला पृष्ठ ५२०

६८ पहा –'श्री तुकारामचरित्र' ( ले. पांगारकर )पृष्ठ २२७

महाराष्ट्राच्या कानाकोपऱ्यांतूनही याच भागवत धर्माचा आदर होऊं लागला. उत्तरेकडील आणि पश्चिमेकडील कानफाटे आणि इतर पंथ, पूर्वेकडील शाक्तसंप्रदाय, व दक्षिणेकडील शैव वैष्णवांचे कलह यांना महाराष्ट्रांत जोराचा पाठिंबा असा कधीच मिळाला नाही, आणि ज्या थोड्या ठिकाणीं त्यांचें अस्तित्व टिकून राहिलें तें बहुसंख्य भागवतधर्मीयांच्या सहिष्णुतेवर, अद्वेषावर व अनसूयेवर होय.[६९] अर्थात भागवतधर्मांतर्गत वारकरी संप्रदायाचीं बाह्य चिन्हें आणि नाथपंथाचीं बाह्य चिन्हें यांत फरक असला तरी त्यांचें अंतरंग पुष्कळ बाबतींत एकच असलें पाहिजे असा निष्कर्ष निघतो. ह्या निष्कर्षाचा सविस्तर विचार करतांना 'नाथपंथ' आणि 'तत्कालीन धार्मिक स्थिति' यांचा विचार करावा लागेल.

## ५९ ज्ञानेश्वरकालीन धार्मिक स्थिति.

ज्ञानेश्वरांच्या काळांत महाराष्ट्रांत अनेक धार्मिक पंथ चालू होते. त्या पंथांत वैदिक आणि अवैदिक हे दोन भेद होते.

---

६९ भागवतधर्माचा स्तंभ झालेला एकनाथ किंवा 'कळस' झालेला तुकाराम यांनी महानुभावपंथाबद्दल ही सहिष्णुता किंवा अद्वेष दाखविलेला नाही उलट अनादरच व्यक्त केला आहे, परंतु याचें कारण या महान भागवतांच्या मनोवृत्तींत शोधण्यापेक्षा त्यांच्या काळांतील या पंथीयांच्या विशिष्ट कृतींनाच जबाबदार धरलें पाहिजे. पहा – वि. ल. भावेकृत महाराष्ट्र सारस्वत भाग १ ला पृ. ६८ ते ७३

बहुजन समाजांत वैदिक पंथ प्रामुख्याने प्रचलित होते. अवैदिक पंथांपैकी बौद्ध, जैन हे स्वतंत्र धर्म म्हणून गणले जात आणि दक्षिणेंतील ' लिंगायत ' हा पंथ म्हणून समजला जाई. वैदिक पंथांत आद्य शंकराचार्यांचे अद्वैतमत, रामानुजाचार्यांचे विशिष्टाद्वैतमत, मध्वाचार्यांचे द्वैतमत हीं तीन मतें आणि वैष्णव, भागवत, महानुभाव, नाथ आणि वारकरी असे पांच पंथ यांना प्रमुख गणले जाई. वरील वैदिक पंथांपैकीच एकाचे अनुयायी ज्ञानेश्वर असून दुसऱ्या वैदिक पंथाने त्यांना आपलें आचार्यत्व आनंदाने अर्पिलें आहे. वैदिक धर्मानुसारी लोकांतील कर्मकांडांत ' मम आत्मनः श्रुति स्मृति पुराणोक्त फल प्राप्त्यर्थं अमुकाख्यं कर्म करिष्ये ' असा उल्लेख करण्यांत येतो, त्यांत वैदिकतेचें गमकच दिलेलें आहे असें म्हणावयास हरकत नाही. साधारणतः ' श्रुति स्मृति पुराणोक्त ' मतमतांतरांचा स्वीकार हें वैदिक धर्माचें एक गमक ठरतें. दुसरें गमक वर्णाश्रमधर्मास मान्यता हें होय. बौद्ध जैनादि धर्मांना वेदप्रामाण्य आणि वर्णाश्रम अमान्य असल्याने त्यांना अवैदिक धर्म समजण्यांत येतें यां पैकी ज्ञानेश्वरांच्या काळापूर्वीच बौद्धधर्माचें पुरतें उच्चाटण महाराष्ट्रांतूनच काय पण भारतांतूनही बव्हंशीं झालेलें होते, आणि जैन धर्माची सद्दी नाहीशी होत होती.

## ६० बुद्धजैनादि धर्मपूर्व परिस्थितीची पुनरावृत्ति

इ. स. पूर्वी सहाव्या शतकांतील गौतम बुद्धाच्या वेळची

क्रांति ही केवळ धर्मक्रांति नसून एक प्रचंड व भयंकर स्वरुपाची समाजक्रांति होती. ह्या क्रांतीच्या धक्क्याने चातुर्वर्णिक समाज पुरता ढासळतो किंवा काय अशी भीति निर्माण झाली होती म्हणून वर्णाश्रमी आर्यांचे कित्येक जत्थे कुरु पांचाल मगधादि देशांतून नर्मदेच्या दक्षिणेकडे दक्षिणारण्यांत म्हणजे महाराष्ट्रांत वस्ती करण्यास आले होते असें एक मत आहे[७०]. आजच्या महाराष्ट्रीयांचे पूर्वज समजले जाणारे जे मरहट्ट किंवा महाराष्ट्रीय लोक ते हेच होते असें कै. राजवाडे म्हणतात[७१]. बौद्ध, जैन आदि अवैदिक धर्मांचे जन्म आणि प्रसार होण्याचें प्रमुख कारण तत्कालीन बहुजन समाजाच्या वाढत्या आकांक्षाना विधिनिषेधादि बंधनांनी जेरबंद घालून त्यांची करण्यांत आलेली मुस्कटदाबी हें होतें. बुद्धपूर्वकालांत जैमिनीने वेदांतील विश्वमोलाचें औपनिषदिक तत्वज्ञान गौण ठरवून ' आम्नायस्यक्रियार्थत्वात्.... ( पूर्व मीमांसा १-२-१ ) इत्यादि सूत्रांतून वेदांना केवळ कर्मकांडाचे कोठार ठरविलें आणि त्याची किल्ली कर्मठांच्या ताब्यांत दिली त्यामुळे धर्मांचें कर्माहून उच्चतर असलेलें स्वयंप्रकाशी ज्ञानस्वरुप ढगाळलें, व धर्माच्या ह्या रखवालदारांची वृत्ती अधिकाधिक संकुचित होत जाऊन बहुजन समाजाची कुचंबणा होऊं लागली आणि बहुजन समाजाच्या कुचंबणे-

---

७० पहा डॉ. पेंडसे कृत महाराष्ट्राचा सांस्कृतिक इतिहास, पृष्ठ ६९

७१ पहा सदर पृष्ठ ६९

तच भावी संघर्षाची बीजें रूजली. ह्या संघर्षाकरिता निर्माण झालेल्या संघटित सामर्थ्यांतून आर्यांचे वेद आणि वेदांची संस्कृत भाषा, तसेंच वैदिकांचे चातुर्वर्ण्य आणि वर्णविहित यज्ञादि कर्मे झुगारून देऊन औपनिषदिक सिध्दांतांना धाब्यावर बसवून स्याद्वाद, बहि:शून्यवाद, आदि स्वतंत्र तत्वज्ञानाच्या पायावर उभे केलेले अहिंसा व संन्यास शिकविणारे नवीनधर्म जन्माला आले. त्या धर्माच्या आद्यप्रणेत्यांनी लोकभाषेलाच धर्मभाषेचें स्थान देण्याची दक्षता घेतली आणि ते धर्म रूढ झाले.

वरील त्रोटक इतिहास येथे देण्याचे कारण असें की जवळ जवळ तशीच परिस्थिति ज्ञानेशांच्या काळींही निर्माण झाली होती आणि बहुजन समाजाचा वाढता असंतोष तशीच भयंकर स्वरूपाची क्रांति घडवून आणण्याचा संभव निर्माण झाला होता. ही परिस्थिति केवळ महाराष्ट्रांतच होती असें नव्हे तर महाराष्ट्रा-बाहेर इतर प्रांतांतही होती. ही क्रांतीची निशाणें महानुभाव पंथाच्या निर्मितीने महाराष्ट्रांत[७२] आणि लिंगायत पंथाच्या निर्मि-तीने कर्नाटकांत [७३] फडकूं लागलीं होतीं.

---

७२ शके ११९० मध्ये ऋद्धिपूर येथे या पंथाची मुहूर्तमेढ रोवण्यांत आली

७३ १०८२ च्या सुमारास चेन्नबसवाने दक्षिणेंत हा पंथ स्थापला. बौद्धधर्मानंतर महाराष्ट्रांत बराचकाळ टिकलेल्या जैन धर्माला नामोहरम करावयाला याच लिंगायत पंथाचा प्रसार कारण झाला. हा पंथ बसवाने स्थापला नसून त्याचीं बीजें थेट वेदकालांत सापडतात आणि या बसवे श्वरांपूर्वी या पंथाचे पांच मुख्य आचार्य होऊन गेले असेंही एक मत आहे. (पहा महाराष्ट्राचा सांस्कृतिक इतिहास, पृष्ठ ११५ लेखक डॉ. पेंडसे.)

## ६१ उत्तर हिंदुस्थानांतील लाजिरवाणी स्थिति

राजाश्रय व लोकाश्रय यांचा अभाव, पंथांत शिरलेली अनीति, एका पंक्षा एक जोराचे असे उत्तरोत्तर होणारे वेदांती मताच्या आचार्यांचे हल्ले, यांमुळे बौद्धधर्म जसा लयास गेला त्या प्रमाणेच ह्यांतील कांहीं कारणामुळे जैन धर्महि टिकून राहूं शकला नाही. कर्नाटकांत लिंगायत पंथाने व महाराष्ट्रांत नाथ वारकरी आदि पंथांनी त्यास पायबंद घातला. परंतु ज्ञानेश्वरपूर्व शतक दीड शतकाच्या काळांत महाराष्ट्रांत निर्मळ वैदिक संस्कृतीची भरभराट होत गेल्याने उत्तर भारताच्या मानाने तेथील परिस्थिति अत्यंत निराळी होती. उत्तर भारतांत वैदिक धर्म व संस्कृतीवर इस्लामी आक्रमणाने चढविलेल्या हल्ल्यामुळे तेथे तो धर्म आणि संस्कृति मूळ स्वरूपांत टिकून राहणें कठीण झालें होतें. इ. सन ७१२ त अरबांनी सिंध बळकावला. त्या नंतर गझनीच्या महंमुदाने मथुरेपासून सोमनाथापर्यंत असंख्य मूर्ति फोडून अगणित संपत्ति लूट म्हणून नेली. महंमद घोरीने सन ११९२ त पृथ्वीराजास व पुढे जयचंदास मारून उत्तरेचे साम्राज्य आपल्या ताब्यांत घेतले व तेव्हांपासून मुसलमानांच्या निरनिराळ्या घराण्यांचे आधिराज्य उत्तर भारतांत सिंधपासून बंगालपर्यंत सारखे अनेक शतकें टिकलें, व या काळांत बुद्ध किंवा वैदिक असला भेदभाव न होतां सर्वांचाच भारतीयांना पाशवी अत्याचाराला बळी पडावें लागलें.

**हें असें कां झालें ?** वैदिक आर्यांच्या वर्णव्यवस्थेंत धर्माचे व समाजाचे रक्षण करण्याचें बाळकडू आपोआप दिलें जात असे. क्षत्रियांनी क्षात्रकर्तव्यें आणि ब्राह्मणांनी ब्राह्मणकर्तव्यें योग्य रीतीनें केल्यास धर्मरक्षण, आणि समाजरक्षण आपोआप होऊं शकत होते परंतु क्षत्रिय हे परस्पर कलह करीत बसून आणि ब्राह्मण हे कर्मकांडांच्या विधिनिषेधाचा गोंडा घोळीत बसून कर्तव्यच्युत झाले. त्यांच्या कर्तव्यच्युतीवर उतारा म्हणून निर्माण झालेल्या बुद्धजैन धर्मांना ऐहिक कर्तव्यें शिकाविणारी नवीन समाज व्यवस्था करून देतां आली नाही. साहजिकच कुठलें तत्वज्ञान नि कुठलें कर्मकांड अशी स्थिति होऊन हताश झालेला समाज कसें बसें कोरडें जीवन जगूं लागला. अशा परिस्थितींतही पारलौकिक आत्मोन्नतीला पूर्णपणें अर्धचंद्र न देणाऱ्या त्या समाजांत रामानंदासारखे कांही यति निर्माण झाले आणि त्यांनी पारलौकिक उन्नतीचा, विरोधी परिस्थितींतही अत्यंत सुलभ असा भागवतोक्त भक्तिमार्गाचा उपदेश लोकांना केला [७३] परंतु यांच्यापेक्षा अधिक महत्वाचे उद्योग, प्रसिद्ध साधु कबीर यानें संयुक्त प्रांतांत आणि गुरुनानक यांनी पंजाब प्रांतांत केले. यांच्या उद्योगाचें वैशिष्टय हिंदुधर्म आणि महंमदीधर्म यांच्यांतील कांही विशेषांचें एकत्रीकरण करण्यांत दिसून येतें. अशा उद्योगांत तत्कालीन परिस्थितीचें खरें चित्र उमटलेलें आहे असें

---

७३ रामानंदांचा काळ इ.स. १३८० ते १४११

म्हणणें चूक होणार नाही. परंतु यति रामानंद, साधुकबीर किंवा गुरुनानक हे सत्पुरुष ज्ञानेश्वर समकालीन नव्हत. ज्ञानेश्वरांच्या नंतर सुमारें शतकादोशतकांच्या काळांत वरील प्रयत्न होऊं लागले होते. प्रत्यक्ष ज्ञानेश्वरांच्या काळांत उत्तर भारतांत परधर्मांच्या क्रूर टाचेखाली हिंदूधर्म अक्षरशः चिरडला जात होता ही वस्तुस्थिति होती.

## ६२ दक्षिण भारताची अदूरदृष्टि.

या वस्तुस्थितीचें यथार्थज्ञान दक्षिणेकडील क्षत्रियांना नसल्याने किंवा असलें तर असूनही त्यावरून दूरदृष्टीने विचार करून बोध घ्यावयाची कुवत नसल्याने क्षात्रतेजाची तोफ उत्तरेकडे वळविण्या ऐवजीं ते आपसांतील कलहांतच दुर्दैवाने व्यग्र झाले, आणि जे क्षात्रिय असे व्यग्र झाले नाहीत ते कर्मठ ब्राह्मणांच्या संगतीने व्रतवैकल्यादिकांच्या संपादनांत किंवा भोजनप्रिय ब्राह्मणांच्या संगतीने शस्त्रापेक्षा पक्वान्नावर तुटून पडण्यांत कृतकृत्यत मानूं लागले. यादवघराण्याचा थोडा इतिहास पाहिला असतां या विधानाचे अधिक स्पष्टीकरण आपोआप होईल.

## ६३ यादवांचा थोडा इतिहास.

दक्षिणेंतील यादव घराणें १२ व्या शतकापावेतो मांडलिक म्हणून राज्य करीत असतांनाच चालुक्य, राष्ट्रकूट, शिलाहारादि घराण्यांशीं त्याघराण्याचे लग्नसंबंध होऊन त्यांचे महत्व वाढूं

लागले होते. बाराव्या शतकाच्या दशकांत या यादव घराण्या-पैकी भिल्लम यादवाने सोमेश्वर चालुक्याला जिंकून देवगिरी येथे आपले सार्वभौम राज्य स्थापन केलें. या घराण्यापैकी एक होयसाळ यादव शाखा कृष्णेच्या दक्षिणेस राज्य करीत होती. या यादवांच्या काळांत राज्याची सीमा वाढूं लागली, व सीमे-बरोबर वैभव वाढूं लागले परंतु हें वैभव उत्तरकोकण, दक्षिण-कोकण, दक्षिण महाराष्ट्र, कुंतल, माळवा, गुजराथ व छत्तिसगड इत्यादि ठिकाणच्या हिन्दू घराण्यांच्याच मूळावर आलें होतें, हे विसरतां येत नाही. तथील कदंब, पांडव, शिलाहारादि घराण्यांना नामोहरम करण्यांत यादवांच्या सेनापतींनी व त्यांच्या पुत्रादिकांनी असीम शौर्य गाजविलें. वेळीं प्राणार्पण करूनही क्षात्रतेजाची दिव्य ज्योत तेवत ठेवली. परंतु ही क्षात्रवृत्ति पुढे कायम टिकली नाही. वर म्हटल्याप्रमाणे आजूबाजूच्या हिंदुराजांची सत्ता बळकावून कां होईना परंतु सुसंघटित झालेलें हें सम्राट यादवांचे राज्य वाढत्या वैभवाच्या धुंदीने हळुहळू विलासभोगासक्त झालें. उत्तरेकडील परिस्थिती तर त्यांनी समजून घेतली नाहीच परंतु आक्रमणाऐवजी केवळ स्वसंरक्षणाची पाळी आली तेव्हांही हें भोगासक्त साम्राज्य दुर्बळ ठरलें.

## ६४ यादवांचा उत्तरकाल व हिंदुधर्माची गोचवी.

हे यादवघराणें वैदिक संस्कृतीचे व विद्या कलादिकांच पुरस्कर्ते होतें. त्यांच्या कारकीर्दीत यज्ञप्रधान संस्कृतीचें पुनरुज्जी-

बन झालें. कृष्णदेव यादवाने ( सन १२४७ ते १२६० ) अनेक यज्ञ केले. यांच्या काळांत ज्योतिष, वेन्दात धर्मशास्त्र, गणीत, इत्यादि शास्त्रांवरील अनेक ग्रंथाबरोबरच कर्मकांडाचा पुरस्कार करणारे ग्रंथही निर्माण होऊं लागले. चतुर्वर्णप्रधान समाजव्यवस्था आणि वर्ण विशिष्ट आचारमार्ग यांना महत्व प्राप्त झालें. प्रत्यक्ष वेदान्त आणि इतर शास्त्रें यांवरील रचना संस्कृतांत होत आणि वादविवादही संस्कृतांत चालत. साहजिकच व्यवहारांतील बोलभाषेपलीकडे अध्ययन न करूं शकणाऱ्या बहुजन समाजास संस्कृतांतील हे कडाक्याचे वाद आणि त्यांतूनी सिद्ध होणाऱ्या मतमतांतरांचा प्रत्यक्षाप्रत्यक्ष लाभ मुळीच होत नसे त्यांचें जग निराळें व यांचें निराळें. परंतु त्यांची धार्मिक भूक शमविण्याकरीता जें पुराणादिकांचें श्रवण आणि जी देवदेवतांची पूजाअर्चा करावी लागे त्याकरिता परत याच ब्राह्मणसमाजाकडे वळल्याशिवाय त्यांना गत्यंतर नसे.

बौद्ध आणि जैन दोन्ही धर्मांनी वैदिक संस्कृतीवर घातलेला घाव सोसूनही ती संस्कृति जिवंत राहिली खरी, परंतु तिच्यांतील मूळचें पावित्र्य, तेज, गुणकर्मविभागोत्तर वर्णस्वभाव व उदात्त ध्येयें यांचा लोप झाला. वैदिक म्हणविल्या गेलेल्या तत्कालीन संस्कृतींत ब्राह्मणांना वैदिक धर्म जसाचा तसा आणतां आला नाही. त्याऐवजीं त्यांस स्मृतिकालांतील पुराणोक्त धर्माचें स्वरूप देण्याचा त्यांनी प्रयत्न केला. मन्वादि स्मृतींनी ब्राह्मणांना दिलेलें मोठेपण त्यांनी आपल्याकडे घेतलें, आणि तें घेतांना क्षत्रियांना

राजकर्ते ह्मणून आवश्यक तेवढे दुसऱ्या दर्जा   ण देऊन वैश्यांना सुद्धा हीन ठरविलें. स्त्रियांनाही मानाच्या स्थान राहिलें नाही. इ. स. १०३०त लिहून ठवलेल्या अल्बेरुणीच्या वृत्तामध्ये ब्राह्मण क्षत्रिय, वैश्य, शूद्र अशा चातुर्वर्णिक समाजाव्यतिरिक्त अंत्यज आणि अंत्यजापेक्षाही हीन असे अधिक दोन समाज दिले असून वैश्य व शूद्र परस्परांत मिसळत असल्याची व कोष्टी, कोळी, बुरुड, परीटादि कारागीर, उत्पादक व्यापारी वर्गांना अंत्यजांत समाविष्ट केले जात असल्याची माहिती दिली आहे[७४]. तत्कालीन राजमान्य ब्राह्मणवर्गाने आपल्या ऐहिक वर्चस्वाचा पुरेपूर फायदा घेतला आणि जन्मनिर्णित जातिसंस्थेला झुगारून देणाऱ्या कित्येक पंथीयांच्या देवताही त्यांनी स्वीकृत केल्या व या देवदेवता, यंत्रतंत्रें, व्रतवैकल्य यांचें बंड माजवून सकामभक्ति रूढ केली. लोकव्यवहारांत सामान्यपणे रूढ असलेल्या शीतला,

---

७४ श्री बा. रं. सुंठणकर म्हणतात, " ज्या वर्गाच्या श्रमावर समाजाचें भरणपोषण चालतें त्या वर्गाची अशी हेळसांड झाल्यानंतर समाजाची आर्थिक घडी चांगल्या स्थितींत असणें शक्य नव्हतें. आर्थिक आणि सामाजिक दुरवस्था हे त्याचे परिणाम होते. हिंदूसमाजाला तेच भोवले यांत शंकाच नाही. हिंदुस्थानांतील संत-विशेषतः महाराष्ट्रांतील संत हे याच वर्गांतून आले होते. या वर्गाची सर्व बाजूंनी कुचंबणा झाल्यामुळे तो अगदी अगतिक झाला होता. अगतिकेच्या पोटी असंतुष्टता आणि बंड जन्म घेत असतात. महाराष्ट्रीय संतांनी याच सामाजिक असंतुष्टतेला तोंड फोडले. (पहा-महाराष्ट्रीय संतमंडळाचे ऐतिहासिक कार्य' पृष्ठ १९ )

चामुंडा, ....नंदी भैरव, नाग, नवग्रह, औदुंबर, अश्वत्थ-वट इत्या। वतांचें उज्जीवन केलें. अवैदिक लिंगायतांच्या लिंगपूजेंत वैदिक रुद्राध्यायाचा उपयोग करून त्या पंथांतील शूद्र पुरोहितांनाही गंचाडी दिली, आणि आपलें कर्मकाण्डाचे स्वरूप सर्व संग्राहक व विस्तृत केलें. वास्तविक वैदिक आर्यधर्म हा अत्यंत लवचीक असल्याने या काळांतील पुढारी वर्गाने–ते ब्राह्मण होते हा योगायोग–आलेल्या संधीचा फायदा घेऊन त्याचे स्वरूप अधिक सर्व संग्राहक आणि सुसंघटित केलें हा एका दृष्टीने उपकारच होय. परंतु हाच उपकार अंती अपकार ठरला याचें कारण त्या संघटणेचा फायदा घेऊन तत्कालीन पुढारी समाज वर एकाठिकाणीं म्हटल्याप्रमाणे आर्यांचा मूळ वेद कालीन गुणकर्मोत्तर वर्णरचना, व ब्रह्मानुभूतिची पवित्र जिज्ञासा यांना परत आणूं शकला नाही[७५]. श्रीमदाद्यशंकराचार्यांनी सुमारें चार शतकांपूर्वीं अद्वैत मताची प्रस्थापना करून वैदिक धर्माची जी संघटना केला तीही आता विस्कळीत होऊं लागली होती. तत्कालीन शास्त्रज्ञांची जिज्ञासा म्हणून दिसे ती पोकळ होती, केवळ पांडित्याच्या प्रदर्शनार्थ होती, आणि अखेर ब्रह्म एकच आहे या भावनेने कोणत्याही देवतेला भजा अशा तत्कालीन तथाकथित तत्वज्ञ वेदमूर्तींनी केलेल्या

७५ कै. राजारामशास्त्री भागवत 'मराठ्यांसंबंधीं चार उद्गार' मध्ये वरील परिस्थितीचें कारण मूळची आर्यसंस्कृति आणि द्राविडी संस्कृति यांचें महाराष्ट्रांत झालेलें मिश्रण हें होय असें म्हणतात.

साळसूद उपदेशामागे विधिनिषेधरूप कर्मकांडांचा गोंधळ कायम ठेवण्याची बुद्धि होती. संत नामदेव म्हणतात—

तत्व पुसावया गेलों वेदज्ञासी । तंव भरले त्यापाशी विधिनिषेध ॥
तया समाधान नुमजे कोणे काळीं । अहंकार बळी झाला तेथे ॥
स्वरूप पुसावया गेलों शास्त्रज्ञासी । तंव भरले तयापाशी भेदाभेद ॥
एक एकाच्या न मिळती मतासी । भ्रांत गर्व राशी भुलले सदा ॥

अशा रीतीने माजलेल्या मतमतांतराच्या गलबल्याला कारण याद-वांच्या सुरवाती सुरवातीच्या जयिष्णु राजवटीमुळे आलेल्या ऐश्वर्याची धुंदी. यादवांच्या उत्तर काळांत खुद्द राजे आणि त्यांचे सेनापति हे सर्वसामान्य जनतेप्रमाणेच केवळ सुखैकदृष्टि, आणि व्रतैकदृष्टि झालेले होते. परशत्रू व अंतःशत्रु यांपासून स्वसंरक्षणार्थ करावयाच्या मेहनतीची आठवण त्यांना देण्याचें आपलें कर्तव्य ब्राह्मणांनी बजावलें नाही. खरा वर्णाश्रमधर्म विसरून जाऊन खोट्या व्रतैकल्यांच्या आहारीं समाज किती गेला होता याचें एक उदाहरण, रामदेवराव यादवाचा श्रीकरणाधिप ( पंतप्रधान ), हेमाद्रि या प्रकांड पंडिताने लिहिलेला ‘ चतुर्वर्ग चिंतामणी’ हा ग्रंथ होय. या ग्रंथांत दर दिवसास व दर तिथीला सांगितल्या व्रतांची एकूण संख्या दोन हजारावर होते. त्यांतही कोणत्या देवाचीं कोणतीं पक्वान्नें व किती ब्राह्मण यांचा तपशील श्रुतिस्मृतिपुराणांच्या आधारें दिला आहे ! व्रतें आणि पक्वान्नें यांची फारकत हेमाद्रिने कोठेही केली नाही ! केवळ व्रतोद्यापनां पेठे मिळणाऱ्या पारलौकिक सुखदुःखाचें आपलें खातें आपण

स्वतःच वेळोवेळीं पाहून खात्री करून घेण्याची कांहींच सोय नसली तरी त्या व्रतांतूनच आमच्या पारलौकिक कल्याणाच्या खात्यांत निस्संशय भर पडते अशी बळकट श्रद्धा असल्याने बहुजन समाज त्यानादीं लागल्यास आश्चर्य कोणतें? 'उदंड जाहलें पाणी स्नानसंध्या करावया' या श्रीसमर्थोक्तींतील केवळ शद्बार्थ सांगणारी या हेमाद्रीची एक उक्ति प्रसिद्ध आहे. तो म्हणतो "क्षीणः कालवशात् पुनस्तरुणतां धर्मोऽपि संप्रापितः"

## ६५ ज्ञानेश्वरीची साक्ष.

स्वतः ज्ञानेश्वरांनीही एका ठिकाणीं बहुजन समाजाच्या व्यभिचारी भक्तींचें दांभिक स्वरूप वर्णन केलें आहे. ते म्हणतातः—

एकादशिचा दिसिं । जेतुला पाडु आमासिं ।
तेतुलाचि नागांसि । पंचमिसी ॥
चौथि मोटकी पाहे । आणि गणेशाचाचि होए ।
चाउदसिं म्हणे माए । तूझाचि घो दुर्गे ॥
नवमीतें मांडी । आणि बैसे नवचंडी ।
आदित्यवारिं वाढी । भैरवां भरीं ॥
पाठिं सोमवारु पावे । आणि बेलेंसि लिंगा धांवे ।
ऐसें एकलाचि आघवें । जोगावी जो ॥
अखंड भजन करी । उगा न राहे क्षणभरी ।
आघवेनि गांवदारी । ऐहेव जैसी ॥[७६]

---

७६. ज्ञानेश्वरी १३–८१६ ते ८२०

गांवांतील सगळे उंबरठे झिजविणारी अखंड सौभाग्यवती वेश्या आणि तत्कालीन समाजाची देवतापूजनविषयक नीति यांत कांहीच फरक नव्हता

## ६६ ज्ञानेश्वरांची थोरवी.

सारांश असा की "........बौद्धिक बेबंदशाही व अध्यात्मिक गोंधळ यांनी सारा देश बुजबुजाटून गेला होता. सर्व समाज विनाश व विघटना यांच्या चक्रांत सापडला होता "[७७] आणि याचें कारण '**स्व-धर्म**' म्हणजे काय व वर्णाश्रमधर्माप्रमाणे '**स्वकर्तव्य**' कोणतें याची बिस्मृति समाजांतील सर्व वर्गांना होऊन समाज विस्कळीत आणि दुर्बल झाला. वर्णश्रेष्ठ ब्राह्मणाने स्वतः च्युत होऊन, राष्ट्राच्या संरक्षकांस कर्तव्यच्युत केलें. धर्मावर संकट आल्यास ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य या द्विजातींनी शस्त्रधारण करावें, ('शस्त्रं द्विजातिभिर्ग्राह्यं धर्मो यत्रोपरुध्यते' –मनुस्मृति) असल्या धर्माज्ञा तर पार विस्मृत झाल्या आणि उलट या द्विजातिपैकी त्या कर्तव्याचा सर्वस्वीं भार धारण करणारा क्षत्रिय समाजही क्रियाशून्य झाल्याने भावी अनर्थाची अभ्रें एकत्र होऊं लागली. डॉ. पेंडसे म्हणतात, अशा बिकट

---

७७ पहा--श्री. सुंठणकर कृत 'संत मंडळाचें ऐतिहासिक कार्य' पृष्ठ २५ आणि 'Historical Role of Islam' by M. N. Roy, Page 97.

परिस्थितींतून " मार्ग काढणारा, धर्माचें खरें स्वरूप महाराष्ट्रांतील लक्षावधि जनतेला स्पष्ट करून सांगणारा, त्यांची धार्मिक भूक भागविणारा, व खरा धर्म विसरून केवळ बाह्य आचारांनाच धर्म म्हणून कवटाळणाऱ्या, लोकांच्या डोळ्यांत अंजन घालणारा कोणी तरी थोर पुरुष या वेळीं पाहिजे होता. सुदैवाची गोष्ट अशी की हें कार्य करणारा ज्ञानेश्वरासारखा थोर पुरुष याच वेळीं जन्माला आला "[७८]

ज्ञानेश्वरांची थोरवी यांतच आहे की अशी राष्ट्रीय आपत्तीच्या परिहारार्थ आवश्यक असलेला सद्बोध परिणामकारक शद्बांत, कधी लोकांना सहज पटणार दृष्टांत देऊन तर कधी त्यांचे निर्भीडपणाने वाभाडे काढून, त्यांच्याच म्हणजे लोकभाषा असलेल्या मराठींत त्यांनी केला. वेदज्ञ, तत्वज्ञ समजल्या जाणाऱ्या विद्वानांच्या विविध मतांचा आवश्यक तेवढा परामर्ष घेत, श्रीं शंकराचार्यांच्या अद्वैत सिद्धांताचें विषदीकरण त्यांनी केलें, परंतु संन्यासाला जास्त महत्व न देतां निष्काम कर्मयोगाची शिकवण दिली, वर्णाश्रमधर्माचें महत्व वर्णून आपल्या वर्णविहित कर्मांचे कर्तव्यबुद्धीने पालन करावयास उपदेशिलें. ज्यांचा कोप म्हणजे प्रत्यक्ष कालाग्निरुद्राचें वसतिस्थान होय, आणि सहज होणारा प्रेमप्रमाद म्हणजे अष्टसिद्धींच्या

७८ पहा—डॉ. पेंडसेकृत ' महाराष्ट्राचा सांस्कृतिक इतिहास ' पृष्ठ १३८

प्राप्तीची पर्वणी होय, ( ज्ञा. ९-४७८ ) अशा, ' मेणाहुनि मऊ । आम्ही विष्णुदास । कठीण वज्रासि भेदु ऐसे ।' या पदवीच्या ' पुण्यपुंज ' ( ज्ञा. ९–४७९ ) ब्राह्मणांची ' पृथ्वी तळिंचे देव,.......अवतार सावयव ' ( ज्ञा ९–४७१ ) अशी तोंड भरून स्तुति करणाऱ्या ज्ञानेश्वरांनी त्याच अध्यायांत पुण्य संचयार्थ (!) कर्मकांडाचा काळाबाजार करणाऱ्या, "विधि मार्गा कसवटी' ( ज्ञा. ९–३०४ ) ठरलेल्या कर्मठ दीक्षितांची, ' जैसा भाडीचा कवडा वेचे । मग दाम्ही नेंपू नैये तेयाचें । ऐसे लाजिरवाणें दीक्षितांचें । काइं सांघो ॥' (ज्ञा. ९-३२६) असल्या इरसाल शद्बांत कठोर निर्भर्त्सना करण्यासही मागे घेतलें नाही. जेथील चंद्र क्षयरोगी आहे, जेथे होणारा उदय अस्ताकरिताच असतो, जेथ सुखाचें कातडें पांघरलेला दुःखाचा लांडगा आमची लांडगेतोड करण्याकरीता टपलेला आहे, जेथील सुखशय्येवर तप्त इंगळांची गुलाबी पखरण घातलेली असते, तेथ म्हणजे असल्या इहलोकीं असल्यावर ( ज्ञा. ९-४१६,७ ) त्यांतच रमण्यापेक्षा आपलें मूळरूप, आत्मरूप ओळखून, ' शरीराचेया गांवा । जेयालागी आले पांडवा । तो कार्यार्थु आघवा—' ॥ ज्ञा. ७–१०२ ॥ साधून घेणें, किंवा ' आतां महानदी हे माया । उतरौनियां धनंजया । मी होईजे हे आया । कैसेनि ये ॥ ' ज्ञा. ७-६६ ॥ याचा विचार करून अखिल भूतजात म्हणजे मीच, ब्रह्म म्हणजे मीच असें ' अहं ब्रह्मास्मि ' चें ज्ञान विज्ञानासह करून देणारें शास्त्र जगांतील सर्व शास्त्रांत उच्चतम शास्त्र कसें

आहे याची स्वानुभवपूत शब्दांनी चिकित्सा केली आहे. अज्ञानाची मीमांसा केली, जगदुत्पत्ति सांगितली आणि त्या बरोबरच ह्या ज्ञानाकडे जाणाऱ्यांनी, व तेथवर जाऊन पोहोचणाऱ्यांनी 'प्राप्तार्थ' झाल्यावरही विश्वाला मार्गदर्शन करण्याकरिता, निष्काम कर्मयोगाचा आदर्श पुढे ठेवला पाहिजे असें प्रतिपादलें, किंबहुना असा स्वत:चाच सर्वांगपरिपूर्ण आदर्श जनतेसमोर उभा करण्यांत त्यांच्या मोठेपणाचें सारसर्वस्व आहे असें म्हणतां येईल. ज्ञानेश्वरांचा हा आदर्श प्रत्यक्ष कितपत परिणामकारक झाला हा प्रश्न वेगळा, कारण ज्ञानेश्वरीच्या जन्मानंतर अवघ्या अर्ध्या शतकांत ज्ञानेश्वरांच्या या आवडत्या महाराष्ट्राच्या कपाळीं परधर्मीयांच्या पाशवी पाशांत अडकणें आलें ही वस्तुस्थिति आहे. परंतु त्यावेळीं जरी त्यांच्या शिकवणुकीचा फायदा झालेला दिसला नसला तरी त्या पाशवी पाशांना छिन्नभिन्न करण्याची स्फूर्ति साडेतीनशें वर्षांनी का होईना परंतु महाराष्ट्राने त्या ग्रंथमाऊली कडून घेतली. ज्ञानेश्वरांचें अमर तत्वज्ञानामृत महाराष्ट्रास लाभलेली एक संजीवनी ठरली.

ज्ञानेश्वरांनी हें अद्वैत तत्वज्ञान सांगतांना प्रामुख्याने भक्तियोगाची कास धरली. त्यांच्या काळांत सर्रास रूढ असलेलीं 'भोगासाठी भजनें' (ज्ञा. ७-१३५) बंद करून जीवब्रह्मैक्याकरिता करावयाची भजनें ज्ञानेश्वरांनी प्रतिपादलीं. ह्या प्रतिपादनाचा विचार करितांना नाथपंथ आणि वारकरीपंथ यांचा स्वतंत्र विचार करणें आवश्यक ठरतें.

## ६७ लिंगायत, (वीरशैव), वैष्णव, भागवत महानुभाव, नाथ, आणि वारकरी.

लिंगायतांना वीरशैव अशीही संज्ञा आहे. वैष्णव पंथाबरोबर शैवपंथाचाही विचार वास्तविक वैदिक म्हणूनच व्हावयास पाहिजे, कारण दोहोंच्या मूळ देवता अनुक्रमें विष्णु आणि शिव ह्या वैदिकच[७९] आहेत. एवढेच काय पण शिवविष्णूंची एकात्मताही उपनिषदांतून वर्णिलेली आहे.[८०] परंतु विष्णूपासकांनी वैदिक देवतेबरोबर श्रुतिस्मृत्योक्त आचार विचार कायम ठेवले, निदान वेदप्रामाण्य मानलें, तर लिंगायतादि शिवोपासकांनी देवता वैदिक घेतली असली तरी श्रुतिस्मृतींना झुगारून देऊन आगमांना प्राधान्य दिले, यामुळे त्यांना वैदिक समजत नाहीत. लिंगायती स्त्रीपुरुषांच्या गळयांत चांदीच्या शाळुंकेंत एक महादेवाचें लिंग असतें. हें चांदीच्या किंवा लाकडी करड्यांत घालून गळ्यांत अडकवितात. जंगम तें डोक्यावर ठेवतात. लिंगधारण हेंच त्यांचें वैशिष्ट्य, यांचा प्रसार १२ व्या शतकांत मुख्यतः कर्नाटकांतच झाला. त्यामानाने महाराष्ट्रांत फारच कमी झाला. लिंगायत वगळून बाकीचे पांचही पंथ वैदिक होत. या महत्वाच्या पंथांशिवाय शाक्तसंप्रदाय, देविसंप्रदाय, गाणपत्यसंप्रदाय, रुद्रसंप्रदाय असे अनेक लहान पंथोपपंथ विद्यमान होतेच. त्यांचा

---

७९ पहा—म. वा. इति.—ले. पांगारकर पृष्ठें १७१ ते १७६

८० पहा—सदर पृष्ठें १७७ ते १८०

विचार येथे प्रस्तुत नाही. वरील वैदिक पंथांचा विचार पुढे क्रमाने केला आहे.

## ६८ वैष्णव आणि भागवत.

वैष्णव आणि भागवत हे दोन्ही पंथ विष्णूचे उपासक होत, आणि विष्णूची नारायण, वासुदेव आदि स्वरूपांत (एकांतिक) भक्ति करून तद्द्वारा मुक्ति मिळविणें हें या पंथाचें आद्यतत्व होय अवतार समजले गेलेले नर नारायण यांनी हा एकांतिक धर्म प्रसृत केला म्हणून यास 'नारायणीय' असें मूळचें नांव आहे, आणि, पुढे, अर्जुन व भगवान् श्रीकृष्ण हे नरनारायणाचे अवतार होत अशा बुद्धीने या धर्माला भागवतधर्म म्हणूं लागले. वेदकाळानंतर उपनिषदें लिहिलीं जाऊं लागलीं तेव्हा हा धर्म अस्तित्वांत आला. पांचरात्रमतांतील सिद्धांतांना यांत स्थान आहे. वासुदेव, संकर्षण, प्रद्युम्न आणि अनिरुद्ध ही चतुर्व्युह कल्पना यांत प्रधान समजली जाते. नारायणीय धर्मास जसे मागाहून भागवत हें नांव पडलें त्याप्रमाणेच मूळ नारायणीय धर्म, नंतरची वासुदेवभक्ति आणि विष्णु हे दैवत परब्रह्म मानण्यांत येऊं लागल्यावरचा विष्णुभक्तिसंप्रदाय अशा तीनही पंथांचें एकीकरण होऊन वैष्णव-संप्रदाय किंवा पंथ हें नांव रूढ झालें. मूळच्या नारायणीय धर्माला मिळालेलीं दोन्ही नांवें ख्रिस्तशतकापूर्वीचीं होत. ख्रिस्तशतका-पूर्वीच्या काळांत आभीर जातीने कृष्ण-गोपींच्या लीलांचा समावेश

यांतच करवून घेतला[८१] आणि तेव्हापासून वैष्णव किंवा भागवत संप्रदायाचें तेंही एक वैशिष्टय होऊन बसलें. यापंथांत संन्यासाचें महत्त्व नव्हतें. आद्यशंकराचार्यांनी स्थापिलेल्या ज्ञानप्रधान अद्वैतमतापुढ या भक्तिप्रधान पंथाला कांही काळ माघार घ्यावी लागली. पुढे तीन शतकानंतर रामानुजाचार्यांनी वैष्णवपंथाचें पुनरुज्जीवन केलें. रामानुजाचार्य विशिष्टाद्वैती होते; त्यांच्यानंतर एकाशतकाने मध्वाचार्यांनी या संप्रदायास पूर्णपणें द्वैती ठरवून त्याचा जोरदार प्रचार केला. दक्षिणहिंदुस्थानांत या पंथाचे श्रीवैष्णव, वीरवैष्णव, आणि स्मार्त वैष्णव असे तीनभेद आहेत. दक्षिणहिंदुस्थानांत वैष्णवपंथाचा प्रचार करणाऱ्या तामीळसंतांना 'आळवार' अशी संज्ञा आहे. बंगाल, उत्तरहिंदुस्थान इकडे या पंथांत राधाकृष्णाच्या शृंगारावरच फार भर देण्यांत आला, परंतु महाराष्ट्रांतील संतांनी विष्णुभक्तींतील शुद्ध व सात्विक अंगावर अधिक भर दिला. महाराष्ट्रांत ही उपासना विठ्ठलोपासनेच्या नांवाने रूढ झाली, व याचें श्रेय पुष्कळ अंशीं संत नामदेवास आहे.[८२] भागवत किंवा वारकरी यांनी शिवविष्णूची एकात्मता मान्य केली, तशी मध्वाचार्यादि वैष्णवांनी मान्य केली नाही,

---

८१ पहा—महाराष्ट्रीय ज्ञानकोश वि. ४, 'बुद्धोत्तर जग'

८२ पहा-सदर विभाग १८, 'भागवत धर्म' आणि विभाग २० 'वैष्णव संप्रदाय.'

उलट शिवाच्या विरुद्ध मोहीम सुरु केल्याने दक्षिणेंत वैष्णव आणि शैव असा तंटा माजला. [८३]

## ६९ महानुभाव.

हा पंथ अवैदिक असल्याची समजूत थेट एकनाथ–तुकारामाच्या काळापासून आजपर्यंत चालत आली आहे. इतर पंथापासून पूर्ण अलिप्तता, पंथाचें वाङ्मय गुप्तलिपींतुन लपविण्याच्या प्रवृत्तीमुळे अज्ञानजन्य समजुतीचा प्रसार, वैदिक धर्माशी विरोध वा असहकारसूचक वर्तन, स्त्रियांना संन्यास दीक्षा देण्यासारख्या प्रकारांतून आढळणारे अवैदिकपंथांशी समानशीलत्व, इत्यादि कारणांमुळे ही समजूत रूढ झाली.

पथाचे आद्यसंस्थापक श्रीचक्रधर पूर्वाश्रमींचे हरपाळदेव नांवाचे एक प्रधानपुत्र होत. शके ११८६ च्या सुमारास यांनी संन्यास घेतला. शके ११९० ते ९४ पावेतो त्यांनी पंथप्रसार केला व नंतर ते बद्रिकेदारकडे निघून गेले. त्यानंतर प्रमुखशिष्य नागदेवाचार्यांनी पुढे प्रसार केला. चक्रधराच्या हयातींत ह्या पंथास केवळ महात्मापंथ एवढेच म्हणत. ‘ महानुभाव ’ हें नंतर मिळालेलें नांव होय. शंकराद्वैतानंतर निघालेल्या विशिष्टाद्वैत, द्वैताद्वैत, आणि द्वैत या तीन मतांचा आधार घेऊन चक्रधराने आपलें पूर्ण द्वैत मत स्थापिलें. जीव व परमेश्वर यांचा

---

८३ पहा—म. वा. इति. ले. पांगारकर पृष्ठ २९७

देतो अशी त्यांची कल्पना आहे. पंथाच्या तत्वज्ञानांत वेदोपनिषदांना विरोध दर्शविलेला नाही, उलट महानुभावीय ग्रंथांमधून वेदाविषयी आदरच दर्शविलेला आहे. [८४]

ज्ञानभक्तीचा मूळ सिद्धांत भागवतधर्माप्रमाणेच असून इतर तत्वें वेद, उपनिषदें, स्मृति, पुराणें यांत येणाऱ्या तत्वावरच आधारलेलीं आहेत. या पंथानुयायांत संन्यास घेतलेले व न घेतलेले असे दोन वर्ग आहेत आणि संन्यास नघेतलेल्या गृहस्थी अनुयायांत वर्णाश्रमधर्माचेंच पालन होत असतें. या सर्व विशेषांचा विचार करता हा पंथ वैदिक ठरतो. पंथाचें वाङ्मय जितकें जास्त संशोधिलें आणि अभ्यासिलें जाईल तितकें त्या पंथाबद्दलचें अज्ञान अधिक दूर होईल व हा पंथ पूर्णतया वैदिक असल्याची खात्री होईल. [८५] या पंथाचें महत्व मराठीच्या दृष्टीने अत्यंत आहे, कारण ज्ञानेश्वरीच्या तोलाचे मराठीचें वाग्वैभव या पंथाच्या ग्रंथांत आढळतें. ज्ञानेश्वर–नामदेवादिकांमुळे वारकरीसंप्रदायाच्या झालेल्या विद्युत्प्रसाराने महानुभावपंथाचें क्षेत्र सीमित केलें असलें,

---

८४ उदाहरणार्थ पुढील ओव्या पहाव्यात. वत्सहरण-६१, शिशुपालवध–९७, ऋद्धिपूर वर्णन ४४,४५ ज्ञानप्रबोध–३१,३४ इत्यादि

८५ डॉ. य. खु. देशपांडे आणि कै. पांगारकर यांनी हा पंथ वैदिक असल्याची पुष्कळ प्रमाणें देऊन पंथाची वैदिकता सिद्ध केली आहे. पहा–' श्रीज्ञानेश्वर दर्शन ' भाग १ ला, दर्शन प्रवेश, पृष्ठें १३९ते१५७; आणि म. वा. इति. खंड१ला, पृष्ठें ४७४ते४८०

तरी आपल्या सीमित क्षेत्रांत का होईना परंतु 'माझिया म्हातारिया नागवतील' ( केवळ मराठी समजणाऱ्या बायाबापड्या स्त्रीशूद्रांचा उद्धार होणार नाही ) म्हणून 'चक्रधरें निरूपिली मऱ्हाटी' चा त्यांनी जो हिरिरीने प्रसार केला, [८६] तो मराठीच्या इतिहासकारास कृतज्ञपणे नमूद केलाच पाहिजे. धर्मभाषा ह्मणून पालीचा प्रसार पूर्वी बौद्धांनी केला होता, तद्वत् महानुभावांनी या काळांत मराठीचा केला. अमृताला जिंकणारी गोडी मराठींत यावी म्हणून वारकरीपंथाच्या बरोबरीने याही पंथाने तपश्चर्या केली आहे.

## ७० नाथपंथ. पंथाचा महत्वाचा ग्रंथ ज्ञानेश्वरी असूं शकतो.

नाथपंथाची मूळ देवता आदिनाथ श्रीशंकर होय. [८७] ज्ञानेश्वरांनी १८ व्या अध्यायांत ( मागे पृष्ठ ४४–४५ पहा ) उल्लेखिल्याप्रमाणे अत्यंत प्राचीन काळीं उमेच्या कानांत हें ज्ञान सांगितलें व तें मत्स्येंद्राने ऐकलें. हा मत्स्येंद्र ऐतिहासिक पुरुष असून त्याने पंथाचा विस्तार केला. त्याचा काळ शके ११३२ च्या सुमाराचा असावा. मत्स्येंद्र—गोरक्ष—गहिनी—निवृत्ति—

---

८६ पहा–श्री. नेने–भवाळकर संपादित चक्रधरनिरूपित 'दृष्टान्त पाठ' प्रस्तावना पृष्ठ ६. ८७, ज्ञानेश्वरीची १ ली ओवी 'ॐ नमोजी आद्या' ही त्या आदिनाथाचें नमन आहे असें एक मत आहे.

ज्ञानदेवादि भावडें या परंपरेने आलेला नाथपंथाचा उपदेश 'गीतार्थ ग्रंथन मिसें' म्हणजे गीतेचा अर्थ ग्रथित करावयाचें केवळ निमित्त करून ज्ञानदेवाने ज्ञानेश्वरींतून सांगितला. म्हणजे पर्यायाने ज्ञानेश्वरी हा नाथपंथाचा एक महत्वाचा ग्रंथ होय असें ठरतें.

नाथपंथाची दीक्षा ज्ञानदेवाच्या कुळांत नवीन नव्हती. ज्ञानदेवाचे पणजे त्र्यंबकपंत यांना गोरक्षनाथाचा, आजे गोविंदराव यांना गहिनीनाथाचा अनुग्रह असून, वडील विठ्ठलपंत हे गैनीनाथांच्या प्रसादाने जन्माला आले, ( मागे पृष्ठ ९ पहा ) अशी समजूत होती. एवढेच काय पण मुक्ताबाईला प्रत्यक्ष गोरक्षनाथाचा उपदेश असावा असेंही दिसतें. ८८ "मोतियाचा चुरा फेकिला अंबरीं । विजूचिया परि कीळ झालें ॥ ....भेटली मुक्ताबाई गोरोबाला .... " आणि " गोरा बोलाविला जुनाट पैं जुनें .... " ( मागे पृष्ठ ७९ पहा ) या दोन अभंगावरून या भावंडांचीं आणि प्रत्यक्ष गोरक्षनाथाची भेट झाली होती. ८८ अर्थात नाथपंथाचा पूर्ण प्रभाव या भावंडांवर होता. ही भावंडें संपूर्णतया नाथपंथानुयायी होतीं आणि या भावंडांच्या वाणींत नाथपंथाचीं-तत्वें महिमा आणि उपदेश आला होता असें म्हणतां येतें म्हणून ज्ञानेश्वरी हा नाथपंथाचा एक महत्वाचा ग्रंथ होय ' ह्या वरील विधानास बळकटी येते.

---

८८ श्रीज्ञानेश्वर दर्शन खंड १ ला, पृष्ठ ६७–६८ पहा

तिसरें असें की, तुह्मा सज्जनांचें केलें। आकळूनि जी मीं बोलें। ज्ञानदेव म्हणे ठेंकुलें। तैसें हें नोहे ॥ ज्ञा १८–१७६२ ॥ या ज्ञानेश्वरांच्या उद्गारावरून त्यांच्या पूर्वीच्या गोरक्ष, अमरनाथादि स्वपरंपरेंतील संतांनी लिहिलेल्या ग्रंथांची सूचना त्यांना करावयाची असेल असें वाटते. 'गोरक्षकिमयागार' 'गोरक्षगीता, 'गोरक्ष अमरनाथ संवाद' 'ज्ञानसिद्धांत योग,' 'विवेकमार्तंड,' इत्यादि पुस्तकें त्या पंथांत ज्ञानेश्वरीपूर्वी झालेलीं असून महाराष्ट्र सारस्वत कारांनी 'अमरनाथ संवाद'आणि, 'गोरक्षगीता' यांतील कांही उतारे ज्ञानेश्वरींतील कांही भागांशी तंतोतंत जुळतात असें दाखवून दिलें आहे. [८९] शिवाय ज्ञानेश्वरीचा सहावा अध्याय तर योगविद्येच्या उपासकाकरीतांच केवळ लिहिला आहे किंवा काय अशी शंका येते.

## ७१ नाथपंथाचा संचार

नाथपंथ भारताच्या साऱ्या प्रांतातून प्रसृत झालेला दिसतो. बंगालांत मैनावती राणीची गोष्ट प्रसिद्ध आहे तर नेपाळांत गुरखे हें नांवच मुळीं गोरक्षापासून आलेलें आहे. गोरखपूर हें पंथाचें प्रमुख शहर होतें. सिंहलद्वीपांतील 'मत्स्येंद्र-प्रमिला' प्रसंगावर कित्येक कवनें आहेत. काठेवाडांतील अत्युच्च गिरनार-

---

८९ पहा–महाराष्ट्र सारस्वत–वि. ल. भावे, भाग १ ला पृ. १८–४०

शिखर ' गोरक्षनाथ ' होय. साताऱ्यांत 'मत्स्येंद्रगड' आहे आणि गडावर ' गोरखाचिंच ' आहे. कऱ्हाडकडील जोंधळ्याला ' मत्स्येंदरी शाळू ' म्हणतात ! नाशकाजवळ गहिनीनाथाची गुहा आहे. माळव्यांत उज्जनीजवळ ' मच्छंदरकी कबर ' आहे. हिंदी, मराठी दोन्ही भाषांत या सत्पुरुषांचीं काव्यें आहेत, आणि मराठींत तर त्यांना अनुसरणारे दोन श्रेष्ठ कवि मुकुंदराज व ज्ञानेश्वर आहेतच.[१०] सारांश असा की हा अखिल भारतीय पंथ होता. अखिल भारतीय होऊं शकण्याचें कारण पंथाच्या तत्वज्ञानांत आढळून येतें.

## ७२ नाथपंथांतील अद्वैत, योग, व भक्ति.

मत्स्येंद्रनाथ, गोरक्षनाथादिकांचा काळ १२ वें शतक होय. या शतकांत शैव, वैष्णव आणि कित्येक लहान संप्रदाय यांच्या सावळ्या गोंधळाने धर्माच्या नांवाखाली बजबजपुरी माजली होती, आणि ही बजबजपुरी दूर करण्याकरिता प्राचीन भागवत धर्मांतील हरिहरैक्याची शिकवण व शंकराद्वैत मत पुन्हा प्रसृत होणें अवश्य होतें. ही हरिहरैक्याची, राम, कृष्ण, दत्त, हरी, हरही एकच अशी, व अद्वयानंदाची शिकवण

---

१० मराठीचे आद्य कवि समजले गेलेले ' विवेकसिंधु ' कार मुकुंदराज यांचेही मूळ गुरु श्री आदिनाथ शंकर असून ज्ञानेश्वरापेक्षा वेगळ्या परंपरेने ते चवथे पुरुष होत

नाथपंथाने योगविद्या आणि वैराग्य यांची कास धरून दिली, म्हणून तो पंथ रूढ झाला. ज्याच्या आज्ञेने वारा वाहतो, सूर्य प्रकाशतो, सर्व महाभूतें आपापल्या कर्मात 'राहाटतीं' ती आज्ञा करणारा, 'मियांचि नियमिला सांता, कालु ग्रासु करितसे भूतां, इयें म्हणियागतें पांडुसुता, सकलें जेयाचीं; ऐसा जो समर्थु, तो मी जगाचा नाथु' (ज्ञा. ९-२८३-४) असा 'जगन्नाथ' ओळखून त्याच्याशीं अद्वैत भक्तीनें एकरूप पावणाराही 'नाथ' च होतो, या दृष्टीनें नाथपंथाचे नांव अन्वर्थक म्हणावें लागेल. याच अर्थाने शंकराचार्यांचें अद्वैतमत नाथपंथांत समाविष्ट झालेलें असल्याने ज्ञानेश्वरांनी प्रतिपादलें. या अद्वैताचा, अद्वयानंदाचा अनुभव समाधिसुखाने येतो. ही समाधि अष्टांगयोग किंवा ध्यानयोगानें साधतां येते. पातंजल प्रणीत अष्टांगयोग त्या पंथांत मान्य होता परंतु त्यास साधन मानून साध्य आत्मसाक्षात्कार होय असें समजत. ज्ञानेश्वरांनी या समजुतीचा थोडा अधिक फायदा आपल्या अधिकारांत साधकांना दिला आहे. त्यांनी वासनाजय किंवा मनोजयाचे एक महत्वाचें साधन म्हणून ज्ञानेश्वरींत अनेक ठिकाणीं प्रत्यक्ष किंवा दृष्टान्त वा रूपकादि अलंकारांत हठयोगाचें वर्णन केलें असलें तरी एकंदर प्रतिपादनांत ध्यानयोगांत आवश्यक असणाऱ्या श्रद्धायुक्त भावालाच प्राधान्य दिलें आहे. ही भक्तीची शिकवण ही ज्ञानेश्वरांना गुरूपासूनच मिळाली होती. निवृत्तिनाथ एका अभंगांत 'कृष्णभक्तीचा गुह्यभाव' गहिनीनाथाने सांगितल्याचें

वर्णन करतात, तर ज्ञानेश्वर व एकनाथ शिवाने भवानीस 'राम सखा हरि' चा उपदेश केला असे म्हणतात.[९१]

सार सार विठोबा नाम तुझें सार।
म्हणोनि शूळपाणी जपताहे वारंवार ॥

असें ज्ञानेश्वर म्हणतात, हा शूलपाणिने करावयाचा जप, पुढें मच्छेंद्रने स्वतः केला व गोरक्षादिकांना सांगितला. तो परंपरेने पुढे चालला. म्हणून ज्ञानेश्वरींत देखील

कृष्ण विष्णु गोविंद। एयां नामाचे अखिल प्रबंध।
माझी आत्मचर्चा विशद। उदंड गाती ॥ ज्ञा ९-२०९ ॥

असे वर्णन केलें आहे. या सर्व नामांत एकच परमात्मा, आत्मा तोच परमात्मा, आणि या परमात्म्याशीं एकरूपत्व पावण्याचा सोपा मार्ग म्हणजे 'भक्ति' असा तिहेरी उपदेश या ओवींत सूचित आहे. एकूण नाथपंथाचे अद्वयानंद हें पहिलें तर भक्तियोग हें दुसरें वैशिष्ट्य आहे.

## ७३ नाथपंथाचें विकृत रूप-कानफाटे पंथ

परंतु केवळ हठयोगासच प्राधान्य देऊन पंथाचें महत्व

---

९१ 'शिव भवानी उपदेशी प्राणप्रिये। निज मानसीं ध्यायें। परमानंदु पाहे ॥ रामसखा हरि रामसखा......' ज्ञानेश्वर '...मंत्र तो मज सांगा। ऐसी बोलतसे दुर्गा ॥ एकांती नेऊन। 'राम' अभिधान। तेंचि मच्छेंद्रा लाधलें। पुढें परंपरा चाललें। तोचि बोध जनार्दनी। एका लागतसे चरणीं ॥'—एकनाथ.

ज्ञानेश्वरांच्या नंतरच्या काळांत कानिफनाथाने वाढविलें. तसेंच 'शैली शृंगी कंथा झोली। बिभूत लगाया तनमो' हा बाह्य वेष, कानांत भोकें करून कुंडलें घालणें, भिक्षेच्या वेळीं कुका मांवाची एकतारी वाजविणें, व 'अलख' करून ओरडणें, भजनाच्यापूर्वी पुंगी वाजविणें इत्यादि रूढी ज्ञानदेवाच्या काळच्या नव्हत. या सर्वांचा पगडा पडलेल्या 'कानफाटे' नांवाच्या पंथाचा पुरस्कर्ता कानिफनाथ होय. हा नाथपंथ खरा परंतु ज्ञानदेवकालीन सोज्वळ नाथपंथाचें हें विकृत व अमंगळ स्वरूप होय. एरवीं तुकारामाने 'कान फाडुनियां मुद्रा ते घालिती........ परि शंकरासि नेंळखती.......' अशी त्यांची टिंगल करून 'जाय नरक लोका' असा त्यांना शाप दिला नसता. 'नाथ लीलामृत' आणि 'नवनाथ भक्तिसार' हे या पंथाचे पूज्य समजले गेलेले ग्रंथ ज्ञानेश्वरानंतर सुमारे ५०० वर्षांनी झाले असल्याने ऐतिहासिक दृष्ट्या विश्वसनीय नाहीत.

## ७४ नाथपंथाचीं चार वैशिष्ट्यें

नाथपंथाचीं दोन वैशिष्ट्यें वर आलीं आहेत. तिसरें वैशिष्ट्य सश्रद्ध गुरुभक्ति, आणि चवथें संतपणाची जबाबदारी समजून कर्तव्य बुद्धिने लोकसेवेचें व्रत पाळणें हें होय. ज्ञानेश्वरींत अत्यंत उत्कटतेने गुरुभक्तीचें वर्णन अनेक ठिकाणीं आलें असून सोळव्या अध्यायाच्या सुरुवातीचा भाग अशा वर्णनांचा मेरुमणि होय. चवथ्या वैशिष्ट्यासंबंधा या पंथाचे

अभ्यासक श्री. सरदार ना. य. मिरीकर लिहितात, " इतर संप्रदायांत व नाथ संप्रदायांत महत्वाचा फरक तो हाच. इतर संप्रदाय आत्मोन्नतीच्या मार्गाने परमपद प्राप्त झालें की इति-कर्तव्यता झाली असें मानतात व त्या अवस्थेतच रंगून जातात. नाथपंथ त्या परमपदप्राप्ती नंतर सेवाव्रत स्वीकारतो व जगाचें कल्याण करण्यास झटतो. ' कहिं येका घेन वैकुंठा जावें। तें तिहिं वैकुंठाचि केलें आघवें। ' ( ज्ञा. ९-२०२ ) असा बाणा बाळगून अखंड कर्म करणारा हा पंथ होता "[९२]

## ७९ एक समन्वयवादी मत.

असा समाजाकरिता निरंतर झिजणारा हा परोपकारी पंथ साहजिकच अहिंसा, शम, भूतदया, इत्यादि सात्विक गुणांनी युक्त झाला तर आश्चर्य नाही. अशा पुरुषांत 'वासुदेवाः सर्वमिति' ( गीता ७। १९ ) ह्या जाणीवेचे जें कांही थोडे ज्ञानीभक्त निघतील 'तेयातें मी माथां। मुगुट करी ॥ ज्ञा. १२-२१२ ॥ असें ज्ञानेश्वरांचे श्रीकृष्ण भगवान् म्हणतात. शिवाय अशा ज्ञानी संतश्रेष्ठांचें ' प्रभू तुम्ही महेशाचिया मूर्ति। ' ( ज्ञा. ९-१४ ) असें ज्ञानेश्वर संबोधतात. एकूण नाथपंथी महेशांना भगवान आदिनाथ शिरीं धारण करतो असें समजावयास हरकत नाही यावरून प्रत्यक्ष डोक्यावर शिवलिंग धारण केलेली पंढरीची पांडुरंगमूर्ति ही आदिनाथाची मूर्ति ठरते व पंढरीचें तीर्थ हे

---

९२ पहा ज्ञानेश्वर दर्शन-खं. १, पृ. ५९

नाथसंप्रदायाचे आदिपीठ ठरतें. प्रथम सूचक सगुणभक्तीने हें विठ्ठलमाहात्म्य ज्ञानेश्वरांनी ज्ञानेश्वरींत गायिलें तर पुढें स्पष्ट पणें विठ्ठल नांवाने त्यांनी अभंगांत गायिलें एकूण पंढरी माहात्म्य गातांना वारकऱ्यांचा विचार मनांत न आणतां आपल्या आदिनाथाचाच विचार त्यांनी केला व तो पंथ वाढविला.[९३]

## ७६ वारकरी.

'वारकरी, हा शद्ब मूळ 'वारी-करी' असा आहे. 'ऐसें वैराग्य हें करी। तरी संकल्पाची सरे वारी। सुखें धृतिचां धवळारी बुद्धि नांदे ॥ ज्ञा. ६-३७६ ॥ यांतील 'येरझारा' या अर्थाने 'वारी' शद्ब वापरण्यांत येतो आणि या पंथाचें आराध्य दैवत पंढरीचा विठोबा याच्या दर्शनार्थ आषाढी कार्तिकीस नियमाने जाणारा तो **वारीकरी म्हणज वारकरी होय.** यास **माळकरीपंथ** किंव **भागवतधर्म** असेंही नांव आहे. पंथास विष्णूची तुळस पूज्य वाटते, तुळशीची माळ गळ्यांत घालणें पंथाचें एक लक्षण आहे म्हणून तुळशीची माळ घालणारा पंथ तो माळकरीपंथ म्हणूं लागले. तसेंच स्थूल अर्थानें भगवताची आराधना करणारा म्हणून भागवत पंथ किंवा धर्म होय. परंतु

---

९३ हा निष्कर्ष अद्याप सर्वमान्य झालेला नाही. श्री. सरदार मिरीकरांनीं हा निष्कर्ष सविस्तर व मुद्दे सूद विवेचन करून आपल्या निबंधांत प्रतिपादला आहे. पहा–ज्ञा. दर्शन भाग १

वर उल्लेखिलेल्या भागवतें आणि वैष्णव पंथाच्या अर्थाने यास 'भागवत' म्हणत नाहीत. यांत त्या भागवतांतील चतुर्व्यूह कल्पना नाही, आणि वैष्णवांतील प्रच्छन्नाप्रच्छन्न द्वैतवादही नाही. श्री. पांगारकर या वारकरी पंथाला '**महाराष्ट्रीयांचा भागवतधर्म**' म्हणतात.[९४] यांत मुख्य उपासनाग्रंथ ज्ञानेश्वरी भाष्यानुसार गीता आणि नाथभागवतानुसार भागवताचा एकादशस्कंध व मुख्य तत्व अद्वैत; परंतु अद्वैत संपन्न होऊनही भक्ति सुखाचें महत्व कायम असतें, आदिगुरु शंकर, उपास्य पांडुरंग, हरिहरैक्य पूर्णपणें मान्य, एकादशी, सोमवार, व महाशिवरात्र ह्या दिवशीं उपवास. वर्णाश्रम धर्माप्रमाणे 'कुळधर्म चालीं। विधि निषेध पाळी।' आणि 'जें जाति स्वभावें आलें। तें करी' ( भगवत् प्रत्यिर्थ ) हा आचारधर्म आणि तेणें करून 'जितिलें कर्मबंधातें' (ज्ञा. १८-९३३) अशी मुख्य शिकवण आहे. मुख्य साधन नवविधाभक्ति, मुख्यतः नामस्मरण, 'श्रीराम-कृष्ण हरि' चा जप. 'जें जें भेटे भूत। तें तें मानिजे भगवंत' ह्या उदार भावाने सर्वांशी नेहमी सदयतेने, प्रेमाने वागण्याचा, परोपकार करण्याचा, 'परावियां नारी' मातेसमान मानण्याचा, मद्यमांसाबरोबर परनिंदा देखील वर्ज मानण्याचा सात्विक आदेश हा पंथ देतो.[९५]

---

९४ पहा 'श्रीतुकाराम चरित्र' पृष्ठ १०१

९५ पहा—सदर पृ. १०२ ते १०४

ह्या पंथाची उत्पत्ति बहिणाबाईच्या एका अभंगावरून ( ज्ञानदेवें रचिला पाया' हा मागं पृष्ठ ९० वरील अभंग पहा ) ज्ञानदेवापासून झाल्याची रूढ समजूत चुकीची आहे. मुख्य दैवत श्रीपांडुरग किंवा विठोबा हा महाभागवत पुंडलिकाच्या पितृभक्तीने संतुष्ट होऊन भेटीला आलेला द्वारकाधीश श्रीकृष्ण होय. पुंडलिकाने फेकलेल्या विटेवर हें 'ध्यान' कर कटावरी ठेवून 'युगें अठ्ठावीस' उभें आहे यावरून ही मूर्ति आणि मूर्तीच्या भक्तीचा संप्रदाय फार जुना आहे एवढेंच म्हणतां येतें. मर्ति व पुंडलिक यांचा काळ निश्चित करतां येत नाही. या संबंधांत शिलालेखीय पुरावा शके ११३१ पर्यंत सापडतो, त्यांत विठ्ठल रुक्मिणीची मूर्ति एका समाधीवर आहे. त्यावरून त्या शकापूर्वी अनेक वर्षें ही उपासना होती एवढेंच म्हणतां येते, परंतु ज्ञानकोशांत उल्लेखिलेला 'मालुतारण' नांवाच्या ग्रंथांतील उल्लेख ग्राह्य धरला तर विठ्ठलभक्तीच्यामागे शालिवाहन शक ४१५ पर्यंतचा इतिहास असला पाहिजे असें सिद्ध होते. **'कानडा हा विठ्ठलु कर्नाटकु'** अशा अभंगांतील उल्लेखावरून हें दैवत मूळ कानडी असावें असें एक मत आहे. तसेंच पांडुरंगमूर्ति जैनांची असावी असेंही एक मत आहे. पुरेशा पुराव्याभावीं हीं मतें अग्राह्य ठरतात. [९६]

## ७७ वारकऱ्यांचा भागवत धर्म आणि महाराष्ट्र धर्म

वर वारकरी संप्रदाय आणि नाथसंप्रदाय दोहोंचा सविस्तर

---

९६ पहा—ज्ञानकोश वि. २०

विचार केला आहे. दोन्ही पंथांचा खोल विचार करतां मागे पृष्ठ ९२ वर म्हटल्याप्रमाणे दोहोंचे अंतःस्वरुप एकच आहे. असें सिध्द होते. तसेंच ज्ञानेश्वर परंपरेने नाथपंथी असले तरी वृत्तीने वार-करी सांप्रदायास अधिक जवळ होते. त्यांच्याठिकाणी आढळ-लेल्या तत्वज्ञान आणि भक्तिच्या एकात्मतेला भुलून वारकरी सांप्रदायाने त्याना माळ घातली कीं तेच आपणहून तिकडे आकृष्ट झाले हें नक्की सांगतां येत नसले तरी नाथपरंपरेच्या या थोर महर्षीस वारकऱ्यांचे आचार्यत्व प्राप्त होतांच वारकरी पंथांत अभूतपूर्व चैतन्य संचरलें, हें मात्र खरें आहे. वर वर्णन केलेल्या धार्मिक गोंधळाच्या काळांत स्वधर्म व स्वकर्तव्य विसरलेल्या लोकांचें औदासिन्य झटकून टाकून त्यांच्या पुढे नवी आशा, नवी ध्येयें त्यांनी निर्माण केलीं. मोहग्रस्त समाजरूपी अर्जुनास कर्म योगाचीं आयुधें हातीं घेऊन संघर्षाचा सामना करावयास उद्युक्त करणारा तत्कालीन भगवान् श्रीकृष्ण म्हणजे श्री ज्ञानेश्वर होय. महाराष्ट्राचा हा भागवत धर्म महाराष्ट्रीय संतांनी आपल्या गरजा पाहून घडवति घडवीत आणलेला आहे. ज्ञानेश्वरानंतर नामदेव एकनाथ आणि तुकाराम यांनी त्याला खत पाणी घातलें. भागवत-धर्माचें विकसित रूप म्हणजे रामदास प्रणित 'महाराष्ट्रधर्म' होय. त्याची मनोभावें आराधना केल्याने स्वातंत्र्याचें 'पसायदान' महाराष्ट्राला मिळालें.

## ७८ ज्ञानेश्वरांची ग्रंथसंपत्ति.

ज्ञानेश्वरी उर्फ भावार्थ दीपिका, अनुभवामृत उर्फ अमृतानुभव, चांगदेव पासष्टी, नमन, हरिपाठाचे अभंग, इतर अभंग (यांत गौळण, पाइक, अंबुला, घोंगडी, इत्यादि विविध विषयावरील रचनाही आहे.) योगवासिष्ठ, उत्तरगीता, पंचीकरण-महावाक्य, गायत्रीटीका, शुकाष्टक, आत्मानुभ, वसमास, सच्चिदानंदलखोटा अन्वयव्यतिरेक, कल्याणपत्रिका, लिखित, पंचमुद्रा, भक्तराज इत्यादि पंचवीस सत्तावीस ग्रंथ ( यांतील कांहीं तर स्फुट प्रकरणेंच आहेत ) ज्ञानेश्वरांच्या नांवावर देण्यांत येतात. यांपैकीं पहिले दोन ग्रंथ, तिसरें व चवथें प्रकरण आणि हरिपाठाचे व इतर अभंग एवढीचि रचना ज्ञानेश्वरांची आहे. पुढील ग्रंथांपैकी ' योगवासिष्ठ' ज्ञानेश्वरांनी लिहिलें असावें असें गृहित धरण्यांत येतें परंतु तें उपलब्ध नाही. या नांवाचा जो ग्रंथ उपलब्ध आहे त्यावर विद्वानांची विस्तृत चर्चा होऊन सर्व पूर्वग्रह बाजूस सारून तो ज्ञानेश्वरांचा नाही असें ठरलें आहे.[१७]

कोणत्याही ग्रंथांचें ज्ञानदेवकर्तृत्व किंवा अकर्तृत्व ठरवितांना सर्व पूर्वग्रह बाजूस सारून स्पष्टास्पष्ट उल्लेख, भाषा, विवेचनशैली, टीकापध्दति, तत्वज्ञान, कर्त्याच्या भूमिकेविषयी किंवा प्रवृत्ती विषयी होणारी कल्पना, इत्यादी बाबींचाच विचार करून

---

१७ पहा ज्ञानेश्वरांचें तत्वज्ञान प्र. १२ वें. ले. डॉ. पेंडसे

निकाल द्यावयास पाहिजे. अभ्यासू विद्वानांनी अशा पद्धतीने विचार करून दिलेला निकाल वर आलाच आहे. ज्ञानेश्वरांचे ग्रंथ कोणते याविषयी झालेल्या चर्चेतून 'ज्ञानेश्वर एक का दोन' हा वाद जन्मास आला.

## ७९ ज्ञानेश्वर एक का दोन ?

मराठींतील हा वाद मधून मधून डोकें वर काढीत असतो. अर्ध्या शतकापूर्वी डॉ. भांडारकरांसारख्या पट्टीच्या चिकित्सकांचीही **ज्ञानेश्वरी कर्ता 'ज्ञानेश्वर'** आणि **अभंगकर्ता 'ज्ञानदेव'** वेगवेगळे होत असे मानण्याकडे प्रवृत्ति असे. आता ह्या वरवर दिसणाऱ्या द्वैताचा निरास होऊन मूळ अद्वैत स्थापन झालें असलें तरी मधूनच एकादा मध्वाचार्य प्रगट होऊन तेच ते मुद्दे नव्याने उगाळीत बसतो. १८२८-२९ सालीं कै. भारदे बुवा ('भारद्वाज') यांनी या वादास तोंड फोडलें, आणि नंतर गाजलेल्या चर्चेत कै. पांगारकर, आचार्य शं वा. दांडेकर, कृ. वें. गजेंद्रगडकर, इत्यादिकांनी भाग घेतला. संततत्वज्ञानाचे अभ्यासक प्रा. रा. द. रानडे यांनी आपल्या अधिकारी वाणीने जणु ह्या वादावरचा अखेरचा निकालच ज्ञानेश्वर वचनामृत आणि संतवचनामृताच्या प्रस्तावनांमधून देऊन टाकला. ज्ञानेश्वरी व अमृतानुभव या ग्रंथांची भाषा आणि अभंगाची भाषा वेगळी दिसते, दोहोंतील तत्वज्ञान वेगळें वाटतें, आणि अभंगांत ज्या विठ्ठलाला परोपरीने आळविलें आहे त्याचें नांव एवढ्या विशाल

ग्रंथांतून एकदाही येत नाही या मुख्यत: तीन विशेषांमुळे वरील सिद्धांत मांडण्यात आला होता. या सिद्धांतानुसार 'ज्ञानेश्वर' व 'ज्ञानदेव' यांचे तपशील असे:—[१८]

| | तपशील | ज्ञानेश्वर | ज्ञानदेव |
|---|---|---|---|
| १ | जन्मस्थान | — आपेगांव | अज्ञात |
| २ | जन्मशक | —११९३ किंवा ११९७ | अज्ञात |
| ३ | वडील | —निवृत्तिनाथ | विठ्ठलपंत |
| ४ | गुरुकुल | —नाथपंथ (शैव) | रामानुज (वैष्णव) |
| ५ | गुरु | —निवृत्तिनाथ | विठ्ठलपंत, निवृत्ति |
| ६ | समाधिस्थान | —आपेगांव | आळंदी |
| ७ | समाधिकाल | — १३ वें शतक | १४ वें शतक |
| ८ | ग्रंथकर्तृत्व | —ज्ञानेश्वरी व अनुभवामृत | अभंग, भगवद्गीतेवर एक टीका व चांगदेव पासष्टी |
| ९ | तत्वज्ञान | —नाथपंथी, हठयोगी, अद्वैतवादी निर्गुणोपासक | वैष्णवपंथी, भक्तियोगी, द्वैतवादी, सगुणोपासक |

या तपशीलांतील अंक १, व २ ह्यांतील उल्लेख दोघांबद्दल एकच असूं शकतात. अंक तीन यांत अभंग कर्त्याचे वडील त्याने आपल्या अभंगांत 'बाप रखुमादेवीवरु विठ्ठलु' असा स्पष्ट उल्लेख केल्यामुळे विठ्ठलपंत हे ठरतात हे ठीक आहे परंतु ज्ञानेश्वरी, अमृतानुभवादि ग्रंथांत वडिलांचा उल्लेख पाहिजेच

१८ पहा प्रा. दांडेकर कृत 'श्रीज्ञानदेव' पृ. ६९

होता असें नाही येथे ज्ञानेश्वरींतील ' श्री निवृत्तिनाथसुतें ' ( ज्ञा. १८–१७८४ ) ह्या उल्लेखावरून ज्ञानेश्वरांचे वडील ' निवृत्ति ' ठरविले आहेत; हा उल्लेख गुरुपरंपरा सांगतांना आलेला आहे. आपल्याकडे ' शिष्य ' स्वतःस ' सुत ' म्हणवून घेतो व त्यांत केवळ लक्षणा असते, हें लक्षांत घेतलें म्हणजे ह्या ओवीच्या अर्थाचा कसा भलता अर्थ केला आहे तें चांगलें कळतें. हें अज्ञानाचे प्रदर्शन होय. या पद्धतीने पाहतां मागे पृष्ठ ४५ वर टीपेंत उल्लेखिलेल्या चरित्रकाराने ' शांभव–अद्वया-नंद–प्रभव ' ही शिष्यपरंपरा होय असें म्हटलें आहे त्यासही कां मान्यता देऊं नये ! ! अंक ४ व ५ करिता ओवीच्या अर्थाची ओढाताण करावी लागते. अंक सहाचा निरास असा करतां येतो कीं आळंदीची समाधि ज्ञानेश्वरांची असून आपेगांवच्या समाधि त्यांच्या पूर्वजांच्या आहेत.[९९] अंक ७च्यांतील तपशील इतिहास, तर्क, आणि खुद्द नामदेवाने केलेला उल्लेख यांना सोडून आहे. कारण नामदेव व ज्ञानदेव समकालीन होते. अंक ८ आणि ९ हेच जास्त महत्वाचे आहेत व त्यांचा निरास पुढील प्रमाणांनी करतां येतो.

(१) एकभाषासरणीवरून एककर्तृत्व. (अ) अभंगांची हस्तलिखितें मिळत नाहीत, निदान जेवढ्या मागची ग्रंथांची

---

९९ पहा–सदर पृ. ७०

मिळतात तेवढी मिळत नाहीत, शिवाय ग्रंथ लेखनिविष्ट झाल्याने जसे बव्हंशीं मूळ स्वरूपांत मिळतात तसे अभंगांचें न होतां ते केवळ मुखनिविष्ट राहात आल्यामुळे त्यांत ग्रंथाच्या मानाने अतिशय फरक झालेले दिसतात (आ) तरीही पुढील विशेष विशाल प्रमाणांत ग्रंथ व अभंग यांच्या भाषांत समानच आहेत. १ समान शब्द–उदा० वोज, चोखटे, उगाणा इत्यादि, २ समान वाक्प्रयोग–उदा० 'सुखा दोंदुली वाढली,' 'मनाचे नयन उन्मळताती' इत्यादि ३ समान नामधातु–उदा० 'श्रुति मौनावल्या,' 'आनंद घनावला,' इत्यादि, ४ विचार सादृश्य–उदा० 'राजयाची कांता काय भीक मागे,' (अभंग २५२) 'काय समर्थाची कांता। कोरान्न मागे। (ज्ञा. १२-८५ चित्रशाळाप्रत), 'शब्देंवीण संवादु,' (अभंग) 'शब्देंविण संवादिजे' (ज्ञा १-५८ राजवाडे प्रत), ५ उपमारूपकादिकांची पद्धती समान आहे. इत्यादि इत्यादि.

(२) एकच तत्वज्ञान– (अ) नाथपंथाचा स्पष्ट उल्लेख ज्ञानेश्वरी व अभंग यांत आहे, रामानुजांचा नाही; (आ) ज्ञानेश्वरींतील वर्णनानुसार कित्येक अभंगांतून हठयोगाचा स्पष्टास्पष्ट उल्लेख आहे. (अि) अभंगांत द्वैतवाद नसून सगुणोपासनेकडून निर्गुणोपासनेकडे असा क्रम त्यांवरून सूचित होतो.

(३) विठ्ठलनामानिर्देश-- (अ) ज्ञानेश्वरींत विठ्ठलनाम येण्याचें कारण नव्हतें; (आ) 'कृष्ण विष्णु गोविंद' (ज्ञा. ९-२०९) यांत आणि विठ्ठलांत ज्ञानेश्वरांना अभेद वाटणें साहजिक आहे; (अि) प्रत्यक्ष 'विठ्ठल' असा उल्लेख नसला तरी विठ्ठल संप्रदायाचे आधारभूत जे 'संत' त्यांचें आणि संतांचे प्रमुख लक्षण 'कीर्तन' याचें गोडवर्णन ज्ञानेश्वरींत येतें; (अी) विठ्ठल-सांप्रदायांत विठ्ठलास 'उराउरी' भेटण्याची पद्धत पंढरपुरास आहे तिचा उल्लेख ज्ञा. १८-४७ मध्ये सूचित आहे; (उ) प्रत्यक्ष नसला तरी विठ्ठलमूर्तीचा अप्रत्यक्ष उल्लेख ज्ञानेश्वरींत आहे. अध्याय १२-२१२ ते २१६ ओव्यांतून विष्णुसहित शिवाचें म्हणजे डोक्यावर शिवलिंग घेणाऱ्या पांडुरंगरूपी विष्णूचें वर्णन आहे. अशी मूर्ती पंढरीनाथाशिवाय दुसरी नाही. (अे) विठोबाचा उल्लेख हा निर्णायक पुरावा म्हणतांच येत नाही कारण हरिपाठाच्या अभंगांतून विठ्ठलाचा उल्लेख नाही, शिवाय त्यांच्या समजल्या गेलेल्या इतरही कित्येक अभंगांतून नाही[१००] तेव्हा एक ज्ञानेश्वरीकार ज्ञानेश्वर, दुसरे हरिपाठकार ज्ञानेश्वर व तिसरे अभंगकार ज्ञानेश्वर असे तीन समजावयाचे काय! (अै) ज्ञानेश्वरी रचल्यानंतर ज्ञानेश्वरांचा प्रत्यक्ष आणि जास्त निकटचा संबंध नामदेवाशीं आला, व हे अभंग ज्ञानेश्वरी

---

१०० पहा—सदर पृष्ठ ७२

व अनुभवामृता नंतरच्या काळांत नामदेवादिकां बरोबर केलेल्या तीर्थयात्रेंत सगुणप्रेमाचा सुखसोहळा भोगण्याच्या काळांत लिहिले गेले आहेत हा चरित्रेतिहासक्रम लक्षांत घेतां अभंगांतील सगुणभक्तीचा डौल किंवा विठ्ठलप्रेमाचा आवेग ज्ञानेश्वरींत नसल्याचें कारण लक्षांत येतें. वरील तीन अंकांतून आक्षेपांना उत्तरें दिलेलीं आहेत परंतु पुढील पुरावा निश्चयात्मक व निर्णायक मानावा लागतो.

(४) पुढील अभंग स्वत: ज्ञानेशांचा आहे व त्यांनी आपण अगोदर गीताभाष्य केल्याचें त्यांत सांगितलें आहे.

गीतेमाजी अर्जुनासी ।........
ज्ञानदेवें भाष्य केलें । गीताज्ञान विस्तारिलें ।।
भक्ति भाग्यवंतीं घेतले । भाष्यें करून गीतेच्या ।।
अभंग ४७८ ।।[१०१]

**निष्कर्ष** असा की **अभंगकर्ते ज्ञानदेव, किंवा ज्ञानेश्वर आणि ज्ञानेश्वरी कर्ते ज्ञानेश्वर एकच होत.** येथेच दुसरी गोष्ट लक्षांत ठेवावयास हवी की ज्ञानेश्वरी आदि ग्रंथांच्या वाट्याला आलेलें विद्वानांचें परिशीलन, आणि संशोधन अभंगवाङ्मयाच्या वाट्याला न आल्याने संतांच्या अभंगांत झालेले दडपादडपीचे प्रकार अद्यापही तसेच आहेत. भाषा, प्रतिपादन,

---

१०१ पहा—श्रीज्ञानेश्वर दर्शन भाग १ साहित्य खंड, पृष्ठ ३१५

कल्पना, तत्वज्ञान इत्यादि अनेक बाबींचा विचार करतां स्वतः ज्ञानदेवाचे नसलेले कित्येक अभंग त्यांच्या नांवावर गाथेंत दिसतात 'त्यांत ज्ञानदेव' हेंच नांव असल्याने वरील अभंगकर्ते आणि ज्ञानेश्वरीकर्ते ज्ञानदेव एकच आहेत असें ठरले "**तरी 'ज्ञानदेव' नांवाचे अनेक कवि होऊन गेले असले पाहिजेत यांत शंका नाही**"[१०२]

## ८० ज्ञानेश्वरीचा पाठविचार, ओवीसंख्या, आणि राजवाडे.

ज्ञानेश्वरांच्या काळांत मुद्रणकलेचा शोध लागलेला नसल्यानें अभ्यासकांना आणि भक्तांना आपापल्या कामाकरितां ज्ञानेश्वरीची हातीव प्रत तयार करून घेणें भाग पडत असे. अशा हातीवप्रती असंख्य झाल्या असल्या तरी आज उपलब्ध प्रतींत ज्ञानेश्वरांच्या हातची तर नाहींच, परंतु निर्विवादपणे समकालीन म्हणतां येईल अशी एकही नाही. श्री ज्ञानेश्वरदर्शनांतील एका निबंधांत[१०३] एकूण १८ छापीव प्रतींची माहिती आली असून डॉ. हर्षे यांनी आपल्या पुस्तकांत [१०४] एकूण २६ हातीव प्रतींची माहिती दिली

---

१०२ पहा—'पांच संतकवि,' पृष्ठ ३३ ले. डॉ. तूळपुळे

१०३ श्रीज्ञानेश्वरदर्शन, भा १ ला, श्री.कानोले यांचा निबंध.

१०४ 'श्रीभगवद्गीता—व्याख्यान ज्ञानदेवी' ची प्रस्तावना पहा.

आहे. छापीवमध्ये सांप्रदायिक पाठाच्या म्हणून साखरे–प्रत, वेंकटस्वामींची प्रत व कुंटे–प्रत ह्या तीन, चिकित्सक पाठाची म्हणून माडगांवकर–प्रत आणि भाषाशास्त्रीय आवृत्ति म्हणून राजवाडे–प्रत यांना महत्व आहे. डॉ. रा. ग. हर्षे यांनी ज्ञानेश्वरीची **सिध्दनाथसंहित[1] 'श्री भगवद्गीता — व्याख्यान ज्ञानदेवी'** या नांवाने सन १९४७ मध्ये प्रसिध्द केली असून चिकित्सक आणि भाषाशास्त्रीय आवृत्ति म्हणून तिचें महत्व फार आहे.[१०५] राजवाडे यांनी आपल्या संहितेस मुकुंदराजी म्हटले आहे व ती शके १२१२ ते १२४० च्या आंत बाहेर लिहिलेली असून प्रतीच्या शेवटीं असलेल्या ' सद्गुरु मुकुंदा ' चा उल्लेख मराठीचा आद्यकवि मुकुंदराज याचा होय असें ते म्हणतात[१०६] त्यांनी ही प्रत सन १९०९ सालीं प्रसिद्धिली आणि तोंपावेतो, " जेवढ्या म्हणून ज्ञानेश्वरीच्या प्रती छापल्या गेल्या आहेत " त्या सर्व अशुद्ध व अविश्वसनीय आहेत " असेंही त्यांनी कारणें देऊन म्हटलें आहे.[१०७] **राजवाडे यांच्या मतें साखरे–प्रतीसारख्या सांप्रदायिक म्हणविल्या जाणाऱ्या प्रती म्हणजे शुद्ध ' गडबडगुंडा ' आहे.** आपल्या संहितेचा त्यांनी दिलेला काळ सर्वमान्य झाला नाहीं उलट

---

१०५ या आवृत्तीचा फक्त १ लाच अध्याय तूर्त प्रसिध्द झाला आहे.

१०६ पहा—राजवाडे ज्ञानेश्वरीची प्रस्तावना पृष्ठ ६४ ते ७१

१०७ पहा सदर पृ. ९१

काहींच्या मतें तो एकनाथोत्तर आहे, तर कांही " फार झालें तर एकनाथाच्या पूर्वी पांचपंचवीस वर्षे अगोदर " चा समजतात. [१०८] एकनाथाने शके १५०६ मध्ये ज्ञानेश्वरीचा त्याच्यावेळीं "**पाठांतरीं शुद्ध अबद्ध**" झालेला पाठ "**अत्यादरें**" "**प्रतिशुद्ध**" केला. एकनाथाचे सदर्हु ग्रंथसंशोधन हा मराठीवर एक उपकार होय, परंतु एकनाथाच्या 'आदर' भावामध्ये भाषाशास्त्रीय अभ्यासाच्या कठोर परीक्षणा पेक्षा, ज्ञानेश्वरीय–अज्ञानेश्वरीय कर्तृत्व ठरविण्याचा श्रद्धायुक्त भोळा भाव, आणि तत्कालीन समाजाच्या दृष्टीने वाक्यरचना किंवा शद्बांचीं रूपें शक्य तेथे अधिक 'आबाल सुबोध' करून द्यावींत ही सात्विक इच्छा यांनाच स्थान असल्याने एकनाथी प्रतीवरून भाषाशास्त्रीय आवृत्ति तयार करतां येत नाही. ज्ञानेश्वरकालीन मराठीचे खरें स्वरूप कळण्याच्या दृष्टीने अस्सल प्रतीचे जसें अभ्यासकास महत्व आहे तसेंच तत्कालिन मराठीचें व्याकरण कळल्यानेच ज्ञानेश्वरीय ओव्यांचे शुध्द अर्थ लावतां येतील म्हणून अर्थवादी भक्तांनाही ज्ञानेश्वरीची मूळ संहिता प्राप्त व्हावी अशी इच्छा असते. या करिता आजही जुन्यांत जुनी प्रत शोधून काढण्याकरिता अनेक विद्वान् तसा प्रयत्न करीत आहेत. वर उल्लेखिलेली डॉ. हर्षे यांची प्रत हा असा एक महत्वाचा प्रयत्न आहे. आपली प्रत शके १२७२ ची आहे

---

१०८ ल.रा.पांगारकृत 'मराठी वाङ्मयाचा अभ्यास.'

असें ते म्हणतात. मात्र त्यांच्या पोथींतील अन्त्योल्लेखांत असलेल्या शकाच्या संख्येंतील शतम् स्थानावरील आंकडा उडून गेलेला आहे, व संवत्सर, अयन, ऋतु, पक्ष तिथि, वार इत्यादिकांच्या उल्लेखावरून हा आंकडा शके १२७२ चाच आहे असे त्यांनी सिद्ध केलें आहे. त्यांच्या प्रमाणांचा विचार करून आपल्या टीकेंत[१०९] प्रा. डॉ. वि. भि. कोलते यांनी ही संहिता १२७२ ची नसून १५७२ ची आहे असा निकाल दिला आहे. कोलते म्हणतात त्याप्रमाणे वरील शतम् स्थानावरील दोन या "आंकड्याची अदृश्य स्थिति ही अत्यंत संशयास्पद आहे यांत शंका" नसली तरी हर्षे यांनी आपल्या प्रतींत पाठांची जी तुलना केली आहे तीवरून "राजवाडे प्रतींतील उणीवा स्पष्ट दिसतात, आणि पाठदृष्टया व अर्थदृष्टयाही विप्रप्रत सरस ठरते याविषयीं चिकित्सकांची" खात्री पटते.

ज्ञानेश्वरीचे पाठभेद वेगवेगळे होण्याचें प्रमुख कारण हें कीं हातीव प्रती तयार करतांना साक्षेप आणि मूळपाठाबद्दल कसोशी वापरण्यांत येत नसे. त्यामुळे व अनवधानामुळे शद्बांची पिरवाफिरव, शद्ब, प्रत्यय, प्रयोगादिकांत सुलभतेकरिता

---

१०९ प्रा. डॅ. वि. भि. कोलते एम.ए. पीएच डी, यांची लेखमाला ३१-८-१९४७ ते ६-१०-१९४७ पर्यंत 'महाराष्ट्र' नागपूर, मध्ये प्रसिध्द झालेली आहे ती पाहावी

अर्वाचीनकिरण, आणि रसिक वाचकांनी समासांत लिहून ठेवलेल्या स्वयंस्फूर्त ओव्यांना मूळ पाठांत स्थान मिळणें हे प्रकार होऊं लागले. अशा क्षेपक ओव्यांची संख्या पुढे इतकी बेसुमार वाढली की स्वतः एकनाथांना देखील "ज्ञानेश्वरीपाठीं" अशी नवीन ओवी घुसडणाऱ्यांनी 'अमृताचें ताटीं जाण नरोटी ठेविली' अशी भीति घालावी लागली.

राजवाडेपाठ आणि त्यांची प्रस्तावना यांबद्दल थोडक्यांत खालील विधानें सर्वमान्य ठरतील.

१ राजवाडे यांनी, आपल्या प्रतीचा खरेखोटेपणा ज्या अस्सल पोथीवरून ठरवितां आला असता ती पोथी स्वतःच जाळून टाकल्याने संशयास कारण मिळालें आहे.

२ त्यांच्या परिष्करणाने पोथींतील भाषा आवश्यक तेथे जुनी होऊन इतर पाठांतील चुकीचे पाठ शुद्ध करण्याची शक्यता निर्माण झाली आहे.

३ त्यांची संहिता शके १२१२ ते १२४० च्या दरम्यानची असेलच असें नसलें तरी, नाहीच असें निर्विवाद सिद्ध करतां येत नाही

४ उपलब्ध प्रतींत तीच सर्वांत जुनी आहे, मात्र तींत कांही अपपाठ वा अशुद्ध पाठ आहेतच.

५ त्यांच्या १ ते ९ अध्यायाकरिता शुद्धिपत्र जोडलेलें आहे, तसे १० ते १८ अध्यायाकरिता नाही, त्यामुळे त्या भागांतील कांही रूपें आणि पाठ संशयास्पद वाटतात.

६ राजवाड्यांनी दिलेल्या ८८९२ ह्या ओवीसंख्येपेक्षा मूळची संख्या निश्चितपणें जास्त आहे.[११०] मात्र ती निळोबाच्या अभंगांत उल्लेखिल्याप्रमाणे १०००० नसावी तर राजवाड्यांच्या संख्येपेक्षा पांच पन्नास जास्त असावी. ओवीसंख्या कमी असणें हें जुनेपणाचें एक लक्षण होय.

७ राजवाडे यांचें एकंदर लेखन अतिरंजित व अतिशयोक्तिपूर्ण आहे, आणि कित्येक विधानें पुरेसा पुरावा किंवा उदाहरणें न देतां केवळ अनुमानाने केलेलीं आहेत.

८ व्याकरणाच्या दृष्टीने पाहतां राजवाडे प्रतींत आढळणारे लकारा ऐवजी ळकार, 'वो' बद्दल 'ओ' आणि 'ये'

---

११० दहाव्याअध्यायांत २५४ व्या ओवीत "आता स्त्रीगणाचां पैकीं। माझिया विभूति सात येकि। तेती आइक···" असें 'ज्ञानेश्वर म्हणतात, परंतु राजवाडे–प्रतींत फक्त पांचच विभूति दिल्या आहेत, अर्थात् दोन अधिक सांगणारी ओवी किंवा ओव्या त्या प्रतींत नाहीत हे निर्विवाद आहे. असाच प्रकार १६ व्या अध्यायांत ओवी ५९व६० यांमध्ये झाला आहे. प्र.. मा. दा. आळतेकरांनी आपल्या 'श्री ज्ञानदेव, मध्ये पृष्ठ ६१,६२ वर राजवाडे प्रतींतील अध्याय १८ मधील १७७९ व १७८० ह्या ओव्या क्षेपक ठरविल्या आहेत.

बद्दल ' ए ' हे प्रकार जुनपणाचे निदर्शक नसून उच्चाराच्या लकबी होत.

९ व्याकरणाच्या दृष्टीने कांही विशेष राजवाड्यांच्या नंतर सिद्ध झाले असले तरी राजवाडे प्रतीवरून ज्ञानदेवकालीन मराठी भाषा आणि व्याकरण यांचे सामान्य स्वरूप निश्चित करतां येतें.

## ८१ यादवकालीन मराठी भाषेचें स्वरूप व तदंतर्गत ज्ञानेश्वरीचें व्याकरण.

इसवी सन १९०९ मध्ये कै. राजवाडे यांनी ' श्री. ज्ञानेश्वरींतील मराठी भाषेचें व्याकरण ' हे पुस्तक लिहिलें. तो पावेतो ज्ञानेश्वरींतील भाषेच्या स्वरूपाकडे बारकाईने पाहून त्याचे शास्त्रीय विवेचन करणारा मराठी किंवा गैरमराठी शास्त्रज्ञ कोणीही झाला नव्हता. त्यांच्या पूर्वीचे मराठीचे अभ्यासक डॉ. ग्रियरसन, बीम्स, होर्न्लें, प्रो. स्टेन कोनौ आणि डॉ. भांडारकर होत. ग्रियर्सनच्या ग्रंथांत मराठीचे प्रांतिक भेद विवेचिलेले आहेत. बीम्स, होर्न्लें किंवा स्टेन कोनौ यांचे प्रयत्न ज्ञानेश्वराकरिता झालेले नाहीत, आणि डॉ. भांडारकरांनी ' विल्सन फायलॉलॉजिकल लेक्चर्स ' मध्ये ज्ञानेश्वरींतील तुरळक उदाहरणें देण्यापलीकडे मजल मारली नाही. परंतु राजवाडे यांचें व्याकरण " भाषाशास्त्राला केवळ अमोल होय.... डॉ. भांडारकरांच्या नंतर एका ब्लोकवाचून शास्त्रीय दृष्टीने पाहणारा मराठीचा भाषाशास्त्रज्ञ राजवाड्यांच्या खेरीज दुसरा

नाही....पाणिनीय परिभाषा, शास्त्रीय दृष्टि व ऐतिहासिक उपपत्ति या गुणत्रयीमुळे राजवाड्यांच्या ग्रंथाला अधिकारवाणी म्हणावें लागेल."[111] राजवाड्यांच्या नंतर त्यांच्या व्याकरणावर आणि ज्ञानेश्वरी प्रतीवर झालेल्या चर्चेत अनेक विद्वानांनी भाग घेऊन भाषाशास्त्रीय अभ्यासास जोराची चालना दिली आहे, आणि त्यांत मोलाची भरही टाकली आहे. विशेषतः महानुभाव वाङ्मयाचा अभ्यास राजवाड्यांच्या नंतर अधिक झाल्याने उभय वाङ्मयाच्या तुलनेने अनेक सिद्धांत बांधले गेले. श्री. कृ. पां. कुळकर्णी, ह. ना. नेने, गो. कृ. मोडक यांचे मराठीच्या व्याकरणा-संबंधीचे प्रयत्न बहुमोलाचे आहेत. यांपैकी पहिल्या दोघांचे ग्रंथही विशेष प्रसिद्ध आहेत आजपर्यंतच्या एतद्विषयक संशोधनाचा मेरुमणी म्हणजे डॉ. शं. गो. तुळपुळे, एम्. ए. पीएच्. डी. यांचा 'यादव कालीन मराठी भाषा' हा ग्रंथ होय. प्रस्तुतच्या विवेचनास मुख्यतः या ग्रंथाचा आधार घेतला आहे.

(अ) **वर्णविचार**–ज्ञानेश्वरींत अ, आ, इ, ई, उ, ऊ, ऋ, ऌ, ए, ऐ, ओ, औ, ं, क्, ख्, ग्, घ्, ङ्, च्, छ्, ज्, झ्, ञ्, च़्, छ़्, ज़्, झ़्, ञ़् (या पांचांचा दन्त्यतालव्य उच्चार होतो) ट्, ठ्, ड्, ढ्, ण्, त्, थ्, द्, ध्, न्, प्, फ्, ब्, भ्, म्, य्, र्, ल्, व्, श्, ष्, स्, ह् आणि :

---

१११ पहा–यादवकालीन मराठी भाषा ले. डॉ. शं. गो. तुळपुळे, पृ. १२–१३–१४ प्रस्तावना.

असे ५२ वर्ण आहेत असें राजवाडे म्हणतात.[११२] डॉ. तुळपुळे यांतून ङ् ञ् ञ् ऌ आणि : वगळतात ळ् भरीस घालतात.[११३] राजवाडे प्रतींत ळकार नसला तरीं मराठींत ज्ञानेश्वरपूर्वकालापासून ळकार होता व त्याचें लेखन तकारयुक्त जसें त्ल=ळ (स्थत्ल=स्थळ) असें करीत. तत्कालीन शिलालेखांत 'ळ' आहे.[११४]

वर्ण विचारासंबंधांत पुढील ठळक बाबी लक्षांत ठेवल्यास ज्ञानेश्वरी आणि यादवकालीन इतर ग्रंथ लवकर समजूं लागतात. आज अशिक्षितांच्या तोंडीं असलेलीं कित्येक शब्दस्वरूपें यादव-कालीन ग्रथांत सांपडतात.

१ **स्वरभक्ति**-शब्दाचा उच्चार सुलभ व्हावा म्हणून स्वर अधिक घातला जातो. जसें, वरिस ( <वर्ष ), बहिरव ( <भैरव ) मुगुते ( <मुक्त )

२ **वर्णागम**-'ए' 'ओ' च्या मागे 'य्-व्' येतो येकु (एक), वोखद (औषध), येतुलें (इयत्-),

३ **वर्णविपर्यय किंवा व्यत्यास**-मोहरें<समोर, टिकला<तिलक, कडवसा-कवडसा, प्रजन्य< पर्जन्य

---

११२ श्रीज्ञानेश्वरींतील मराठी भाषेचें व्याकरण. पृ, १, २. ११३ यादवकालीन मराठी भाषा पृ.७० ११४ डॉ हर्षे यांची ज्ञानदेवी, प्रस्तावना पृ. ४७ , व यादव कालीन मराठी भाषा प्रस्ता. पृ. १० ते ११ पहा

४ **वर्णनाश**– वरि ( < उपरी ),

५ **समवर्णलोप**– वाद्यंत्र ( वाद्ययंत्र )

६ **वर्णविकृति**– गाव <ग्राम, कोंवळा<कोमल, कीव <कृपा ख, घ, थ, ध, फ आणि भ यांच्या जागीं ह येतो. मुह <मुख, मेह<मेघ, नाहो<नाथ, मेहुण<मिथुन, कहाणी <कथानिका, बहिरा>बधिर, महुर<मधुर, चांपोल<चंपअफुल्ल पहाट<प्रभात. स्वरांतर्गत ‘ ह ’ चा कधी लोप होतो. जसें सोयरा<सहोदर. ‘ ह ’ चा उच्चार पुसट वा हळुवार असल्यानेंहि, तो लोप पावत असावा. जसें हिं<इं. पुढील व्यंजनांत हकार मिसळलेला दिसेल. माह्येर, पऱ्हां, तेव्हांलिं, सांघे, सहस्रवोन्हि. उष्म्यांपैकी ‘ श् ’ किंवा ‘ ष् ’ चा ‘ स् ’ होतो, कधी ‘ ष् ’ चा ‘ छ् ’ होतो किंवा ‘ छ् ’ चा ‘ स् ’ होतो व आरंभीच्या ‘ श् ’ ‘ स् ’ चा लोप होतो. आसु<आशा, सीस<शीर्ष, साहाण<पाषाण, आविंस<आमिष, असेख<अशेष, सत्र<छत्र,

इत्यादि. ‘ल’ चा ‘ळ’ होतो, पडळ (<पटल )लीळाचरित्र ( <लीलाचरित्र ). ( राजवाडे ज्ञानेश्वरींत ‘ळ’ मूळचा असावा असें त्यांच्या ज्ञानेश्वरींत जें एका पानाचें छायाचित्र दिलें आहे त्यावरून वाटतें. ) ‘ ट ’ चा ‘ ड ’ होतो. पडळ ( <पटल ), ‘ य ’ चा ‘ ज ’ होतो जसें युद्ध>जूझ, ’ क्ष ’ ‘ ष ’ यांच्या स्थानीं ‘ ख ’ येतो. जसें उखा, विख, पांख, दोख,

( प्रा. पारसनीसांच्या मतें ' ख ' चा आकार **भ्रामक असल्याने** ' ष ' लिहिण्याची पद्धत पडली असावी. हें कारण सयुक्तिक वाटत नाहीं, उलट क्वचित् ' ख ' ऐवजी ' ष ' सांपडतो. उदा. पूणे<खूण ज्ञा. ७-११५ ) ' ऋ ' चा ' अ ' ' आ ' ' उ ' किंवा ' इ ' होई. सें<सइ <स्मृति, माहार <मृतहर, रुखु<वृक्ष, रिद्धि<ऋद्धि. अन्त्य अ, आ, इ, उ यांचा विकल्पानें लोप होतो, किंवा अन्त्य ' अ ' चे स्थानीं ' उ ' ( स्वर्गु, गणेशु ) किंवा ' ओ ' ( संजयो सूर्यो ) येतो. शब्दान्तीं ऱ्हस्वीकरणाकडे ( एरि माझि, गांवि-चा ) ओढा दिसतो, अन्त्य ' ए ' चा विकल्पाने ' आं ' ( पुढां, नावां ), ' अय ' चा ' ओ ' ( उदो ), ' अव ' चा ' औ ' ( अनुभौ ), ' ये ' किंवा ' व ' ऐवजी ' ओ ' किंवा ' वो ' ( उपावो, उपाओ, देवो, देओ ) असा बदल होतो आणि ' ओ ' चें लेखन विकल्पाने ' उ॰ ' होतें.

प्राचीन मराठीचा भूतकृदन्तांतील ' य-श्रुति ' हा एक विशेष होय ' **व-श्रुति** ' पेक्षा ( जसें केतक>केवडा, घात>घावा उपाय>उपावो ) ' **यश्रुति** ' ( जसें—प्रसाद> पसाय, >घाय, दान>दाय ) अधिक प्रमाणांत झालेली आहे.

(आ) **शब्दविचार**— यादवकालीन मराठींत तत्सम, तद्भव, देशी आणि परकीय असे चार प्रकारचे शब्द आढळतात ज्ञानेश्वरांच्या काळापूर्वीपासून संस्कृताचे पुनरुज्जीवन सुरू झाल्याने

प्रत्यक्ष संस्कृत भाषा जरी बोली भाषा होऊं शकली नाही. तरी तद्भवांऐवजी मूळ तत्सम शद्ब वापरण्याकडे कल वाढूं लागला होता.

ज्ञानेश्वरानंतरच्या काळांतही हा विद्योज्जीवनाचा परिणाम आजतागायत होत आहे. तत्सम तद्भव आणि देशी व इतर यांचे प्रमाण यादवकालांत पुढील प्रमाणे होते.[११५]

| | तत्सम शद्ब | तद्भव शद्ब | देशी व इतर शब्द |
|---|---|---|---|
| १ ज्ञानेश्वरी (नागरपद्य) | शेंकडा २३ | शेंकडा ६४ | शेंकडा ४॥ |
| २ महानुभावीय वाङ्मय (लौकिक गद्य) | १२ | ८६ | २ |
| ३ महानुभावीय वाङ्मय (नागर गद्य) | ३१ | ६२ | ६ |
| ४ शिलालेखीय वाङ्मय | २५ | ७५ | ४ |
| **यादवकालीन मराठी भाषा** | २३ | ७२ | २ |

शद्बसिद्धीच्या दृष्टीने ज्ञानेश्वरींतील नामधातु ( उपसंहारोनि, हाकारिजे ) व क्रियानामें ( थाडिव ) उल्लेखनीय आहेत. तसेंच

---

११५ यादवकालीन मराठी भाषा— ले. डॉ तुळपुळे यांत, दिलेल्या वर्गवारीवरून.

सामासिक शद्वांत समासांतर्गत विभक्ति ( चक्रधराराण्याच्या ) असणें हा त्यावेळच्या मराठीचा विशेष होय.

यादवकालांतील मराठीवर परकीय भाषांपैकी द्राविडीचा परिणाम शद्वकोश, शद्वसिद्धि, वर्णप्रक्रिया, वाक्यरचना, आणि वाक्प्रचार या बाबतींत पुष्कळच झालेली आहे, आणि त्याचीं कारणें (१) महाराष्ट्रावरील कानडी राजांचा अम्मल, (२) कानडी मराठीच्या एकमेकींत मिसळलेल्या सीमा, आणि (३) तत्कालीन बहुसंख्य महाराष्ट्रीयांच्या आवडत्या वारकरी पंथाचें आराध्य-दैवत पांडुरंग, आणि क्षेत्र पंढरपूर दोन्ही मूळ कानडींतून मराठींत येणें, हीं होत.[११६] ज्ञानेश्वरींत कडसणें (घुसळणें), मातु ( शब्द, गोष्ट ), किडाल ( बिघडणें ), भांगार ( सोनें ), हुडा ( बुरूज ), बिढार ( राहाण्याची जागा ), सूड इत्यादि कानडी शब्द आहेत. या काळच्या मराठींत आलेले तेलगू शब्द थोडे असून त्यांची तेलगू >कानडी>मराठी अशी परंपरा आहे. मूर्धन्य ' ळ ' आणि दन्त्यतालव्य च़, छ़, ज़, झ़, ञ, हे वर्ण द्राविडी भाषांतून आले असें एक मत आहे.

कानडी किंवा तेलगू या द्राविडी भाषांतील शद्वांशिवाय कांहीं ग्रीक शद्व ( साक्षात् नव्हे तर परंपरेने ), नंद भाषेंतील शद्व आणि फारसी शद्व यादवकालीन मराठींत आले. ज्ञानेश्वरांच्या

---

११६ पहा—'यादवकालीन मराठी भाषा' पृ. ३१९ ते ३२३

काळीं फारसी शब्द मुळीच नव्हते हें कै. राजवाडे यांचे विधान डॉ. तुळपुळे आणि त्यांच्या पूर्वी कांहीं विद्वानांनी { निसाण (ज्ञा.९-२१६), पोतडी (ज्ञा.१४-१७), रूखवत (धवळे-पूर्वार्ध), सुलतान ( स्मृतिस्थळ ८३ ) इत्यादि उदाहरणें देऊन, } खोडून काढिलें आहे. उत्तरकोंकणच्या किनाऱ्याशीं व्यापारानिमित्त आलेल्या अरबांबरोबर भाषिक देवाण घेवाण होऊन कांहीं तुरळक शब्द मराठींत येण्यापलीकडे फारशीचा कांहीही परिणाम तत्कालीन मराठीवर झालेला नव्हता.

(अ) **लिंग, वचन, सामान्यरूप आणि नाम विभक्ति**— यादवकालांत संस्कृत, महाराष्ट्री, अपभ्रंशाप्रमाणे तीन्ही लिंगें होतीं. त्यांची अन्त्यस्वरावरून कांहीं निश्चिती होई, कित्येक वेळां संस्कृताप्रमाणेच (उदा. जन्म न.) लिंगभेद ठेवीत तर कधी त्याऐवजी बदल करीत. ( उदा साखळें शृंखला—सं.—न. आणि म.—पु. ) जीवशास्त्राप्रमाणेच भाषाशास्त्रांतही अमक्याला अमुकच लिंग कां हें अद्यापिही न सुटलेलें ( व पुढेही बहुधा न सुटणारें ) एक कोडें आहे.

यादव—मराठींत एकवचन आणि अनेकवचन अशीं दोनच वचनें आहेत. संस्कृतांतलें **द्विवचन** महाराष्ट्री व अपभ्रंशांत नाहीं, व म्हणून मराठींतही न येणें साहाजिक होय. तरीही **शशिसूर्यां** ( ज्ञा. ७—३२ ) **चरणां** ( लीळाचरित्र १—५७ ) **उपानहौ** ( ऋद्धिपरवर्णन ) **उपानौह, उपानौ** (स्मृतिस्थळ)

**करां, मायबापां** (वच्छहरण) इत्यादि तुरळक रूपें द्विवचनाचीं असून महानुभावीय व्याकरणांत[117] द्विवचनाचा उल्लेख आहे. अशा तुरळक रूपांवरून त्याकाळीं द्विवचन सर्रास रूढ होतें असा सिद्धांत बांधता येत नाही.[118] 'तिन्ही लिंगीं नामांच्या अनेकवचनाची अनुनासिक ही नियतखूण आहे.' क्वचित् एकवचनाचें रूप अनेकवचनीं वापरलें जाई. आजच्या-प्रमाणे सामान्यरूप सर्वत्र नसे. प्रत्ययी विभक्तींत ते मुळींच नसे, सामासिक विभक्तींत बव्हंशीं असे.

प्रथमेपासून संबोधनापाबेतों आठही विभक्त्यांचीं प्रत्ययी रूपें आहेत. प्रथमा व द्वितीया या एकरूप आहेत,[119] क्वचित् प्रथमेहून भिन्न असे सप्रत्ययी द्वितीयेचें रूप आढळतें. प्रथमेंत आजच्याप्रमाणे मूळरूप न ठेवतां तें 'उ'कारान्त किंवा 'ओ'कारान्त होई. तृतीया, (नवरसां) चतुर्थी, (पूतां) पंचमी, (पूतां) षष्ठी, (पूतां) सप्तमी (सागरां) यांचीं रूपें आकारान्त करण्याकडे कल आहे. या एकाविधतेमुळे विभक्ति केवळ संदर्भा-वरून ओळखणें भाग पडूं लागलें. अर्थात् एकमेकांपासून ओळखण्यास व पर्यायाने निश्चित कारकार्थ व्यक्तविण्यास हीं

---

११७ पंडित भीष्माचार्य कृत 'पंचवार्तिक'.

११८ पहा या. म. भाषा —प्रस्ता. पृ. ३४ व पृ. १५६ – ७

११९– ज्ञानेश्वरींत द्वितीया व चतुर्थी अजीबात नाही असे एकमत आहे

प्रत्ययात्मक रूपें अपुरीं वाटूं लागलीं, म्हणून अर्ध प्रत्ययात्मक विभक्ति व शब्दयोगी साधित विभक्ति प्रचारांत आली. अर्धप्रत्ययात्मक बिभक्ति { 'स–सीं (<साहितम् ) तृतीया;' सिं–सीं–शीं ' ( <आर्षे ) चतुर्थी; 'थें '–'तें ' (<अर्थे ) चतुर्थी; च ( <त्यत् ) आणि स षष्ठी; 'ज ' ( कार्य ) षष्ठी; 'क ' ( <कृत ) षष्ठी; } फक्त तृतीया, चतुर्थी व षष्ठीची असून शब्दयोगी साधित रूपें सर्व विभक्त्यांतून आहेत. अशा शब्दयोगी अव्ययांच्या मागे प्रथमा, पंचमी व सप्तमीचीं रूपें येत नाहीत हें राजवाडे यांचें मत उदाहरणें देऊन डॉ. तुळपुळे यांनी खोडून काढिलें आहे.[१२०] ( जसें–राओवांचौनि ) प्रत्यययुक्त पंचमी क्वचित् उपयोगांत येते. साधारणतः प्रत्ययानंतर 'नि ' आगम ( षष्ठीमध्यें विशेषेंकरून ) जोडलेला दिसतो. जसें–तुझे–नि, संग्रामाचें–नि ).

पुढील शब्दयोगी अव्ययें प्रत्ययांचीं कामें करतात.

**प्रथमा, द्वितीया**—वांचौनि, वेग्हि, पर्यंत, साहित

**तृतीया**—विण, हीन, साहित, सवें, सरिस, वांचौनि, करूनि, करवीं, वरि.

**चतुर्थी**—लागीं, लागौनि, पाठीं, पासाव, पासौनि, पाउनि, कारणें, प्रति, साटीं, द्दोसें, स्तव.

---

१२० ज्ञानेश्वरीचें व्याकरण पृ. १८ व या. म. भाषा –पृ. १९४ ते २०३

**पंचमी**—तवं, लागीं, लागौनि, पासि, पासाव, पाउनि, होउनि, हौनि

**षष्ठी**—वरि, सकट, समोर, परौता, वांचौनिया, वारिया

**सप्तमी**—आंतु, भीतरीं, माजि, मध्यें, माझारिं,

हीं शब्दयोगी अव्ययें कधी कधी शब्दांच्या पूर्वींही येत. जसें वांचूनि कर्मारंभ (ज्ञा. ३–४५) वांचूनि जाणावेयाचिया (ज्ञा. ७–१९१) कधी हीं नामाप्रमाणेच अव्ययें व कृदन्तें यांनाही लागत. कधी अर्धप्रत्ययात्मक शब्दयोगी रूप व शब्दयोगी अव्ययाचें रूप दोन्ही एकत्र येत.[१२१]

(औ) **सर्वनामें**—यांच्या प्रत्ययांत पुष्कळच विविधता आहे. दर्शक आणि संबंधी सर्वनामांचीं स्त्रीलिंगी रूपें हल्लीप्रमाणे 'ही-ती-जी-ती' न होता 'हे ते-जे-ते' अशीं होतात. यांवर अनुस्वार देऊन नपुंसकलिंगी रूप सिद्ध होतें. ('ते बुद्धि' ज्ञा. ७–४४ 'तें विश्वबीज' ज्ञा. ७–४१) सर्वनामें आणि संबंधित नामें यांची विभक्ति एकच असतें. ('तेणें बरवेंपणें' ज्ञा. ७-१८४, तीजेनि तेणें ७-१०७)

(उ) **विशेषणें**—हीं विशेष्यनिघ्न आणि अविकृत अशीं दोन्ही प्रकारचीं आहेत. पहिलाच प्रकार अधिक असून त्यांत

---

१२१ उदा. 'तवंचिवेन्हीं' 'नावकवेन्हीं' 'वीनवैसौनि' पहा या. म. भाषा पृष्ठ २०३

विशेषण विशेष्याचे एकच लिंग, वचन, व बिभक्ति असते. ( ' पैला तीरा' ज्ञा. ७-९६ शारीरें कर्मे, अंतरें धर्में, ज्ञा. ७-११३ श्रीमंतें माह्येरें, ज्ञा. ९-३ रूपकांतही ह्याच नियम लागू पडतो. ( ' अहंकारें आजेन ' ज्ञा. ७-१६२ )

नाम साधित विशेषणें-('सेवाळलें खडक' 'देहलुतैले वाळुक') वर्तमान कालवाचक विशेषणें-( सेविती परि, नधरत अ पात ) भूतकालवाचक विशेषणें-( रंगाथिलें अंबर, थिरावलेनि अंतष्करण ) आणि सार्वनामिक विशेषणें-(जेतुला तेतुला) यांचा प्रचार होता.

तारतम्य भाव दर्शविण्याकरिता हुनि, परिस, पासौनि, परौतें इत्यादि शद्बयोगी अव्ययांचा उपयोग केलेला आढळतो.

## (ऊ) क्रियापदें

क्रियापदाच्या प्रत्ययांत ( आख्यात प्रत्यय ) वर्तमान काळ, भविष्यकाळ आज्ञार्थ आणि विध्यर्थ यांचे प्रत्यय महत्वाचे आहेत. भूतकाळाचीं कांहीं रूपें वर्तमानकाळासारखीं असून (उदा. 'भणे') भूतकालवाचक धातुसाधितांना ' ल ' आणि प्रसंगविशेषीं ' न ' प्रत्यय जोडून भूतकाळ सिद्ध होई. (उदा. धाविन्न+ल=धाविन्नला, जुझिन्नला, पातला. ) संकेतार्थाचीं भविष्यकाळासारखीं रूपें असतात. वर्तमानकाळी रूपांवरून संदर्भानुरोधाने वर्तमान,

**भूत, भविष्यकाळांचे अर्थ लक्षांत घ्यावे लागतात.**[१२२] **भविष्यकाळांत** 'ल' प्रत्यय मूळ प्रत्ययापुढे विकल्पाने लागतात. कोष्टक रूपाने आख्यात प्रत्यय असे देतां येतात.

| एक वचन | | | अनेक वचन | | |
|---|---|---|---|---|---|
| **वर्तमानकाळ** | | | | | |
| प्र. पु. | द्वि. पु. | तृ. पु. | प्र. पु. | द्वि. पु. | तृ. पु. |
| ए.,इं. | आसि,इसि | ए,इ,ऐ | उं,ओं, | आ,आं | अति,इति |
| **भविष्यकाळ** | | | | | |
| प्र. पु. | द्वि. पु. | तृ. पु. | प्र. पु. | द्वि. पु. | तृ पु. |
| एं,इं,उं | आसि,इसि, | इ | ऊं ऊाने(औनि) | आ | अति,इति |
| **आज्ञार्थ** | | | | | |
| प्र. पु. | द्वि. पु. | तृ. पु. | प्र. पु, | द्वि. पु. | तृ पु. |
| उं | एं,इं,ऐ | ओ | रूपें नाहींत[१२३] | आ,आं | ओतु,अतु |

४ **विध्यर्थ**—दोन्ही वचनीं, सर्व पुरुषीं 'इज' हाच प्रत्यय. रूप 'जे' कारान्त. ( पुसिजे-होइजे ) द्वि पु., ए. व. मध्ये 'इजसु' हें अधिक रूप. कर्माणि लिङ्चीं रूपें 'जो' कारान्त. ( येइजो-जाइजो )

---

१२२ पहा सदर पृ २२२

१२३ अशीं रूपें राजवाडे आपल्या व्याकरणांत ( पृ. ८० ) देतात, परंतु 'तीं काल्पनिक होत' अशी टीका डॉ. तुळपुळे या. म भा. मध्ये (पृ २२४ ) करतात.

यादवकालांत **वर्तमान कृदन्तें**—प्रत्यय 'आ'; **भूतकृदन्त**-प्रत्यय 'ल': भविष्य कृदन्तें—प्रत्यय ऊ-आव-ज (आनेया) **सतां तृतीया** ( उदैलेनि सुधाकरें ) व **सती सप्तमी** (नसतां-संसारां), **संयुक्त क्रियापदें** (जातासि, वरिषताति, विवरीतु असे,) **सहाय क्रियापदें** ( होंतु जाये, लपौं नैए ) याचा उपयोग होत असे.

## ( ए ) प्रयोग

**कर्तरि कर्माणि आणि भावे हे तीन प्रयोग** असत. कर्मणि प्रयोग १ व्ययी कृदन्तामुळे,[१२४] ( मियां केला गुरू ), २ 'इज' मुळे (देइजे, होईजो), ३ 'व' मुळे, ( नेणवे ) आणि ४ 'प' मुळे ( घेपे, घापाति, म्हणिपे, हारपो, घेपले, हारविजे ) अशा चार प्रकारांनी सिद्ध होतो. भावेप्रयोग १ व्ययी कृदन्तामुळे (घातलें कुहां सिंहें), २ 'इज' मुळे ( देखिजे ), ३ 'व' मुळे ( बांधवे ), आणि ४ तृतियान्त (अमरीं भाटां होइजे ) अशा चार प्रकारांनी सिद्ध होतो. हा शेवटचा प्रकार केवळ यादव मराठींतच आहे, पुढे तो लोपला.

---

१२४ अर्थदृष्ट्या हा कर्माणि नव्हे, परंतु रूपदृष्ट्या आहे. मो. के. दामले ( शास्त्रीय मराठी व्याकरण, पृ. ७५८ ) यास प्रधानकर्तृक कर्माणि म्हणतात.

**(ऐ) वेगळी वाक्यरचना.**

**वाक्यरचनेची निश्चित पद्धत** असली तरी क्वचित् ' प्रथमान्त कर्ता व कर्मण्यर्थी क्रियापद किंवा तृतियान्त कर्ता व कर्तरि क्रियापद अशी **वेगळी रचनाही** दिसते.

**( ओ ) अकरण रूपें व प्रयोजक रूपें.**

क्रियापदांचीं अकरण रूपें १ ' न ' अव्ययाने ( नुरवी, नेदखे ), २ ' ना ' अव्ययाने ( नाकळे ), ३ मुख्यक्रियापदाशीं जोडून ( नोहोंति, नाथि ), ४ ' नको ' मुळे ( नका हो, हांसो नको, ) आणि ५ ' झणें ' या निषेधार्थी अव्ययाने ( झणें देसी ) या पांच प्रकारांनी सिद्ध होतात. क्रियापदांचीं प्रयोजक रूपें ' अव ' मुळे ( हारवी, राविंत ) किंवा धातूच्या उपधेस वृद्धि होऊन ( पड > पाडी, मन > मानी, सिद्ध होत, किंवा मूळरूपही क्वचित् प्रयोजकार्थी वापरीत.

**(औ ) निपात किंवा अव्ययें.**

हीं अव्ययें १ क्रियाविशेषणें ( आझुइं, पुढुतीं, चौम्हेरि, झणें, संविया, होंका ) २ उद्गारवाची हां गा, (हाहोजी, बापु ) ३ उभयान्वयी ( जे, मां, वरि, जंवतंव, येऱ्हवी, ) ४ पादपूरक (चि, हिं, पां, पैं, हान ) या चार प्रकारचीं असून त्यांच्या विस्तृत याद्या राजवाडे आणि तुळपुळे यांनी दिल्या आहेत यांतील कित्येक निपात आज प्रचारांत नाहीत.

## ८२ ज्ञानेश्वरींतील टीकापद्धति आणि ग्रंथ विस्तार.

श्रीमद्भगवद्गीतेची श्लोकसंख्या ७०० आणि ज्ञानेश्वरीची सर्वांत कमी ओवी संख्या ८८९२ आहे. म्हणजे मूळाच्या सव्वाबारा पट विस्तार ज्ञानेश्वरांनी केला, परंतु एवढ्या विस्तारांत पूर्वपक्ष उत्तरपक्ष असा वादाचा आखाडा कोठेंही नाहीं[१२५] उलट 'श्रोत्यांच्या मतीवर भावार्थाचा फुल्लौरा होतु जाय' अशा श्रवणसुभग वाणीनें अर्थाचा विस्तार होत जातो. मूळ गीतेंतील अध्यात्मशास्त्र आबालसुबोध करून संस्कृताचीं गहन अरण्यें शोधावी न लागतांही आपलें परमकल्याण साधून घेण्याची दिशा दाखविणें हें त्यांच्या टीकापद्धतीचें मुख्य धोरण दिसतें व याकरितांच ८८९२ संख्येपैकी सुमारे नऊदशांश भाग त्यांनी खर्च केला आहे. 'म्हणोनि आखरीं सुभेदी। उपमा श्लेष कोंदाकोंदी। झाडा देइन प्रतिपदीं। ग्रंथार्थासि ॥ ज्ञा. १३-११५८ ॥' या त्यांच्या प्रतिज्ञेंतील पहिला भाग जितका खरा ठरलेला दिसतो तितकाच दुसरा भाग विस्मृत झालेला आढळतो कारण प्रत्येक पदाचा 'झाडा' देण्याची खटपट त्यांची वाणी करीत नाही, उलट गीता २।१८, २।२०, ५।१७, ५।२१, ७।११ इत्यादि अनेक श्लोकांतून कित्येक पदांचे अर्थ दिलेले नाहीत असें आढळून येतें. वरीलपैकी दुसऱ्या श्लोकांतील एकाही

---

१२५ तेराव्या अध्यायांतील 'अहिंसा' पदावरील व्याख्यान अपवादभूत समजावें.

पदाचें भाषांतर नसल्याचा उल्लेख करून राजवाडे म्हणतात " जेथें विशेष कांही भानगड नाही, प्राय: पुनरुक्ति व गौरव आहे, तेथे ज्ञानेश्वर स्तुति करतो "[१२६] ज्ञानेश्वर मुळांत वास्तविक नसलेला अर्थही आपल्या व्याख्यांनांत देऊन अर्थाची भर करतात, ( ज्ञा. १-९२ ) तर कधी कुळनाम व व्यक्तिनाम यांना दोन वेगळीं व्यक्तिनामेंच समजण्याची ( ज्ञा. १–१०० ) किंवा विशेषणाला विशेषनाम गणण्याची ( ज्ञा. १-१०८ ) चूकही कारितात. मूळच्या अर्थाशीं धडधडीत विरुद्ध अर्थही ( ज्ञा. १-१७६ ते १७९ ) ते करतात.[१२७] हे कांही दोष वगळले तर मुळांत नसलेला किंवा मूळाच्या कांही अंशीं विरुद्ध जाणारा अर्थ सांगतांना त्यांनी काव्यसौंदर्याची नुसती बहार उडवून दिली आहे ( गीता १-१९ वरील व्याख्यान ) हें सहज लक्षांत येईल. मूळ गीता जवळ नसली तरी ' गीतेवीण रंगु दावी ।' ( ज्ञा. १८-१७२० ) अशी ज्ञानेश्वरीची स्वतंत्र योग्यता आहे व म्हणून ज्ञानेश्वरींतील संक्षेप–विस्ताराचें मर्म तींतील रसपरिपोष हें आहे हें लक्ष्यांत येते. रसपरिपोषाव्यतिरिक्त विस्ताराचीं इतर उपांगेंही महत्त्वाचीं आहेत. वेळोवेळीं केलेली गुरुस्तुति, श्रोत्यांची विनयपूर्वक प्रार्थना, महाभारत आणि तदंतर्गत

---

१२६ राजवाडे प्रस्तावना पृ. ८४. १२७ प्रा. श्री. ना. बनहट्टींचा लेख 'ज्ञानेश्वराचा अभ्यास' पहा श्रीज्ञानेश्वरदर्शन साहित्यखंड पृ. १ ते २८.

श्रीमद्‌भगवद्‌गीतेचें मोठेपण, रडणाऱ्या अर्जुनाची थट्टा आणि त्याचा महामोह, मायामहानदीवरील सर्वांगसुंदर रूपक, भक्तीचें, भक्तांचे, दैवी संपत्तीचें वर्णन इत्यादि अनेक विषयांच्या आनुषंगिक वर्णनांत ज्ञानेश्वरांच्या भावोत्कट वाणीला असा कांहीं ओघ प्राप्त होतो की त्यांचे त्यांनाच अवधान राहात नाहीं, आणि "....कथे पसरू जाला। श्लोकार्थु दूरि ठेला। कीजो क्षमा या बोला"। [१२८] अशी ते क्षमा मागूं लागतात. या अनुषंगिक विषयांशिवाय नीत्युपदेश व संसारांतील यच्चयावत् जीवांनी करावयाचें स्वधर्मानुसरणें, स्वकर्तव्यपालन आणि अधर्मत्याग यांची शिकवण देणें, दिखाऊ ब्राह्मण्याचें बंड मोडून खरें चातुर्वण्य उपदेशिणें, स्वपंथांतील आवडत्या योगमार्गाचें स्पष्टीकरण करणें, गति ध्याय-संगति दाखविण्याकरिता उपक्रमोपसंहार करणें, आणि मातृभाषेच्या अमृतवाणीचें साभिमान समर्थन करणें, या विषयांकरिताही अनेक ठिकाणीं ज्ञानेश्वरांना बुद्ध्या विस्तार करावा लागला असें दिसतें. तसेंच अठराव्या अध्यायास कळसाध्याय म्हटलें असल्याने त्यांत सबंध गीतेंतील एकंदर विवेचनाचा सारांश सांगतांना केलेली उपसंहाररूप पुनरुक्ति ही देखील विस्तारास कारण झाली आहे.

## ८३ ज्ञानेश्वरांचें तत्त्वज्ञान:- कांहीं विशेष.

---

१२८ ज्ञानेश्वरी १३ - ३३४

## (अ) "भाष्यकारांतें वाट पुसतु."

"तैसा व्यासाचा मागोवा घेतु (तु) । भाष्यकारांतें (वाट) पुसतु । (ज्ञा. १८-१७०१) आणि ज्ञानेश्वरी रचीत आहों असा निर्वाळा श्रीज्ञानेश्वरांनी स्वत: दिला असल्याने आणि ज्ञानेश्वरी ही मूळ भगवद्गीतेवरील टीका असल्याने, गीतेंतील तत्त्वज्ञान, गीतेवरील त्यावळीं उपलब्ध असलेल्या भाष्यांच्या आधारें त्यांना वर्णिलें असा कयास होतो. ज्ञानेश्वरांच्या पूर्वी गीतेवर पुष्कळच संस्कृत टीका झाल्या,[१२९] असल्या तरी ज्ञानेश्वरांच्या वेळीं श्रीमदाद्य शंकराचार्य आणि श्रीरामानुजाचार्य यांच्या गीतेवरील ग्रंथांचीच भाष्यें म्हणून प्रसिद्धि होती- तिसरें भाष्य श्रीमध्वाचार्यांचें. श्रीमध्वाचार्य आणि ज्ञानेश्वर समकालीन असून एक द्वैती तर दुसरे अद्वैती इतका भेद असल्याने ज्ञानेश्वरांनी त्यांचें अनुसरण केलें नाही हे उघड आहे. डॉ. शं. दा. पेंडसे यांनी आपल्या 'श्रीज्ञानेश्वरांचें तत्त्वज्ञान' ह्या ग्रंथांत ज्ञानेश्वर आणि वरील पहिले दोन आचार्य यांच्या ग्रंथांतलि २१८ स्थळांची विस्तृत तुलना करून रामानुजांच्या अनुसरणाचे निरपवाद असें एक स्थळ सोडल्यास (गीता २-४६) तत्त्वज्ञानाच्या दृष्टीने महत्वाच्या ५७ ठिकाणीं रामानुजांना सोडून शंकराचार्यांचे अनुसरण केलें आहे, १५६ ठिकाणीं शंकराचार्यां

---

१२९ किरकोळ मराठी टीकाही असाव्यात. मात्र त्या कालौघांत यथाक्रम नाहिशा झाल्या असाव्यात किंवा ज्ञानेश्वरीमुळे मागे पडून पुढे नाहिशा झाल्या असाव्यात-

प्रमाणे अर्थ केला आहे, ४२ ठिकाणीं शंकराचार्यांचे शद्ब योजिले आहेत, १० ठिकाणीं दृष्टान्तही घेतले आहेत व २-३ ठिकाणीं **तर शंकराचार्यांच्या भाष्याचें भाषांतरच केलें आहे** असें दाखवून दिलें असून **'भाष्यकारांतें' यांतील भाष्यकार केवळ शंकराचार्यच होत** असे शेवटीं प्रतिपादन केलें आहे.[130] सांप्रदायिक मतही असेच आहे. ज्ञानेश्वरांनी ६८ ठिकाणीं शंकराचार्यांच्या किंवा रामानुजाचार्यांचा अर्थ न घेतां स्वतंत्र अर्थ केले असूनही तत्त्वज्ञानाच्या दृष्टीने शंकरांना विरोधी असें एकही स्थळ नाही.[131] असें असलें तरी "याचा अर्थ ज्ञानदेव हे शांकरभाष्याचे केवळ भाषांतरकार किंवा झिरपे आहेत असा मात्र नव्हे. त्यांनी मुख्यत: शांकर मतांचा अनुवाद केला असला तरी त्यांच्या गाढ व्यासंगाचें प्रतिबिंब ज्ञानेश्वरींत पडणें अटळ होतें .... असें दिसतें की उपनिषदें, गीता, गौडपादकारिका, योगवासिष्ठ, शांकरमत, काश्मीरीशैवसंप्रदाय, आणि गुरुपरंपरेने आलेलें नाथपंथीय तत्त्वज्ञान अशा सप्तसिंधूंचे ओघ ज्ञानेश्वरीच्या अद्वैत सागरास येऊन मिळाले आहेत........ शंकराचार्यांचे अद्वैत ही ज्ञानेदवांच्या तत्त्वज्ञानाची पार्श्वभूमि आहे. "[132]

---

१३० पहा – श्रीज्ञानेश्वरांचें तत्त्वज्ञान ' पृ. १६८.

१३१ पहा सदर पृष्ठ १६७

१३२ पहा – डॉ तुळपुळे कृत 'पांच संतकवी, पृ. ३७

**(आ) जगाच्या बुडाशीं असलेलें मूळ तत्त्व आणि अद्वैत सिद्धांत.**

श्री मदाद्य शंकराचार्यांचें महान् कार्य म्हणजे वेद आणि उपनिषदें यांच्या आधारें त्यांनी सिद्ध केलेला **अद्वैत सिद्धांत** होय. दिक्कालाने अमर्यादित, नित्य, शुद्ध, बुद्ध, अनादि, स्वतंत्र, सर्वव्यापी, निर्गुण असें एकच एक तत्त्व जगाच्या बुडाशीं आहे हे त्यांनी 'एकमेवाद्वितीयं ब्रह्म' (छां. ६-२-२) 'इदं सर्वं यदयमात्मा' (बृह-२-४-६), 'नेह नानास्ति किंचन, (बृह. ४-४-४९) 'ब्रह्मैवेदं सर्वम्' (मुंडक० २-२-२१) इत्यादि शेकडों श्रुति वाक्यांच्या आधारें सिद्ध केलें आहे. हें मूळ परमेश्वर नामक तत्त्व असून याचा प्रकृति पुरुषांशीं कोणता संबंध आहे याचा निर्णय करण्याचें काम वेदान्तशास्त्राने केलें आहे. प्रकृति, पुरुष आणि परमेश्वर या त्रयीला अनुक्रमाने जगत्, जीव आणि परब्रह्म ह्या संज्ञा अध्यात्म शास्त्रांत आहेत. जीव आणि जगत् हीं मूळ परब्रह्माहून (१) अभिन्न आहेत, (२) थोडीं भिन्न आहेत आणि (३) अत्यंत भिन्न आहेत, अशा मतवैचित्र्यांतूनच अद्वैतसिद्धांत, विशिष्टाद्वैत सिद्धांत आणि द्वैतसिद्धांत आदि सिद्धांत जन्माला आले.[१३३] विश्वांत एकच सत्य आहे आणि तें परब्रह्मतत्त्व, सर्व जगत् मिथ्या होय.

---

१३३ पहा लो. टिळक कृत 'गीतारहस्य', पृष्ठ १९९

मायिक होय. मनुष्याचा आत्मा मूळ परब्रह्मस्वरूपीच आहे. जीव आणि ब्रह्म यांतील भिन्नता तात्विक दृष्ट्या खरी नाही, तर ती उपाधिभेदाने भासते. रज्जूच्या ठिकाणीं सर्प भासमान् व्हावा त्याप्रमाणे, किंवा उदकीं जाली बाबुली । उदकातें चि जैसी झांकोली । ( ज्ञा. ७-५९ ) तैसी माझी चि हे बिवली । ( त्रि ) गुणात्मक साउली । ( ज्ञा. ७-६२ ) अशा त्रिगुणात्मक मायेमुळे ' जीवदशे ( ला ) आलेले ' भूतजात सर्व.... ... माझेचि अवयव ' ( ज्ञा. ७-६५ ) असूनही ' माते नेणती ( ज्ञा. ७-६३ ) म्हणजे मूळ परमात्मा आणि आत्मा यांचें ऐक्य जाणत नाहींत. अशी ही " दुरत्यया माया " ( गीता ७-१४ ) दूर सारून ज्ञानाचेनि उचियडलेंपणें । मी आत्मा ऐसे जाणणें ' ज्ञा. ७-११४ म्हणजेच जगन्निरास करून ' ब्रह्म ' अनुभविणें हा मोक्ष आहे, असें शांकर अद्वैतसिद्धांताचें थोडक्यांत स्वरूप आहे. हेंच स्वरूप ' ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या जीवो ब्रह्मैवनापरः ' या वचनांत साररूपाने ग्रथित झालेलें आहे.

## (अ) ज्ञानेश्वरांच्या अद्वैत सिद्धांताचें स्वरूप.

ज्ञानेश्वरांनाही शांकर अद्वैतच पूर्णपणाने अभिप्रेत आहे, परंतु त्याची व्याप्ति ते अधिक समजतात. एकच आत्मा विविध रूपांनी नटलेला आहे, ब्रह्मदेवापासून यःकश्चित् मुंगीपर्यंत एकच एक आत्मा स्फुरतो, सोन्याचा अलंकार व्हावा किंवा कमळ

विकसित व्हावें, ( ज्ञा. १४-१२३ ) त्याप्रमाणे अवघें विश्व म्हणजे मीच आहे, मायाकार्यासारखा, त्याज्य वाटण्यासारखा कांहीही भाग त्यांत नाही इतकें विशाल अद्वैत त्यांना सांगावयाचें आहे. म्हणून शंकराचार्यांना संमत् असलेला जगताचा निरास करण्याचा मार्ग आपणांस असंमत् असल्याचें 'म्हणौनि जग परौतें । सारूनि पाहिजे मातें । तैसा न्हवे उखितें । आघवें चि मीं ॥' ( ज्ञा. १४-१२६ ) या ओवींतून त्यांनी स्पष्ट केलें आहे. या दोघांच्या अद्वैतमतांतील फरक प्राचार्य दांडेकर 'केवलाद्वैत' आणि 'पूर्णाद्वैत' या शब्दांनी निर्दिष्ट करतात.[१३४] अर्थात् शंकराचार्यांचा मायावाद आणि त्याच्या अनुषंगाने येणारी (अज्ञानास अस्तित्व मानून) अद्वैत सिद्ध करण्याची पद्धति ज्ञानेश्वरांना अमान्य होती हें उघड आहे.

## (आ) प्रकृति–पुरुषविवेक.

गीतेच्या सातव्या अध्यायांत भूमि, आप, अग्नि, वायु, आकाश, मन, बुद्धि, अहंकार अशी अष्टधा प्रकृति सांगितली असून तीच खरी कर्त्री आहे असें तिचें विवेचन केलें आहे. पुरुष हा नुसता द्रष्टा किंवा साक्षीभूत आहे. ही सूक्ष्मप्रकृति 'जैं स्थूलेचेया अंगा घडे' ( ज्ञा. ७–२२ ) तेव्हां भूत-सृष्टीची "टांकसाळ" उघडून, "चतुर्विध ठसा" उमटूं

---

१३४ पहा 'श्रीज्ञानदेव' पृ. ९७ आणि श्रीज्ञानेश्वरदर्शन, भाग २ रा, अध्यात्मखंड, पृ. १०

लागतो, व "मिति नेणिजे" इतक्या असंख्य नाण्यांनी "आदि-शून्याचा गाभारा" भरून जातो असें ज्ञानेश्वर म्हणतात. ज्ञानेश्वरांनी येथील विवेचनांत सांख्य शास्त्राचा हवाला 'जैं हें आणिसी सांख्याचेया गावां' (ज्ञा. ७-४२) या शब्दांत दिला असून प्रकृतिपुरुषांतील संबंध सांख्यमतानुसार दिले आहेत. परंतु पुढे त्यांतील द्वैताचा निरास एका परब्रह्मांत करून अद्वैत मत स्थापिलें आहे. [१३५] याच अध्यायांत मायामहानदीचें वर्णन येऊन गेल्यावर मायावादास पोषक किंबहुना शांकर वेदान्ताचा मुख्य सिद्धांत [१३६] असा अजातवाद ज्ञानेश्वरांनी सांगितला आहे. 'आज असलेलीं, मागे होऊन गेलेलीं, आणि भविष्यकाळांत होणारीं सारीं भूतें म्हणजे मीच' असें सांगून लागलीच भगवान् म्हणतात, ही केवळ बोलावयाची भाषा झाली, एरवीं "यऱ्हवीं कांही। होये ना जाए ॥" (ज्ञा. ७-१५७-१५८)

## (उ) आत्मविचार आणि मोक्ष.

आत्मा नित्य, देह अनित्य होय. आत्म्याचें नित्यत्व, शुद्धत्व बुद्धत्व ओळखणें हेंच आत्मज्ञान. म्हणजेच 'अहं ब्रह्मास्मि' या वृत्तिज्ञानावर येणें असें समजण्यांत येतें. परंतु ज्ञानेश्वरांच्या मतें ही मुक्ति सापेक्ष असल्याने बंधक आहे. आत्म्याचें स्वरूप ज्ञान-अज्ञानाच्या पलीकडील होय असा त्यांचा सिद्धांत आहे म्हणून

---

१३५ पहा – पांच संतकवी, पृ. ३९

१३६ श्रीज्ञानेश्वरदर्शन भाग २ अध्यात्मखंड पृ. ५६ पहा.

'इदमहं' या उभयवृत्तिशून्य होऊन राहणें हाच त्यांच्या मतें खरा मोक्ष [१३७] होय-

### (ऊ) ज्ञानेश्वरांचा स्फूर्तिवाद, आणि एका विसंगतीचा निरास.

वर परिच्छेद ८० (इ) मध्ये अद्वैतसिद्धांताचें स्वरूप सांगतांना शांकर मायावाद आणि अज्ञानाचें अस्तित्व ज्ञानेश्वरांना अमान्य असल्याचें म्हटलें आहे. ज्ञानेश्वरींत १६ व्या अध्यायांत ज्ञान-अज्ञानरूप चांदण्या गिळून टाकणाऱ्या (निवृत्तिरूप) चित्सूर्याचें वर्णन केलें आहे. त्यांना आत्मा म्हणजे प्रकाशाची केवळ खाण वाटते व तपोमय अज्ञान तेथे संभवूं शकतच नाहीं असें ते म्हणतात. अनुभवामृताच्या सातव्या प्रकरणांत अज्ञानाचें सविस्तर खंडण त्यांनी केलें आहे. अज्ञानाच्या खंडणामुळे त्यांना आपला आवडता स्फूर्तिवाद मांडतां आला. '**विश्व हें परब्रह्माचें स्फुरण होय' हा सिद्धांत म्हणजे स्फूर्तिवाद.** अनुभवामृतांत 'जग म्हणजे चिद्विलास' किंवा 'जग असिकी वस्तुप्रभा' हा सिद्धांत मांडावयाला जसें स्वतंत्र क्षेत्र होतें (प्रकरण सातवें) तसें ज्ञानेश्वरींत नव्हतें. या सिद्धांताचा अर्थ असा की तत्त्वतः त्रिपुटीच्या पार असलेला परमात्माच विश्वातील विविध रूपें घेतो, अखिल विश्वरूपानें नटतो आणि इच्छा होतांच स्वतःच्याच ठिकाणीं संकोचतो. विश्वाचा नाश आणि उत्पत्ति यांमधील अवस्था हीच परब्रह्माची सहजावस्था होय.

---

१३७ पहा श्रीज्ञानदेव, (दांडेकर) पृष्ठ १०२

विश्व हें चिद्विलास म्हटल्यावर तें "मिथ्या" किंवा "मायारूप" आहे असें म्हणून विश्वरूपी 'अश्वत्थ' अज्ञान रूप मानून त्यावर ज्ञानखड्गाने प्रहार करावयास सांगणें (अध्याय १५) किंवा मायामहानदीचे सविस्तर स्वरूप वर्णन करीत बसणें (अध्याय ७ वा) हें विसंगत वाटतें. या विसंगतीचा परिहार "ज्ञानेश्वरींतील मायावाद हा सिध्दान्तरूप नसून ज्ञानमार्गाच्या आड येणाऱ्या एका संभ्रमाचा निरास करण्या पुरताच.....आहे"[१३८] असे सांगून किंवा "एकच गोष्ट अधिकारपरत्वें वेगवेगळ्या रीतीने पटविणें शक्य व आवश्यक" असतें[१३९] असें म्हणून करण्यांत येतो.

ज्ञानेश्वरांचा स्फुरणवाद आणि अद्वैतवेदांताचा अज्ञानवाद हे तत्त्वतः भिन्न नाहीतच असेंही एक मत आहे.[१४०]

## (ऋ) ईश्वरस्वरूप; प्रतिमापूजन; अज्ञेयत्व.

ज्ञानदेवांच्या मतें मूर्तिपूजा आणि मानवगुणधर्म ईश्वरास लागू नाहीत. ईश्वराचें मूळ स्वरूप 'निरुपाधिक,' 'आकारशून्य' 'गुणातीत' 'वर्णहीन' 'अचरण' 'अपाणी' (ज्ञा. ९–१५६ ते १७०) इत्यादि प्रकारचें असून त्यास देहधारी समजणें चूक आहे. प्रतिमापूजन करणारा, त्या देवतेप्रत जातो परंतु पुनर्जन्माच्या चक्रांत सापडतो. वास्तविक अणुअणूंत तो भरलेला

---

१३८ पांच संतकवि' पृष्ठें ४९ ते ५१, १३९ श्रीज्ञानदेव पृष्ठें ९९ ते १०१ १४० पहा 'श्रीज्ञानेश्वरदर्शन' भा. २ अध्यात्मखंड पृ. ९४–९५

असतांना 'हें आंतु बाहिरि मियां कोंदलें । जग निखिळ माझेंचि ओतलें ।' (ज्ञा. ९–२९८) अशी परिस्थिति असतांना तो नाही म्हणणाऱ्यांची स्थिति 'पायाखाळचा चिंतामणी काथाडून अन्नासाठी वणवण करणाऱ्या आंधळ्यासारखी होय. (ज्ञा. ९–३०१) धातु काष्ठपाषाणादि भंग पावणाऱ्या प्रतिमांतच ईश्वर असतो हें ज्ञानेश्वरांना असंमत् आहे. प्रतिमापूजा किंवा मूर्तिपूजा ही लाक्षणिक असली तरी तिच्या एकदेशी व्यवहाराचा अतिरेक होऊन हिंदु-हिंदू मध्येच मंदीर प्रवेशावरून आत्मघातकी विरोधाला भरपूर वाव मिळाला. बॅ. मनू सुभेदार तर असल्या परिणामांची जणुं किळस येऊन **मूर्तिभंजक हिंदू -प्यूरिटन पंथ** निघावा अशी इच्छा व्यक्त करतात. [१४१] असो. ' विश्वश्रियेचा भर्ता ' आणि ' समस्ता त्रैलोक्याचा गोसांवि ' असलेला ईश्वर सर्व कांही करवितो; आपण माणसें केवळ निमित्त कारण आहोंत. अशा सर्व शक्तिमान् ईश्वराचे स्वरूप हें अज्ञेय आहे, ' मातेच्या उदरांतील गर्भस्थ बालकाला जसें मातेचें वय कळणें अशक्य, ' ( ज्ञा. १०—६४ ) तद्वत् तें स्वरूप आम्हांस कळूं शकत

---

१४१ "Not only is there no warrent for idolatry in the Gita, but there is a distinct and direct negation thereof. The condemnation in my opinion, is so extensive, that it would justify the emergence of a sect of Hindu purists, who would put the breaking down of the idols as the fore front of their active programme...Taking the forms

नाही. ईश्वराचें विश्वरूप चर्मचक्षूंनी दिसूं शकत नाही त्याकरिता दिव्य चक्षूंची आवश्यकता असते.

## ८४ इंगळ्याच्या आंथरुणावर सुखनिद्रा कशी येईल

ज्ञानेश्वरांनी मानवी संसाराचें अत्यंत भेसूर चित्र रेखाटलें असून सर्वभोगसंपन्न विलासी पुरुषास देखील भोगविन्मुख करावयाचें सामर्थ्य त्यांत आहे ( उदा० पहा ज्ञा. ९–४९० ते ५१६, ७–६८ ते ९८, १३–५३८ ते ५८१ किंवा

---

of the idols, one has again to point out the debasement of the human spirit...The play of children is diversifying and innocent, until it interferes with the practical affairs of the grown-ups, and at that point it is peremptorily stopped...Where the play is likely to do harm to the children them selves, the play is immediately interdicted. These are the conditions prevalent in India with regard to the formal worship of the Hindus. It is only under such conditions that one can see one set of devout Hindus defending their faith against another set of Hindus, who are called untouchables, in the case of temple entry. When the full significance of such an episode soaks into one, who has attempted to imbibe the fundamental doctrines of the Gita, the only devout desire, that one can express, is that a reformist movement should start amongst the Hindus, which will smash the idols, and will restore the faith to its fundamental purity." ( 'Gita Explained' by Manu Subhedar, Pages 38 to 43 )

७३१ ते ७६८ इत्यादि ) 'म्हणे पूयगर्त्ते रिगालां । मूत्र रंध्रींनि निगालां । कटारे मियां चाटला । कुच स्वेदु' (ज्ञा. १३–५३८) अशासारखें वर्णन संसाराविषयीं किळस उत्पन्न करून विचारी मनास निश्चितपणें वैराग्योन्मुख करतें. मृत्युलोकींच्या सुखाची अशी अलौकिक कहाणी आहे की येथचा सौंदर्यसम्राट् चंद्र हा क्षयरोगाने पछाडलेला असतो, येथे उदयाचा ग्रास करावयास अस्त टपून बसतो, येथे मांगल्याला अंकूर फुटतांच अमांगल्याची कीड त्याबर पडते, येथे गर्भातून बाहेर पडण्यापूर्वीच मृत्यूचा घाला पडतो आणि बाराव्याच्या जोडीने तेरावा पाळावा लागतो ! गुढ्या तोरणें उभारून वाढदिवस साजरे केले जातात परंतु वाढता दिवस म्हणजे मृत्यूची जवळीक होय हें येथे मुद्दाम विसरतात. बाहेर दुःखाचा बाजार भरला आहे तर आंत ंगळाची आंथरूणें पसरली आहेत ! इहलोकीं नित्य भडकत राहणाऱ्या या दुःखदैन्याच्या वणव्यांतून बाहेर पडावयाची, त्यापासून मुक्ति मिळवावयाची इच्छा कोणास होणार नाही ! प्रत्येकास होणें साहजिक आहे. ही मुक्ति आत्मज्ञानाने मिळते त्याकरिता केवल अद्वैत सिद्धांताचें मर्म कळणें आवश्यक असतें. यच्चयावत् दुःखांचें मूळच नाहीसे होऊन केवल आनंद देणाऱ्या, आत्मप्रकाशाचें केवळ सुखच मिळवून देणाऱ्या जीवन्मुक्तावस्थेचीं चार साधनें ज्ञानेश्वरांनी मानलीं आहेत. **कर्म, भक्ति, (हठ) योग, व ज्ञान हीं तीं चार साधनें होत.**

## ८५ कर्मयोग.

माणसास जिवंत असेंतों कर्म सुटूंच शकत शकत नाही मात्र सत्पुरूष सत्कर्म आणि असत्पुरुष असत्कर्मांत गढलेले असतात. दोघांनाही आपल्या कर्मांनी कांही हेतु साधावयाचा असतो. हेतु, हेतुपूर्तीची आशा, इत्यादिकांमुळे वासनाक्षय होत नाही आणि माणसास मुक्ति मिळत नाही याकरिता, ज्ञानेश्वर म्हणतात की 'सत्क्रियाचि आचरावी। हेतूविण' (ज्ञा. २-२६६) कर्म फलांची आसक्ति न ठेवतां निष्काम होऊन विहित कर्मे करीत गेल्यास चित्तशुद्धि होऊन बुद्धि सम होते. हा कर्म-योग किंवा समत्वबुद्धियोग होय. हा समत्वबुद्धियोग आचरणांत आणावयाची पद्धत वर्णाश्रमधर्मप्राप्त ब्राह्मणक्षत्रियादिकांची विहित कर्तव्यें यज्ञबुद्धीने करीत राहणें ही होय.

ज्ञानदेवांनी कर्म = विश्वोत्पत्ति, अकर्म = निषिद्ध असलेलें, विकर्म = वर्णाश्रमधर्मास विहित असें, स्वकर्म = आत्मज्ञानयुक्त असलेलें असे या चार शब्दांचे शंकराचार्यादि पूर्वाचार्यांनी न केलेले अर्थ स्वतंत्रपणें केले आहेत.[१४२] कर्मे मुळीच न कर-ण्याला संन्यास म्हणतात. वास्तविक संकल्पत्यागाचें एकच तत्त्व संन्यास आणि कर्म योगाच्या मुळाशीं असल्याने दोहोंत कांही भेद नाही.[१४३] कर्मयोग्यास आत्मज्ञान प्राप्त होतें. हा कर्मयोग गीतेंत २, ३, ९, १२, १८ इत्यादि अध्यायांतून सांगितला

---

१४२ पहा 'श्रीज्ञानेश्वरांचें तत्त्वज्ञान' पृष्ठ ५७. १४३ पाहा उदर पृ. २२०

आहे. याचे थोडक्यांत चार प्रकार सांगता येतील. १ वर्णविहित कर्मे स्वधर्मविहित म्हणून आचरीत राहणें; २ अहंकाराचा त्याग करून कर्मे करीत राहणें; ३ फलशात्याग करून कर्मे करीत राहणें आणि ४ प्रत्येक कर्म ब्रह्मार्पण बुद्धीने करणें. डॉ. तुळपुळे म्हणतात, " ज्ञानदेवांनी गीतेच्या आधारें कर्मयोगाचें विवेचन इतकें ठासून केलें आहे की त्यांचें नीतिशास्त्र निवृत्तिपर की प्रवृत्तीपर असा वादच खरोखर उत्पन्न होऊं नये. " ज्ञानेश्वरांनी हा कर्मयोग प्रत्यक्ष व्यवहारांत उतरविलेला त्यांच्या चरित्रांत दिसून येतो आणि "प्राप्तार्थ" (ज्ञा. ३–१५४ ) झालेल्यांनाही ' सकललोकसंस्थेला मार्गाधारें वर्तावयास लावण्याकरिता हा आवश्यक आहे. पारमार्थिक जीवनसोपानाची पहिली पायरी म्हणजे हा कर्मयोग होय.

## ८६ भक्तियोग

सर्वत्र एकच वासुदेव आहे, जें जें भूतमात्र दिसतें तें तें सारे भगवंत होय, अशी जाणीव झाल्यावर ती प्रत्यक्ष अनुभवीत राहणें हें ज्ञानेश्वरांच्या भक्तियोगाचें लक्षण आहे.

### ज्ञानेश्वरीच्या सातव्या अध्यायाचा मुख्य विषय

विज्ञानासह आत्मज्ञान सांगणें हा असून आत्मप्राप्तीकरिता आवश्यक असलेल्या निष्ठायुक्त भक्तीचें महत्त्व अनुषंगाने वर्णिलेलें आहे. भक्ति ही नवविधा[१४४] होय आणि साधारणतः नऊ प्रकारां पैकी

१४४ श्रवण, कीर्तन, स्मरण, पादसेवन, अर्चन, वंदन, दास्य, सख्य, आणि आत्मनिवेदन.

शक्य त्याप्रकाराने इष्टदेवतेची कृपा संपादणारा, तो भक्त होय अशी कल्पना असते. ज्ञानेश्वरांच्या भक्तियोगांत ह्या कल्पनेपेक्षा पुष्कळच व्यापकत्व आहे व तें त्यांनी वर्णिलेल्या चतुर्विध भक्तांचा विचार करतांना आपोआप लक्षांत येऊं लागतें.

## ८७ भक्तांचे चार प्रकार. आर्त, जिज्ञासु, अर्थार्थी, व ज्ञानी.

आर्त, जिज्ञासु, अर्थार्थी, आणि ज्ञानी हे चार प्रकारचे भक्त असून यांत ज्ञानी भक्त हाच "मला अत्यंत प्रिय असतो" [श्लोक १७] एवढेंच काय पण "ज्ञानीभक्त केवळ माझा आत्माच होय" [श्लोक १८] असें भगवान् पुढे म्हणतात. गीतेंतील प्रस्तुत अध्यायांत 'एक भक्तिः' [श्लोक १७] किंवा 'वासुदेवः' [श्लोक १९] इत्यादि जीं पदें आलीं आहेत तीं भागवतधर्मांतील आहेत किंबहुना येथील सारेंच वर्णन भागवत धर्मांतलेंच आहे. कारण महाभारतांत [शांतिपर्व ३४१] चतुर्विध भक्तांचा उल्लेख केल्यावर पहिले तीन भक्त हेतुतः भक्ति करणारे म्हणून ते च्यवनशील, व चवथ्या प्रकारचे भक्त हे एकांती प्रतिबुद्ध म्हणून श्रेष्ठ [सर्वे च्यवनधर्मास्ते प्रतिबुद्धस्तु श्रेष्ठ भक्] असें म्हटलें आहे. तसेंच सर्व भूतांचें ठायीं वास करणारा म्हणून मला वासुदेव म्हणतात अशी वासुदेव शब्दाची व्युत्पत्ति दिली आहे.[१४५]

---

१४५ पहा– सर्वभूताधिवासश्च वासुदेवस्ततो ह्यहम्. महाभारत शांतिपर्व, ३४१,–४० किंवा गीतारहस्य पृ. ७२०, ७२१, किंवा गीतारहस्य प्रकरण १३ वें.

## ८८ वामन पंडितांचें मत.

वामनपंडितांच्या मतें, सकाम भक्त, निष्काम भक्त आणि केवळ 'आत्माराम' झालेले असे भक्ताचे प्रकार तीन. त्यांत आर्त, आणि अर्थार्थी हे दोघे सकाम भक्त होत, जिज्ञासु हा निष्काम भक्त, आणि ज्ञानी हा केवळ आत्माराम झालेला भक्त होय. "त्रिविधांत ऐसे चतुर्विध ॥" [ यथार्थ दीपिका ७-५७४]

आर्त म्हणजे रोगग्रस्त, पीडेने, व्याधीने ग्रस्त किंवा तत्समान संकटांत सांपडल्याने अनिष्टनिवृत्त्यर्थ ईश्वरास शरण गेलेला. जसें, आर्त गजेंद्र नक्रें धरिला । त्याने धांवा माझाच केला । म्यां त्यास मोक्षही दिधला । सोडवूनि नक्रातें ॥ वामन पंडित य. दी. ७ –६९१ ॥ अर्थार्थी म्हणजे, अर्थाची, संपत्तीची किंवा तत्समान कामादि इतर भोगसाधनांची इच्छा करणारा व इष्ट प्राप्त्यर्थ शरण गेलेला. मज गोपिका कामेंचि भजल्या । माझ्या सौंदर्यावरीच रिझल्या । सुरतलालसनेचि भिजल्या । माझिया प्रेमरसें ॥ सदर ६९२ ॥. जिज्ञासु म्हणजे 'जिज्ञासु म्हणावें त्याला । कीं तत्त्व जाणावयाची इच्छा ज्याला । तो भजतो भक्तीने मला । कीं मुकुंदा, कळों दे हें तुझें तत्त्व ॥ सदर ५८३ ॥ चवथा भक्त केवळ अपरोक्षानुभव संपन्न असा महात्मा होय.

## ८९ एकनाथांचें मत.

आर्त म्हणजे भगवद्प्राप्तीची व्यथा असलेला, व अर्थार्थी

म्हणजे भगवंतरूप सर्वश्रेष्ठ अर्थ इच्छिणारा असे एकनाथांचे अर्थ आहेत'[१४६] वामनपंडितादि जुन्या टीकाकारांचे वरील अर्थ आधुनिक संततुल्य राजकारणी विभूतींनी अधिक व्यापक केले आहेत तेही, येथे लक्षांत ठेवावयास हवेत.

## ९० पूज्य विनोबाजी भावे यांचें मत.

" भगवंतांनी भक्तांचे तीन प्रकार सांगितले. (१) सकाम भक्ति करणारा, (२) निष्काम परंतु एकांगी भक्ति करणारा (३) ज्ञानी म्हणजे संपूर्ण भक्ति करणारा. निष्काम परंतु एकांगी भक्ति करणाऱ्यांत पुन्हा तीन प्रकार आहेत : १ आर्त, २ जिज्ञासु, ३ अर्थार्थी..... सकाम भक्ति करणारा म्हणजे.... कांही इच्छा मनांत ठेवून देवाकडे जाणारा ... आर्त म्हणजे ओलावा पाहणारा, देवासाठीं रडणारा....त्याचें प्रेम केव्हा मिळेल, त्याला मिठी केव्हा मारीन....अशी तगमग असणारा. प्रत्येक कार्यांत हा भक्त जिव्हाळा आहे की नाही, प्रेम आहे की नाही या भावनेने पाहील. **खादीचें काम करणाऱ्यास त्यांत प्रेम वाटलें नाही तर तो भक्त नसून हमाल झाला.** दुसरी तऱ्हा जिज्ञासूंची. ही तऱ्हा आपल्या देशांत फारशी नाही. कोणी गौरीशंकर पुन्हा पुन्हा

---

१४६ पहा – पांगारकर – नारदभक्तिसूत्र पृ. ६२, ६३, किंवा पेंडसे – 'श्रीज्ञानेश्वरांचे तत्त्वज्ञान' पृ. २२४

पडतील व मरतील, कोणी उत्तरध्रुवाच्या शोधार्थ जातील .... जिज्ञासु भक्ताजवळ अदम्य जिज्ञासा असते, प्रत्येक वस्तूतील गुणधर्म तो शोधतो....तिसरी तऱ्हा अर्थार्थीची.... म्हणजे प्रत्येक गोष्टींत अर्थ पाहणारा. **अर्थ म्हणजे पैसा नव्हे.** अर्थ म्हणजे हित, कल्याण. कोणत्याही गोष्टीची परीक्षा करतांना 'याने समाजाचें कल्याण काय होईल' ही कसोटी तो लावील. माझें लेखन, भाषण, सारें कर्म जगाच्या मंगलासाठी आहे की नाही हें तो बघेल .... ज्ञानाच्या दृष्टीने सर्व क्रियांकडे पाहणारा तो जिज्ञासु व सर्वांच्या कल्याणाच्या दृष्टीने पाहणारा तो अर्थार्थी. हे तीनही भक्त निष्काम परंतु एकांगी. एक कर्मद्वारा, एक हृदयद्वारा, एक बुद्धिद्वारा, असे देवाकडे येतात ....उरला प्रकार पूर्ण भक्ताचा. यालाच ज्ञानी भक्त म्हणावयाचें. या भक्ताला दिसेल तें सारे देवाचेंच रूप. कुरूप-सुरूप, रावरंक, स्त्रीपुरुष, पशुपक्षी—सर्वच परमात्म्याचें पावन दर्शन, 'नर नारि बाळें अवघा नारायण। ऐसें माझें मन करीं देवा ॥' अशी तुकाराम महाराजांची प्रार्थना आहे....त्याला कांहीही भेटो, कीडा मुंगीपासून तो चंद्र सूर्यापर्यंत....एकच परमात्मा सर्वत्र नटलेला आहे हें पाहण्याचा ज्ञानी भक्ताचा अभ्यास चालूं असतो. असें करतां करतां एक दिवस तो पूर्ण भक्त होतो."[१४७]

---

१४७ विनोबाजी भावे – गीताप्रवचन पृ. ७७ ते ८२

## ९१ कै. सानेगुरुजी यांचें मत.

गुरुजी म्हणतात, 'आपल्यासारखेच दुसरे आहेत ही जी एक भावना तिच्या पोटीं भक्तीचा जन्म आहे. आर्त म्हणजे दुसऱ्याच्या दुःखाने दुःखी होणारा. **केवळ स्वतःच्या दुःखाने विव्हळ होऊन परमेश्वरास हाका मारणारा तो आर्त भक्त नव्हे.**' [ या न्यायाने गजेंद्र मोक्षाच्या कथेंतील गजेंद्र आणि तत्समान इतर 'आर्त' भक्त **हे भक्तच** नाहीत ! ! ] '......तेही एक प्रकारें आर्त भक्तच. **परंतु गीतेंतील आर्तभक्त तो हा नव्हे.** गीतेंतील आर्तभक्त उदार आहे. तो स्वतःच्या दुःखाने दुःखी नसून दुसऱ्याचें दुःख पाहून दुःखी झालेला आहे. समर्थ रामदास स्वामी लहानपणीं घरांत कोठे तरी लपले होते. आठ दहा वर्षांचे वय परंतु आजूबाजूचे अपरंपार दुःख व दैन्य पाहून त्यांचें हृदय जणु पिळवटून गेलें. बाळ कोठे गेला म्हणून आई धुंडीत होती. शेवटीं खोलींत एका कोपऱ्यांत बाळ आढळला. आई म्हणाली, "वेड्या, येथे अंधारांत काय करतोस ?" तो उदार मनाचा बाळ म्हणाला, "आई, चिंता करितो विश्वाची." समर्थ बालवयांत विश्वाची चिंता करूं लागले. सर्वांना सुखी कसें करतां येईल याची विवंचना करूं लागले. ती आर्तभक्ति होती. ....अशा आर्तभक्तींतूनच जिज्ञासु-भक्ति उत्पन्न होते.... जगांत दुःख आहे, अन्याय आहे, विषमता आहे, रोग आहेत.... हे रोग कां होतात याची चर्चा तो करूं लागतो, तो संशोधक

होतो .... प्रयोग करूं लागतो. हे जिज्ञासु भक्त आपल्याकडे फार झाले नाहीत. पाश्चिमात्यांत असे भक्त फार झाले .... कोणी ध्रुवावर जातात, तेथे संशोधन करतात .... मानवी सुखांत कशी भर घालतां येईल याचे कोणी प्रयोग चालवितात. हे सारे जिज्ञासु भक्त होत .... जिज्ञासा आपणांस अनेक मार्ग दाखविते ... दिसलेल्या अनेक मार्गांतील खरा मार्ग कोणता याचा विचार करणारा तो अर्थार्थी भक्त. **अर्थार्थी भक्त म्हणजे पैसा मागणारा नव्हे** ....कशांत अर्थ आहे तें पाहणारा. आज जगांत अनेक वाद आहेत. गांधिवाद आहे, समाजवाद आहे, साम्राज्यवाद आहे .... कोणत्या मार्गाने गेलें तर ....सर्वांना विश्रांति मिळेल, ज्ञान मिळेल, कलानंद चाखतां येईल असा विचार मनांत येऊन आपण मार्गसंशोधन करतो. कोणता तरी मार्ग आपण पत्करतो ... तें जें निश्चित ज्ञान होतें त्या ज्ञानाला आपण वरतो, म्हणजेच ज्ञानीभक्त आपण होतों. ज्ञानी म्हणजे जें ज्ञान झालें तें पदोपदीं जीवनांत आणूं पाहणारा.... जें ज्ञान झालें त्या दिशेने जीवन सारखे नेणें म्हणजे ज्ञानी भक्त होणें होय .... जन्म त्या ध्येयासाठी .... ध्येयाशीं, मिळा-लेल्या ज्ञानाशीं लग्न लागलेला तो ज्ञानी भक्त होय.'[१४८]

## ९२ विनोबाजी आणि के. गुरुजी यांचे 'जिज्ञासु' भक्तीचे अर्थ.

आचार्य विनोबा आणि सानेगुरुजी यांचे अर्थ, त्यांतल्या

---

१४८– पां. स. साने – गीताहृदय पृ. ३४ ते ३७.

त्यांत गुरुजींचे अर्थ तर अधिकच प्रवृत्तिपर वाटतात. विनोबाजींनी 'आर्त' चा अर्थ एकनाथाप्रमाणेच केलेला दिसतो, वास्तविक तसा तो नाही असें वामनपंडित ठामपणाने म्हणतात.[१४९] स्वतः ज्ञानेश्वरांनी स्पष्ट अर्थ केलेला नसल्याने व अधिकस्याधिकम् फलम् या न्यायाने विनोबाजींचा व्यापक अर्थ अधिकच चांगला ठरतो मात्र त्यांच्याच प्रवचनाधारें लिहिलेल्या साने गुरुजींच्या 'गीता हृदय' मध्यें केलेल्या विवेचनांत अतिक्रम झालेला दिसतो. "केवळ स्वतःच्या दुःखाने विव्हळ होऊन परमेश्वरास हाक मारणारा आर्त भक्त नव्हे" किंवा याहीपुढे जाऊन "**गीतेंतील आर्त-भक्त तो हा नव्हे" म्हणणें युक्त दिसत नाही.** 'उदाराः सर्व एवैते' ( गीता ७-१८ ) असें पुढे म्हटलें असल्याने असा अर्थ काढलेला दिसतो. उदार म्हणजे श्रेष्ठ, उत्कृष्ट प्रामाणिक, दानशूर इत्यादि. हे सर्व भक्त 'भले' आहेत असे ज्ञानेश म्हणतात, आणि 'उत्कृष्ट' आहेत असें वामनपंडित म्हणतात. पंडित त्याचें कारण सांगतात की १५व्या श्लोकांतील 'नराधम' 'मूढ' अशा लोकांच्या अपेक्षेने हे 'सुकृति' होत, आणि यांच्या सुकृताने, मला भजण्याची प्रवृत्ति यांच्यात होते. अशा सकाम भक्तींतून पुढे निष्कामता संभवूं शकते. विनोबा म्हणतात, 'पुष्कळ लोक मान मिळावा म्हणून सार्वजनिक सेवेंत पडतात. बिघडलें कोठे ? तुम्ही त्यांना

---

१४९ – पहा यथार्थदीपिका ७ –५७९ ते ५८२

मान द्या. चांगला मान द्या. असा मान मिळत गेल्याने पुढे सार्वजनिक कामांत ते स्थिर होतील....

बायको घरीं नाही म्हणून रडणारे पुष्कळ आहेत, परंतु देवाजवळ रडणारा भक्त सकाम असला तरी असामान्य आहे.... प्रथम कामनेने.... पुढे निष्काम"[१५०] एवंच सकाम भक्ति वाईट नाही, फक्त जगापुढे तोंड वेंगाडण्यापेक्षा जगदीशापुढे तोंड वेंगाडणारा आज ना उद्या वरच्यापायरीवर चढत जाईल, हीच सूचना ज्ञानेश्वरांनी 'जिहीं आतमहीत केलें वाढतें गा' यांत वाढता क्रम सांगून केली आहे. शिवाय त्यावरून हे चारही भक्त ऐहिकतानिरपेक्ष आत्महिताकडे वळलेले स्पष्टच समजावयास हवेत, आणि त्या अर्थी विनोबाजी, आणि साने गुरुजी या दोघांनी 'जिज्ञासु' भक्तींचें केलेलें विवरण पन्नास टक्के ऐहिक वाटतें. पन्नास टक्के म्हणावयाचें कारण असें की, भौतिक शास्त्रज्ञांचें संशोधन जर केवळ भूतदयेनेच प्रेरित होऊन होत असतें किंवा "जगाच्या कल्याणा। संतांच्या विभूति। देह कष्टविती। उपकारें" एवढ्याच भावनेने हे शास्त्रज्ञ जर प्रेरित होत असतील तर ती जिज्ञासा एका दृष्टीने शंभर टक्के म्हणतां येईल, परंतु तशी ती नसते. उलट लोकेषणेने सृजिलेली व इहामुत्रफल यांनी संमिश्र असते, म्हणून ज्ञानेशांना ती अभिप्रेत वाटत नाही. निष्काम ब्रह्मजिज्ञासाच त्यांना अभिप्रेत आहे. शम, दम, तितिक्षादि गुणां

---

१५० गीता-प्रवचनें पृ. ७७ - ७९

बरोबरच इहामुत्रार्थफलविराग ब्रह्मजिज्ञासेस आवश्यक असतो. अशी जिज्ञासा असलेले मोठे मोठे महर्षि आपणांकडे होऊन गेले आहेत.

## ९३ भारतांतील ब्रह्मजिज्ञासा आणि जिज्ञासु भक्तांची परंपरा.

अखिल विश्वांतील ब्रह्मजिज्ञासेचें आदिपीठ भारत आहे. सर्व साधारण मानवी जीवन अत्यंत समृद्ध, वर्धिष्णु आणि जयिष्णु असलेल्या वैदिक काळांतही भारतांतील आर्यांना ऐहिक जीवनाची इतिकर्तव्यता कशांत आहे हें शोधण्याची जिज्ञासा होती हेंच ऋग्वेद मंडलांतील [१५१] नासदीय सूक्तावरून सिद्ध होतें. जगांतील श्रेष्ठ तत्त्वज्ञांनी गौरविलेलें, आदरिलेलें किंबहुना, साऱ्या जगांतील आध्यात्मिक जिज्ञासेच्या पितृस्थानीं शोभणारें हें सूक्त आर्यांच्या ऋग्वेदांत असतांना भगवंतांनी उल्लेखिलेली जिज्ञासु भक्ति आपणांकडे फारशी आढळत नाही हें म्हणणें रास्त होईल काय? समृद्धिच्या शिखरावर असलेल्या ह्याच आर्यावर्तांत समृद्धीची, सुखदुःखाची जन्ममरणाची, सृष्टीच्या आद्यंताची, उभारणीची, संहारणीची, सृष्ट्युत्पत्ति करविणाऱ्या आद्य तत्त्वाची, त्याच्या अनुभवगम्य स्वरूपाची चिकित्सा करण्यांत तत्कालीन ऋषींनी आयुष्येचीं आयुष्यें जिज्ञासेच्या वेदीवर अर्पिलीं आहेत! ऐहिक ऐश्वर्याच्या परिपूर्णतेंत उन्मत्त न होतां, त्या ऐश्वर्य गंगेची गंगोत्रीच काय पण मानससरोवरही शोधण्याची त्यांनी पराकाष्ठा केली

---

१५१ मंडल १० सूक्त १२९, गीतारहस्य २४८

आहे. अंतर्मुख दृष्टि करून जीवन, जगत्, आणि जगदीश्वर यांच्या परस्पर संबधांचा साक्षात्कार अनुभवून, मानवाच्या अंतिम ध्येयाचा प्रश्न सोडविला असा त्यांनीच ! तो सोडवून जगांतील अमर, अविनाशी असें तत्त्वज्ञान, जन्माला घातलें त्यांनीच ! त्यांच्या या शोधांनाच उपनिषदें म्हणतात. याच उपनिषदांच्या गांभिर्याने महत्तेने, ब्राह्मीस्थितींतील विदेहावस्था प्राप्त करून देण्याच्या सामर्थ्याने, दिपून जाऊन शोपेनेहारसारखे विश्वकीर्तीचे पाश्चात्य तत्त्वज्ञानी उद्गार काढतात " In the whole world, there is no study, except that of the originals so beneficial, and so elevating as that of the Oupnekhat (उपनिषद्) It has been the solace of my life, it will be the solace of my death."

## ९४ परंपरा अद्यापि जिवंत आहे.

ऋग्वेदांतील सूक्तें किंवा उपनिषदादि ग्रंथांतील ऋचांचें रचयिते हे सारेच मंत्रद्रष्टे ऋषि होते आणि केवळ अकृत्रिम, निष्काम जिज्ञासेच्या पोटीं तत्त्वज्ञानाचे शोध घेण्याची परंपराच त्यांच्यामुळे निर्माण झाली आहे. भगवान् परमेष्ठि[१५२] भगवान् वसिष्ठ, गृत्समद, अश्वलायन, भगवती गार्गी वाचक्नवी, भगवती सुलभा मैत्रेयी, स्वयंप्रभा, शाण्डिली आदि तपस्वी ऋषिवर्ग व तपस्विनी स्त्रिया जिज्ञासु भक्त होत. मधल्या काळांतील भगवान्

१५२ सर्वानुक्रमणिकेप्रमाणे नासदीय सूक्ताचा कर्ता, पहा गीतारहस्य २४९

बुद्ध, भगवान् महावीर हेही जिज्ञासु भक्त झाल्याशिवाय कांहीं ज्ञानीभक्त होऊं शकले नाहीत हें उघड आहे. नंतरच्या काळांत श्रीमदाद्यशंकराचार्य, रामानुजाचार्य, वल्लभाचार्य, यांनी ही परंपरेची साखळी तुटूं दिली नाही. आधुनिक काळांत, रामकृष्ण परमहंस, स्वामी विवेकानंद, महर्षि अरविंद घोष ह्यांनी आपल्या तपश्चर्येने त्या परंपरेचा प्रभाव तसाच जागता ठेवला आहे हें निर्विवाद होय. वर जिज्ञासु भक्त म्हणून उल्लेखिलेल्यांतील बहुतेक ज्ञानी भक्त म्हणून गौरविले जाणेंच योग्य परंतु जिज्ञासूपणाची पायरी त्यांना केव्हां तरी पूर्वी चढावी लागलीच होती ना ! असो.

## ९५ ज्ञानेश्वरांचा ज्ञानी भक्त

ज्ञानेशांनाही आर्त, जिज्ञासु, अर्थार्थी, आणि ज्ञानी हे भक्त उत्तरोत्तर क्रमाने 'चाडेंने आत्महित' करणारे वाटतात हें वर उघड केलेंच आहे. 'अर्थार्थी' चा विनोबाजींनी सांगितलेला व्यापक अर्थ मूळार्थाला जोडून घ्यावयास हरकत नाही. ज्ञानी भक्त म्हणजे, अहंब्रह्मास्मिचें ज्ञान झाल्या-वरही जो भक्ति करीत राहतो तो. याठिकाणीं भक्ति ज्याची करावयाची तो कोणी वेगळा नसतो किंवा 'भक्ति' ही क्रियाही कांहीं वेगळी नसते, तर 'समः सर्वेषु भूतेषु' [ गीता १८-५४ ] किंवा 'हें समस्तही श्री वासुदेवो ऐसेया प्रतीतिरसाचा उते भाऊ । (ज्ञा. ७·१३३) अशी भक्ताची स्थिति झालेली असते. एकनाथही ज्ञानीभक्ताचें हेंच लक्षण सांगतात. 'चौथे भक्तीचे विंदान । भोग्य भोक्ता स्वयें श्रीकृष्ण । कृष्णासी वेगळेपण ।

भक्तां अर्धक्षण असेना ॥[१५३] भेदांचें कडवसें' (ज्ञा. ७-१०९) फिटल्याने जो 'मीचि जाला समरसे' (ज्ञा.७-१०९) किंबहुना 'चराचर। आपण जाला' (ज्ञा. ९-२११) तो ज्ञानी भक्त होय, त्याची भक्ति म्हणजे सर्व दूर एकत्वाचा साक्षात्कार घडणें होय. हा ज्ञानी, भक्ति करतो म्हणजे ईश्वरापासून वेगळा असतो असें समजावयाचें नाही, कारण भज–सेवायाम् –सेवा करणें हा यौगिक अर्थ येथे न घेतां ईश्वरसेवा म्हणजे ईश्वरस्वरूप बनणें असा अर्थ घ्यावयाचा आहे. "ज्ञानेश्वर ज्ञानानंतरही भक्ति मानतात असें दिसतें, यामुळे व भक्तीचा नेहमीचा अर्थ साधन ह्या नात्याचाच परिचयाचा असल्यामुळे या ज्ञानोत्तरभक्तीसंबंधीं प्रारंभीं नीट कल्पना येत नाही. ध्याता-ध्येय-ध्यानात्मक त्रिपुटी भक्तीला आवश्यक असल्यामुळे ही चौथी भक्ति अद्वैताला बाधक आहे की काय अशी शंकाही येते .... इतर भक्तीच्या अपेक्षेने हिला चौथी किंवा पराभक्ति म्हणावयाचें, वस्तुत: ही परमेश्वराची सहजस्थिति आहे. ज्ञान झाल्यानंतर, अद्वैताचा अनुभव आल्यानंतर जो सर्वत्र सर्वदा अद्वैतच पाहतो, अज्ञानी जीवांनी जेथे नामरूपांचे द्वैत व भिन्नत्व दिसतें, तेथे जो मूळचें अद्वैत पाहतो, हें सर्व वासुदेवच आहे अशा अन्वयप्रकाराने परतत्त्वांत जो रंगून गेलेला असतो अशा ज्ञाननिष्ठाच्या सहजस्थितीलाच पराभक्ति, ज्ञानोत्तरभक्ति असें नांव दिलें आहे आणि द्वैतांतील वास्तविक अद्वैत सर्वदा अनुभवणारा हा ज्ञानीभक्त सर्वश्रेष्ठ व ईश्वराला

---

१५३ पहा नाथभागवत ३१-३६३

अत्यंत प्रिय असल्याचें सांगितलें आहे" [154] व तरि "तेयातें मी माथां । मुकुट करीं ॥" ज्ञा. ९-२१२ हे उद्गार याचेच वाचक आहेत. सामान्यलोक जगाकडे त्याच्या नामरूपात्मक स्वरूपानें पाहतात, तर ज्ञानी--भक्त जगाकडे त्याच्या खऱ्या मूळच्या परमात्मस्वरूपानें पाहतो. ज्ञान्याला भक्त म्हणण्यामध्ये भक्तींतील द्वैताचा निषेध करावयाचा आहे ........

मज शरण रिगिजे । आणि जीवत्वें आसिजे ।
धिगी बोलिया या न लजे । प्रज्ञा केंवि ॥

ज्ञा. १८-१३९३ [155] असें ज्ञानदेव विचारतात. भक्तीचा महिमा गाण्याचें एक दुसरेंही कारण आहे. धर्मग्रंथांत श्रेष्ठग्रंथ वेद, परंतु त्या वेदाचें पठण सर्व वर्णीयांना करावयाची परवानगी नाही. अर्थात वेदांमधील हें उणें दूर करण्याकरितांच जणु काय [ ज्ञा. १८-१४४९ ] अवतरलेल्या गीतेंतून स्त्रिया, वैश्य, शूद्रादिकांनाही [ गीता ९-३२ ] मुक्तीचें हें एकच मुक्तद्वार खुलें आहे, म्हणूनच एरवीं इतर साधनें प्राप्त करून घेण्याची पात्रता असलेल्या अर्जुनालाही इंगळांच्या आंथरुणाची भयावह कहाणी सांगितल्यावर श्रीकृष्णानें आवर्जून म्हटलें, कीं, अर्जुना !

तऱ्हीं झडझडौनि वहिला निग । इये भक्तीचिये वाटे लाग ।
जीया पावसी अव्यंग । निजधाम माझें ॥ ज्ञा. ९—५११

## ९६ हठयोग.

मनाला विषयांपासून परावृत्त करून भ्रूमध्यावर दृष्टि ठेवून

---

१५४ पेंडसे-श्रीज्ञानेश्वरांचें तत्त्वज्ञान पृ. २२८, २२९. १५५ सदर पृ. २२९

प्राणापान सम करून मनाचा लय अव्यक्तांत करावयाची पद्धति हठयोगांत सांगितली आहे. (ज्ञा. ५-१५० ते १५९) भक्तीच्या साधनांत ईश्वरकृपेवर अधिक भिस्त असते तर योगाच्या साधनांत स्वावलंबनावर अधिक भर देतात. ध्यानयोगांत हठयोगांतील काठिण्य बाद करण्यांत येते. हठयोगाची प्रक्रिया हठयोग प्रदीपिका आणि पातंजल योगसूत्रांतून वर्णिलेली आहे. ज्ञानेश्वरांच्या नाथपंथांत या योगमार्गास बरेंच महत्व असल्याने त्यांच्या ज्ञानेश्वरींतही त्यास उचित स्थान प्राप्त झालें आहे. गीतेंतील शब्दांचा भावार्थ सांगतांना कित्येक ठिकाणीं शंकराचार्यांना अभिप्रेत नसलेले पातंजलयोगपर अर्थ ज्ञानेश्वर देतात. सहावा अध्याय तर केवळ पातंजल योग वर्णनाकरिताच त्यांनी रचिलेला आहे. मूळ गीतेंत कुंडलिनी जागृतीचा उल्लेखही नसतांना सहाव्या अध्यायांत कुंडलिनी जागृति, षट्चक्रभेदन आदि विषयांचे सविस्तर वर्णन केलें आहे. ज्ञानेश्वर हठयोगास राजयोग असें संबोधितात आणि या पंथाला 'पंथराजु' अशी संज्ञा देतात. शिवाय योगासारखें सोपें कांहीच नाही ( ज्ञा. ६-३६३ ) असेंही ते म्हणतात, आणि आगा योगी जो म्हणिजे। तो देवांचा देओ जाणिजे। (ज्ञा. ६-४८०) असें त्याचें महत्व वर्णितात, यावरून त्या मार्गाविषयींचा ज्ञानेश्वरांचा प्रेमादरभाव लक्षांत येतो, परंतु योगमार्गाचें सोपेंपण सर्वांनाच अनुभवावयास मिळत नाही, त्याकरिता अनंत क्लेश सोसावयाची तयारी पाहिजे, कारण भ्रतारामागे करावयाचा हा अग्निप्रवेशच आहे, किंवा यमराजाबरोबर खेळावयाची झुंज आहे. ( ज्ञा. १२-६६, ६७ ) असा इषारा त्यांनी इतरत्र दिला आहे.

## १७ ज्ञानयोग.

जीव, जगत् आणि परब्रह्म यांची यथार्थ माहिती शास्त्रांच्या अभ्यासाने आणि गुरुमुखाने करून घेऊन त्यावरून ब्रह्मैक्य जाणणें आणि जाणल्यावर अनुभविणें हा ज्ञानयोग होय. या ज्ञानाचे भेद साधनज्ञान आणि सिद्धज्ञान असे क्रमानुसार दोन आहेत. सद्गुरुश्रवण आणि शास्त्राभ्यास यांवरून करावयाचा बुद्धि निर्णय म्हणजे साधनज्ञान आणि त्या निश्चयाचा अनुभव घेणें हें सिद्धज्ञान होय. ज्ञानेश्वरींत सिद्धज्ञानाचेंच वर्णन अधिक आहे.

गीताशास्त्र हे ज्ञानप्रधान शास्त्र आहे (ज्ञा. १८-१४२६) ज्ञान हें निरुपमेय आहे. (ज्ञा. ४-१८१) 'कर्म, भक्ति, किंवा योग कोणत्याही साधनांचा अवलंब केला तरी ज्ञानाशिवाय मोक्ष नसल्यामुळे व या सर्व साधनांचें पर्यवसान ज्ञानांतच होत असल्यामुळे ज्ञान हें मोक्षाचें अंतरंग साधन आहे असें ज्ञानेशांनी म्हटलें आहे.'[१५६] वर भक्तियोगाचें वर्णन करीत असतां चवथ्या ज्ञानीभक्ताला 'ज्ञान' आणि 'भक्ति' दोहोंची आवश्यकता कशी असते याचा सविस्तर विचार केला आहे, तसेंच 'भक्ति' मध्ये एरवी सूचित होणारे द्वैत आणि आंधळें प्रतिमाप्रेम या दोहोंचेंही अस्तित्व ज्ञानेश्वरांना ज्ञानभक्तींत किंवा ज्ञानोत्तर भक्तींत अभिमत नाही हेंही तेथे उघड झालें आहे.

---

१५६ पहा—'ज्ञानेश्वरांचें तत्त्वज्ञान' पृष्ठ १२६.

म्हणून अद्वैतानुभव, ज्ञानभक्ति, ज्ञानोत्तरभक्ति, पराभक्ति हे सारे शब्द समानार्थक आहेत एवढेंच येथे लक्षांत ठेवावें. याचें शाब्दिक विवेचन कितीही केलें तरी तें अपुरेंच पडणार कारण **'हें अनुभवाजोगे, नोहे। बोला ऐसें'** ॥ज्ञा. १८-११४५॥

## ९८ ज्ञानदेवांचें नीतिशास्त्र

### (अ) अध्यात्माच्या पायावर.

डॉ. तुळपुळे म्हणतात, " अद्वैत हा ज्याप्रमाणे ज्ञानदेवांच्या तत्त्वज्ञानाचा, त्याप्रमाणे अध्यात्म हा त्यांच्या नीतिशास्त्राचा पाया आहे. या नीतिशास्त्रांत इंद्रियजन्य सुखास यत्किंचितही वाव नसून अतिंद्रिय सुखाची कल्पना दृष्टीसमोर ठेऊन ज्ञानदेव नीतिमीमांसा करीत आहेत....ही मीमांसा इतकी सूक्ष्म, स्पष्ट आणि अचूक आहे की ती पाहून ज्ञानदेव हे सर्वश्रेष्ठ नीति-मीमांसक होत यांत कांहीच शंका उरत नाही."[१५७] गीतेंत १३ व १६ या अध्यायांतून ज्ञानलक्षणें व दैवी उत्पत्तींचें विवेचन आहे. या विवेचनांत अमानित्व, अदंभित्व, अहिंसा, शांति, आर्जव, आचार्योपासन आदि विशेषांचें वर्णन बहारीने करण्यांत आलेलें आहे. 'इया करणी की चेष्टा' असले उपरोधिक प्रश्न विचारून अहिंसेचें सूक्ष्म विवेचन केलें आहे.

---

१५७ 'पांच संतकवी' पृ. ५४

## (आ) गुरुभक्तींतील रहस्य.

आचार्योपासना हा तर त्यांचा जिव्हाळ्याचा विषय. अध्यायाअध्यायांतून उपोद्घात–उपसंहाराच्या प्रसंगीं किंवा इतरत्र श्री सद्गुरु निवृत्ताविषयींचा नितांत आदरभाव वर्णन केलेला आहे. मात्र हा आदरभाव आंधळा नाही. हृदयीं सद्गुरु असल्याने 'विशेषें मती आदरू विवेकावरि' (ज्ञा. १-२२) अशी त्यांची श्रद्धा आहे. सद्गुरुकृपेच्या जोरावर, 'बोलीं अरूपाचें रूप दाविन। अतींद्रिय परि भोगवीन इंद्रियां करवीं ॥ ज्ञा. ६-३६ ॥ अशी ते प्रतिज्ञा करतात. 'मऱ्हाटियच्या नगरी' ब्रह्मविद्येचा सुकाळ करण्याची (ज्ञा. १२-१६) सद्गुरुदृष्टिरूप 'श्रीमंत' 'अंब' (ज्ञा. १२-१०) जवळ ते प्रार्थना करतात. विश्वाभास मावळवून अद्वैतकमलिनीचा विकास करणारा ज्ञानमार्तंड किंवा 'चित्सूर्य' (ज्ञा. १६-१, १६) अशा आचार्यांच्या उपासनेचा विषय पुढे येतांच त्यांची वाणी बहरली, आणि विहिणीच्या आर्त आवेगाने (ज्ञा. १३-३७५) अंतःकरणाचा पाट फोडून निघालेल्या त्यांच्या वक्तृत्वनर्मदेला सहस्रधारांची अपूर्व शोभा प्राप्त झाली. गुरूचें आसन, गुरूच्या पादुका, गुरूचें छत्रचामर, गुरूचें भवन, भवनाचें द्वार, द्वारावरचा द्वारपाळ सर्व कांही आपणच व्हावेंसें त्यांना वाटतें[१५८] हृदयशुद्धीच्या आवारांत, आनंदाच्या राउळांत श्रीगुरु लिंगावर ध्यानामृताचा त्यांनी केलेला अभिषेक[१५९] केवळ

१५८ गीता १३-७ वरील विस्तृत टीका पहा. १५९ पहा वदर.

अपूर्व आहे, आणि हें सारें कां तर श्रीसद्गुरु निवृत्ती करिता. जगांत निवृत्तिसारखें सुख दुसरें नाही. लौकिक किंवा अलौकिक ज्ञानाचे ईश्वर झाले तरी निवृत्तिरूप 'सद्गुरु वांचोनी सापडेना सोय' हेंच त्रिकालाबाधित सत्य ज्ञानेश्वरांचें चरित्र आणि ज्ञानेश्वरीची चर्चा आपणांस सांगत आहे.

### (अ) निवृत्ति म्हणजे कर्मासक्तिसंन्यास.

जगाच्या प्रवृत्तींत सुखाचा प्रसार आणि दुःखाचा निरास ह्याच दोन गोष्टीना प्राधान्य आहे. सुख म्हणजे अनुकूल वेदना आणि दुःख म्हणजे प्रतिकूल वेदना अशी सुटसुटीत व्याख्या[१६०] करतां येते. सृष्टींतील बाह्य पदार्थाचा मनुष्याच्या इंद्रियांशी संयोग झाल्याने ह्या वेदना होऊं लागतात[१६१] तसेंच इंद्रियें आणि शब्दस्पर्शादि संयोगाचे विषय यांच्या मधील रुचि किंवा अरुचि हीं जन्मसिद्ध असल्याने[१६२] माणसांची प्रवृत्ति या इंद्रियांना रुचकर वाटेल तें प्राप्त करून घेण्याकडे वाढूं लागते व अशा रीतीने आपण 'इंद्रियांची दीनें' म्हणजे गुलाम होऊं लागतो, व त्याकरिता राजस-तामस प्रकृतीची माणसें नको त्या गोष्टीही

---

१६० नैय्यायिकांची व्याख्या अशी—'अनुकूलवेदनीयम् सुखम् प्रतिकूलवेदनीयम् दुःखम्.' १६१ 'मात्रास्पर्शास्तु कौंतेय शीतोष्णसुखदुःखदः' गीता २–१४ १६२ 'इन्द्रियस्येन्द्रियस्यार्थे रागद्वेषौ व्यवस्थितौ, गीता ३–३४

करतात. कारण 'अभ्यासाची चरटी करून यमनियमांची ताटी लावणारे योगीही या विषयांमुळें पतन पावतात. (ज्ञा. २-३११-(३१२) असा हा इंद्रियग्राम बलवान आहे.[१६३] येथेंच आत्मसंयमन किंवा इंद्रियदमन आवश्यक ठरतें. कारण विषयोपभोगाने विषयांचा उपशम होत नाही[१६४] असा अनुभवजन्य सिद्धांत आहे. या इंद्रियदमनाची शिकवण सबंध ज्ञानेश्वरींत ठिकठिकाणीं आढळतें. विषयध्यासाने होणाऱ्या सर्वनाशापासून[१६५] वाचाविण्याकरिता हा मनोनिग्रह किंवा आत्मसंयम आवश्यक ठरतो. स्वामी शिवानंदजी आपल्या ओजस्वी वाणीने उपदेशितात, " आत्मसंयमन हाच सजीव सृष्टीचा तरणोपाय होय....फलत: **आत्मसंयमन हेंच जीवन व स्वैराचरण हेंच मरण होय** "[१६६] येथे जर विषयतृप्तींत पुरेसें सुख नसेल तर तें कशांत आहे असा प्रश्न पडतो व त्याचें उत्तर शास्त्रांनी मन आणि बुद्धि यांच्या द्वारें स्वत:चें व बाह्य सृष्टीचें ज्यास ज्ञान होतें त्या आत्म्याच्या स्वरूप विचारांत आणि

---

१६३ 'बलवान् इंद्रियग्रामो विद्वांसपिकर्षति'

१६४ 'न जातु कामः कामानां उपभोगेन शाम्यति ( महाभारत–आदिपर्व ७१–४९ ) १६५ ध्यायते विषयान्पुंसः इत्यादि दोन श्लोक पहा गीता २–६२,६३. १६६ पहा 'ब्रह्मचर्य हेंच जीवन' वर्धितावृत्ति पृष्ठ २५९ ले. श्रीमत्स्वामी शिवानंद वरुडकर"जगांत आजवर जेवढे थोर स्त्रीपुरुष होऊन गेले, ते सर्व कठोर मनोनिग्रहीच झाले आहेत ... संयमहीन, निर्बल, व निस्तेज पुरुष स्वगृहांत देखील स्वतःच्या स्त्रीपुत्र नोकरांदिकांकडून नेहमी अपमानित होतात ......" हा प्रत्यक्ष अनुभवच नाही काय ?

पर्यायाने आत्मानुभूतींत किंवा ब्रह्मानंदांत तें सापडतें असें दिलें आहे.[167] मनुष्य व पशु यांच्यांत ह्याच आनंदोपभोगाच्या शक्यतेचा फरक असून श्रीमनूने याच विचाराने अखिल भूतमात्रांत ब्रह्मवेत्त्यास सर्वश्रेष्ठ ठरविलें आहे.[168] गीतेमध्ये राजस, तामस व सात्त्विक अशा सुखाच्या उत्तरोत्तर श्रेष्ठ पायऱ्या (१८-३७, ३८, ३९) दिल्या असून त्यापुढें ब्राह्मण क्षत्रियादिकांची कर्में देऊन कर्मनिष्ठा आवश्यक सांगितला आहे, मात्र कर्मांतील आसक्ति नाहींशी करून तीं कर्में केवळ कर्तव्यबुद्धीने (मागे कर्मयोगावरील विवरण आलें आहे तें पाहावें)[169] करीत राहणें, ही निवृत्तीच होय. निवृत्ति म्हणजे कर्मसंन्यास नव्हे तर कर्मासक्ति संन्यास होय.

## ( ई ) ज्ञानेश्वर व ज्ञानैश्वर्य.

कर्मासक्ति नको अतएव आपाततः घडतील तीं कर्में घडूं द्यावींत, आपण बुद्ध्या कांहीं करूं नये असा याचा अर्थ मुळींच नसून ज्यास उच्च भूमिकेचें ज्ञान झालें आहे, अशा ज्ञानी

---

१६७ पहा 'गीतारहस्य' पृ. ११५ १६८ भूतानां प्राणिनः श्रेष्ठाः प्राणिनां बुद्धिजीविनः। बुद्धिमत्सु नराः श्रेष्ठः 'नरेषु ब्राह्मणाः स्मृताः ॥ ब्राह्मणेषुच विद्वांसः विद्वत्सु कृतबुद्धयः। कृतबुद्धिषु कर्तारः कर्तृषु ब्रह्मवादिनः। मनुस्मृति १-९६, ९७ ॥ १६९ कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषुकदाचन गीता २-४७

पुरुषाने वर्णाश्रमधर्माप्रमाणे प्राप्त झालेल्या सर्व लोक संस्था रक्षणीय आहेत हें समजून त्यांना मार्गाधारें लावण्याचें काम करावयाचें असतें असा आहे. वर्णधर्माप्रमाणे ब्राह्मणांनी ज्ञानाची, क्षत्रियांनी ऐश्वर्याची, आणि वैश्यांनी धनधान्याची इच्छा पूर्ण करणें, किंवा एतद्विषयक भोग भोगणें ज्ञानेश्वरांना धर्म्य वाटत होतें. तुवां शरीरापरां नोहावें । कामनाजात सांडावें । मग अवसरोचित भोगावें । भोग सकळ ॥ ज्ञा. ३-१८५ ह्या त्यांच्या शिकवणुकीनुसार इतरत्र धर्मास असंमत् नसलेली कामप्रवृत्ति प्रशंसिली आहे. ( ज्ञा. ७-४५, ४६, ४७, ४८ ) 'आधीं संसार करावा नेटका । मग परमार्थ विवेका ' या रामदासोक्तीप्रमाणे ज्ञानेश्वरही म्हणतात, " एथां ऐहिक ही एक धड नाही । मग परत्राक सांधिजेल काइ ।" ( ज्ञा. ४-१५३ ) सारांश असा की ब्राह्मणांची विद्वत्ता, क्षत्रियांची सत्ता व वैश्यांची मत्ता यांची आवश्यकता ज्ञानेश्वरांनी सूचित केली असून त्यांवरून ज्ञानेश्वरांनी ज्ञानेश्वरी मध्ये ज्ञान आणि ऐश्वर्य दोहोंचा सांगड घातली आहे असा बोध घेतां येईल.

## ( उ ) ध्येय–आध्यात्मिक का सामाजिक; ध्यानप्रधान का कर्मप्रधान.

या विवेचनावरून त्यांचें ध्येय केवळ ध्यानात्मक ( Contemplative ) होतें का कर्मप्रधान होतें याचा खुलासा होतो. तें दोन्हीही होतें. ' ज्ञानेश्वरांना यांत विरोध वाटत नसे '

असें प्रा. दांडेकरांचें मत[१७०] आहे तें ग्राह्य होण्यास हरकत नसावी. डॉ. तुळपुळे यांनी 'ज्ञानदेवाचें नीतिशास्त्र आध्यात्मिक का सामाजिक ?' असा प्रश्न उत्पन्न करून कांहीं अंशीं विरोधी उत्तर दिलीं आहेत व प्रा. न. र. फाटकांच्या 'हिन्दु समाजाच्या स्वत्व रक्षणार्थ ज्ञानेश्वरी अवतरली'[१७१] ह्या मताचें खंडण करून 'सारांश' असा दिला आहे. 'ज्ञानदेवांचें चारित्र्य परमार्थमय असून परमार्थ हेंच सर्वांचें प्रेय व श्रेय होय.'[१७२]

## ९९ ज्ञानेश्वर आणि मराठी भाषा.

अध्यात्मासारख्या शास्त्रीय विषयाची चिकित्सा पेलण्या इतकी मराठी भाषा ज्ञानेश्वरांच्या काळीं प्रगल्भ झाली होती हें ज्ञानेश्वरीवरून आणि ज्ञानेश्वरीपूर्वी झालेल्या मुकुंदराजाच्या विवेकसिंधूवरून उघड होत आहे, परंतु शास्त्रीय चिकित्सेच्या जाडीला श्रेष्ठ साहित्यांत आढळून येणाऱ्या लालित्याचा साज तिच्यावर ज्ञानेश्वरांनी चढविला हें विशेष होय. अशा सुंदर भाषेंत ज्या काळांत हा ग्रंथ लिहिला गेला त्या काळांत सर्व साधारण समाज मराठी बोलत असला तरी ग्रांथिक भाषा संस्कृत

---

१७० 'श्रीज्ञानदेव, पृ. ११६. १७१ मागे प्रा. फाटकांच्या ह्या मताची सविस्तर चर्चा कांहीं परिच्छेदांतून केलेली आहे. १७२ 'पांच संतकवी' पृष्ठें ७४ ते ७६

होती, एवढेंच काय पण धर्म-अध्यात्म-वेदान्त विषयक ग्रंथांची रच । संस्कृतांतच व्हावी असा संकेत होता आणि ह्या संकेतापायीं मराठी लेखकांचा संस्कृत लेखकांकडून तिरस्कार होत असे. ह्या तिरस्काराला मुकुंदराजापासून मोरोपंतापर्यंतो सर्वांनाच तोंड द्यावें लागलें. छत्रपति शिवाजीच्या दासबोध वाचनाचा काशीचे महापंडित गागाभट्ट यांनी निषेध केल्याची एक आख्यायिका आहे.[१७३] राधामाधव, विलासचंपूचा कर्ता जयराम पंडित हा 'संस्कृत कवींच्या सिंहगर्जनेपुढे प्राकृत कवि माकडाप्रमाणे झाडाझुडपांत लपून बसतात'[१७४] असें म्हणून त्यांची हेटाळणी करतो! प्रत्यक्ष शिवाजीच्या काळांत ही स्थिति तर ज्ञानेश्वरांच्या काळांतील स्थितीची नुसती कल्पनाच करणें बरें! ज्ञानेश्वरांनी गोड बोलून काम काढून घेतलें असलें तरी या तिरस्काराचा निषेध करतांना दासोपंत, एकनाथादिकांना क्वचित् कठोर शब्दही वापरावे लागले आहेत. त्या काळांत मायबोलीचा अभिमान कित्येक कुटुंबांतून पितापुत्रांच्या बेबनावास कारण झाला असेल.[१७५] अर्थात् अशा परिस्थितींतही अत्यंत आदराने आणि मातृप्रेमाने लेखन करणाऱ्या ज्ञानेश्वरांच्या पुढे आजच्या मराठी भाषिकाने कृतज्ञतेने नतमस्तक झालेंच पाहिजे.

---

१७३ महीपतीकृत 'संतविजय' अध्याय १४ पहा.

१७४ संस्कृत सिंहे गर्जति गच्छति गहनाद्गज इवेंदुशब्द:
शाखामृग इवभाषां निलीय शाखांतरे वसति ॥

१७५ स्वामी एकनाथ व त्यांचे चिरंजीव हरिपंडित यांच्या बेबनावाची हकीकत प्रसिद्ध आहे.

विषम परिस्थितींत मराठींतून लेखन करण्याच्या प्रवृत्तीचें एक कारण जसें भाषेविषयीं मातृप्रेम तसेंच दुसरें ' कलिकलितभूतां ' विषयीं वाटणारी सहानुभूति हें होय. रंजलेगांजलेल्यांचा उद्धार होण्याकरितां पाहिजे असलेला सोप्यांत सोपा मार्ग त्यांच्याच भाषेंत त्यांना सांगणें हीच खरी सक्रीय सहानुभूति होती व ती त्यांनी दाखवून गीर्वाण गंगेचे कठीण काठ मराठीच्या शब्द सोपानाने सुलभ करून दिले (ज्ञा. ११-९ ) या सुलभतेकरिता अत्यंत साधा आणि गेय असा ओवीछंद त्यांनी स्वीकारला. हा छंद अपभ्रंशांतील ' षट्पदी'चे प्रत्येकीं ३॥ चरणांचे दोन भाग होऊन मराठींत रूढ झाला असें डॉ. तुळपुळे यांचें म्हणणें आहे.[१७६] ' आबाल सुबोधें । ओंवियेचेनि बंधें ' ( ज्ञा. १८-१७२१ ) अशी ही रचना केल्याने ग्रंथरचनेचें उपयोगित्व वाढलें. स्वभाषेविषयीचें मातृप्रेम ज्ञानेश्वरांनी सुमारे १३० ओव्यांतून वर्णिलें असून त्यांत मराठीच्या वैभवाविषयीं अतूट श्रद्धा, आणि स्वतःच्या कर्तृत्वाविषयीं क्वचित् अहंकाराच्या शीवेला शिवून परत फिरणारा बळकट आत्मविश्वास दिसून येतो. मूळसंस्कृत आणि त्यावरील मराठी टीका शेजारींशेजारीं ठेवल्यास ' कवण भूमि हे न चोजवे ' अशा अपूर्व पद्धतीने साहित्यावर ओवीचें लेणें त्यांनी चढविलें आहे. अर्थगांभीर्यांत

---

१७६ पहा ' या. म. भाषा पृ. ६० ' ओवी 'या शब्दाची व्युत्पत्ति अशी :-सं अर्धचतुष्पदी ( =३॥ ओळी ) > अद्धौठवै > अध्दुघवै > अध्दुहवै > हुअवै > हाअवै > आवई ओवी (प्रा. वेलणकर) ' किंवा सं. अपपादिका > अववाइआ > ओवैया > ओवी ( डॉ. कात्रे)

समुद्राहूनि सखोल असलेले माझे मराठी बोल अमृतालाही 'गोडिसपणें चूकी' ठेवतील ज्ञा. (१३-११५७) आणि पैजेंत जिंकतील, '**माझा मऱ्हाटाचि बोलु कवतिकें । परि अमृतातेंहि पैजें जिंके । ऐसी अक्षरें रसिकें । मेलवीन**' ॥ (ज्ञा. १२) असा त्यांना विश्वास वाटतो. ते म्हणतात, मालतीच्या सुदर कळ्यांचा सुवास घेण्याकरिता त्यांना घ्राणेंद्रियाजवळ न्यावें लागतें. परंतु त्यापूर्वी लांबूनच डोळ्यांना दिसू शकणारें त्यांचें रेखीव रचनासौंदर्य डोळ्यांना जसें मोहवून सोडतें त्याप्रमाणेच बुद्धीच्या जिभेने अर्थाचा रस चाखण्यापूर्वीच मराठीच्या रचनासौंदर्याने डोळे आणि नादमाधुर्याने कान अशीं दोन्ही इंद्रियें जिंकलीं जातील (ज्ञा. ७·२०२, २०३), येथील वाक्सुपमा आकाशींच्या चांद्रसुषमेस फिकें पाडील (ज्ञा. १३-११५२) आणि नुसत्या नादश्रवणाने समाधीचें सुख भोगतां येईल अशा अपूर्व वाग्वैभवाचें आवार मी जगाकरिता तयार केलें आहे.' (ज्ञा. १३-११५४) श्रोत्यांनी नुसतें 'अवधान दिलें तर जगांतील यच्चयावत् सुखाचा पट्टा त्यांना मी मिळवून देईन' अशी त्यांनी प्रतिज्ञा (ज्ञा. ९-१) केली असली तरी अध्यात्मशास्त्रांत तितकें 'अवधान' देऊं शकणारे 'मनुष्यांचेया सहस्रामाझि विपाइलेयांचि, (ज्ञा. ७-१०) असतात अशी जाणीव असल्याने अध्यात्मशास्त्रांत 'अंतरंग' नसणारे इतर लोक ज्ञानेश्वरींतील अपूर्व 'वाक्चातुर्यें होईल सुखिया' असा यथार्थ आत्मविश्वास ज्ञानेश्वरीच्या शेवटीं (ज्ञा. १८-१७२८),

त्यांनी प्रगट केला आहे. या कविश्रेष्ठाच्या अपूर्व वाक्चातुरीनेच मराठीला नागर भाषेच्या सिंहासनावर हक्क प्राप्त झाला. प्रा. आळतेकर म्हणतात, 'हिंदुस्थानाची उंची हिमालयाने ठरविली त्या प्रमाणे मराठीची थोरवी ज्ञानदेवाने निश्चित केली' यांत कांही शंका नाही.

## १०० आतां वंदू कवीश्वर ....॥

ज्ञानेश्वर हे वागीश्वरही होते. ते शब्दसृष्टीचे 'ईश्वर' होते आणि 'बुद्धीचे वैरागर'ही होते, परंतु ते केवळ 'अध्यात्मग्रंथांची खाणी' होते असें समजून त्यांना 'कवीश्वर' तर काय परंतु 'कवि' सुद्धा म्हणतां कामा नये आणि ज्ञानेश्वर रामदासादिकांचे ज्ञानेश्वरी, दासबोधादि ग्रंथ पद्य असतील परंतु काव्य नव्हे असें म्हणणारा एक पक्ष महाराष्ट्रांत आहे. यांचें थोडक्यांत म्हणणें असें असतें की "काव्य ह्या संज्ञेने ज्या ग्रंथांना आपण ओळखतों ते **सर्वस्वीं रसात्मक** असावे लागतात. संसारांतील कोणता-तरी एक विषय किंवा प्रसंग घेऊन तो नवरसांनी रुचिर करून दाखविण्याचें काम कवीचें होय. कवींच्या ग्रंथांत संदेह, संगति पूर्वपक्ष, सिद्धांत वगैरे शास्त्रीय परंपरा आणणें म्हणजे काव्याच्या आत्म्याचा शतधा भंग करण्यासारखें आहे.... ह्या सर्व प्रकारांना परमार्थतः काव्यांत गोवणें म्हणजे अपरंपार अरसिकतेचें प्रदर्शन करणें होय"[१७७] ज्ञानेश्वर रामदासादिकांच्या काळांत मुद्रण-

---

१७७ इतिहासाचार्य राजवाडे यांचा' श्रीसमर्थ रामदास यांचे वरील निबंध' पृ. १०–११

कलेच्या अभावीं हस्तलेखन आणि स्मृतिसौकर्यास्तव पद्यबद्धता हीं दोन अंगें महत्वाचीं ठरत. या स्मृतिसौकर्यास्तव कित्येक वैद्यकीय ग्रंथ वा कोशग्रंथ पद्यरूप असत हें खरें असेल तरी विषय शास्त्राचा आणि पेहराव पद्याचा म्हणून ज्ञानेश्वरीलाही अ-काव्य समजणें हें युक्त नव्हे कारण ज्ञानेश्वरी ही गीताशास्त्रावरील टीका असली तरी शास्त्रीय शुद्ध चर्चेचा कीस काढणें किंवा पूर्वोत्तर पक्षाचें वादंग माजविणें यांना ज्ञानेश्वरांच्या भूमिकेंत स्थान नाही, उलट वरील आक्षेपांत 'काव्य-अकाव्य' मधील निर्णायक म्हणून उल्लेखिलेला विशेष स्वयंस्फूर्त रसात्मकता हा मात्र ज्ञानेश्वरांच्या ओव्या-ओव्यामधून मुरलेला दिसतो म्हणून तो ग्रंथ काव्यग्रंथच होय. मग रसाच्या कमीअधिक उत्कटत्वानुसार त्या ग्रंथाची श्रेणी ठरवावयास हरकत नाही. शिवाय संसारांतील कोणतातरी एक विषय घेऊन त्यावर केलेली रसात्मक रचना जर काव्य ठरूं शकते तर संपूर्ण संसाराचा प्रचंड विषय घेऊन त्याला आनंदाचें आवार करावयाची प्रतिज्ञा करणाऱ्या ज्ञानेश्वरांना 'कवि' आणि ज्ञानेश्वरीला 'काव्य' म्हणण्याशिवाय गत्यंतर नाही. ज्ञानेश्वरांच्या काव्यास संस्कृत किंवा इंग्रजी कोणत्याही काव्याच्या कसोट्या लावल्या तरी त्याचें काव्यत्व जात नाही उलट अधिकच उजळून दिसतें. त्यांचा ग्रंथ नुसता काव्यच ठरतो किंवा 'काव्यराज' होऊन 'गुरुवर्तीच्या ठायीं' बसतो तें पुढील विवेचनावरून आपोआप लक्षांत येईल.

## १०१ कुशल कथा कवि.

ललितकथेचा आत्मा 'संग्राम' होय.[१७८] श्रीमद्भगवद्गीतेचा जन्म हा शब्दार्थाने आणि लक्षणार्थानेही संग्रामांतच झाला. पात्र प्रसंगांची चतुराईची मांडणी किंवा गुंफण म्हणजे ललितकथा होय."[१७] मूळ गीतेंत श्रीकृष्ण-अर्जुन, धृतराष्ट्र-संजय अशीं चार पात्रें आहेत आणि अर्जुनविषाद, विश्व-रूपदर्शन हे अत्यंत महत्वाचे प्रसंग आहेत. ज्ञानेश्वरांनी मूळ पात्रें वाढविली, त्यांत सद्गुरु श्रीनिवृत्ति, आपण स्वत: आणि श्रोते यांची भर घातली मूळ प्रसंगांत ही कामक्रोधादि मानव-शत्रूचा निर्देश ( अ. ३ रा , मायेंतून तरून जाणाऱ्यांचा निर्देश ( अ. ७ वा ), मृत्यु संसार सागरांतून उद्धरण ( अ. १२ वा ), अश्वत्थवृक्ष ( अ. १५ वा ) इत्यादि उल्लेखांना प्रसंगाचें महत्त्व ज्ञानेश्वरांनी आणून देऊन त्यांची अशी कांहीं गुंफण केली आहे की अथपासून इतिपावेतो एक स्वतंत्र गोष्ट किंवा कथाच आपण वाचतो आहोंत असें वाटावें. मूळ गीतेची आवश्यकताच उरत नाहीं शिवाय कथारचानाचातुर्या पेक्षा 'दर्शनचातुर्य दसपटींनी' महत्त्वाचें असतें[१८०] ह्या नियमानुसार येथे ही प्रत्येक व्यक्तीच्या स्वभावाच्या लहान मोठ्या छटा अशा मार्मिकपणे वर्णन केलेल्या आहेत की या साऱ्या व्यक्ति जणु मूर्तरूपाने आपल्यापुढेच उभ्या आहेत असें वाटावें.

---

१७८ प्रतिभासाधन' – ले. प्रा. ना० सी. फडके, पृ. ८४
१७९ पहा सदर पृ. ७९, १८० पहा सदर पृ. १००.

ज्ञानेश्वरांचा थाट ज्या श्रोत्यांच्या पुढे बसून प्रवचन करण्याचा आहे त्यांना त्यांनी अनेक ठिकाणीं आळविलें असून त्यांचें अवधान जागतें राहील याची काळजी घेतली आहे. वक्त्याच्या वक्तृत्वाला बहर आणण्याची हातोटी असलेल्या आपल्या चंद्रसोज्वल श्रोत्यांना अवधानामृताचें सिंचन करून सारस्वताचें गोड झाड रसभाव फुलांनी फुलविण्याकरितां अत्यंत विनयपूर्वक विनंति करणाऱ्या ज्ञानेश्वरांची सलगी वाचकांचें अंतःकरण रसभावांनी प्रफुल्लित करते. धृतराष्ट्र व संजय यांचें विस्मरण मूळ गीतावाचकास कदाचित होईलही परंतु ज्ञानेश्वरांनी पुत्र मोहाने घेरलेल्या व म्हणून अंतर्बाह्य आंधळा झालेल्या धृतराष्ट्राच्या स्थितीचें यथार्थ वर्णन अध्याय १, ६, ९, १०, १४, १८ इत्यादि ठिकाणीं निरनिराळ्या प्रसंगांतून करून त्या दोघांना वाचक श्रोत्यापुढे सारखे उभें ठेविलें आहे. श्रीकृष्णार्जुनाच्या संवाद सुखाने संजय 'भावभवनीचा चौहटा' होतो, व त्याच्या ठिकाणीं अष्टसात्त्विक भावांचे कल्लोळ उठत होते तर इकडे 'म्हैसा नुठी का पुरां' असें धृतराष्ट्ररूपी म्हसुरडें निवांत बसून होतें! ज्ञानेश्वरांचीं हीं दोन परस्परविरोधी चित्रें त्यांच्या रेखापटुत्वाची साक्ष देतात व त्याबरोबरच मानवी स्वभावाच त्यांचें सूक्ष्म निरीक्षण ही दिसतें. धृतराष्ट्र-संजय या जोडीपेक्षाही श्रीकृष्ण-अर्जुन या जोडीचें स्वभावचित्र अधिकच जिवंत वाटतें. श्रीकृष्णार्जुनाचें प्रत्यक्ष आप्तपण तर होतेंच परंतु जिव्हाळ्याचें सख्यत्वही होतें. असे असूनही आपली 'आर्त' तर पुरी व्हावी परंतु भीडेची मर्यादा

मात्र ओलांडली जातां नये ( अ. ७-१९८) अशी काळजी घेणाऱ्या अर्जुनाची समयज्ञता, परस्पर संवादांतून उभयतांनाही होणारें संवादसुख आणि अष्टसात्त्विक भावांचा बहर, श्रीकृष्णाने, मूर्तिमति आस्थाच अर्जुनरूपाने अवतरलेली कल्पून 'आपुलियाचि सुखस्वार्था' साठीं केलेल्या उपदेशांतील आत्मीयतेची पराकाष्ठा, विश्वरूपदर्शनासाठीं हपापलेल्या अर्जुनाची दिव्यदृष्टि देण्यापूर्वी केलेली थट्टा, संवादामागें संवाद उत्तरोत्तर रंगत असतां 'दोहीं ओठीं एक बोलणें' आणि 'दोहीं चरणीं एक चालणें' ( ज्ञा. १५-४४३-४६०) असा होऊं लागलेला अद्वैताचा साक्षात्कार हे सारे प्रसंग कवीने अशा कांहीं कौशल्याने गुंफिले आहेत कीं वाचकांच्या हृदयींच्या जीवीं गुतकुलिया होऊं लागतात, त्यांनाही तेथील परस्पर एकात्मतेचा दिव्य अनुभव येऊं लागतो आणि जीवन सार्थकीं लागल्याचा प्रत्यय येतो. हे सारे प्रकार मूळ गीतेंत आहेत काय ? एकशतांशही नाहीत ! मग हीं सारीं वर्णनें -छे ! वर्णन नव्हेतच हीं ! प्रतिभेच्या दिव्य सुषमेंत सुस्नात होऊन कवीच्या कल्पनाकासारांत बहरून आलेलीं राजकमळें आहेत हीं ! हीं पाहिल्यावर कवीच्या अमोघ कथनकौशल्याची प्रचीति येते. मानवी स्वभावांतील आशानिराशेचीं द्वंद्वें, अपेक्षा निर्मिते, आणि अपेक्षाभंगाच्या मौजा-ज्यांना प्रा. फडके ' छाया प्रकाशाच्या मौजा ' म्हणतात, त्यांचाही आढळ येथे होतो. सबंध ज्ञानेश्वरी वाचित असतां अपेक्षित तत्त्वज्ञान तर वाचकांच्या गळीं कवि सहज उतरवितोच परंतु त्याबरोबरच

जिवंत माणसांच्या संसारांत घडत असलेली एक अपूर्व कथा आपण वाचीत आहोंत, किंबहुना त्यांचा चलच्चित्रपट आपल्या डोळ्यांपुढून सरसर सरकतो आहे, असेंच त्यास वाटत राहते. वाचक श्रोत्यांची उत्कंठा सुमारें नऊ हजार ओंव्यांतून कायम टिकविण्याकरिता अध्याय।अध्यायाच्या आवृत्तीं देखील योग्य ती खबरदारी घेण्यास कवि विसरत नाही, एवढेंच काय पण अर्जुनाला आलिंगन देणारा श्रीकृष्ण डाव्या हातांत घोड्याचे चाबूक धरून उभा असला पाहिजे हे लक्षांत ठेवून तें आलिंगन केवळ उजवा हात पसरून त्याने दिलें "बाहु पसरोनि दक्षिणु। आलिंगिला स्वशरणु। भक्तराजु" असें कवि सांगतो! किती सूक्ष्म निरीक्षण!

मॅथ्यू अर्नोल्ड म्हणतो Poetry is the criticism of life. ह्या व्याख्येप्रमाणे पाहतां **जीवनाचें महाभाष्य रचणारा मराठीचा कुशल कथाकवि** म्हणून ज्ञानेश्वरांना गौरविण्यास हरकत नसावी.

## १०२ या लागि नवरसिं वरिखेन मी.'

मूळ संस्कृत गीतेंत रसालंकारांना स्थान नाही. पण गीतेवरील प्रस्तुत टीकेंत रससरिता दुथडी वाहात आहे. या रसगंगेची गंगोत्री ज्ञानेश्वर होत. 'रसात्मकं वाक्यम् काव्यम्' ही संस्कृत व्याख्या ज्ञानेश्वरांना मान्य होती असे दिसतें.

एवढेच नव्हे तर काव्याचे शृंगारवीरादि नवरस त्यांना माहीत असल्याने 'नवरसांचा मी वर्षाव करीन' ( १३ - ११६३ ) अशी प्रतिज्ञा त्यांनी केली. तसेंच रसराज ठरलेल्या शृंगाराची महती ज्ञानेश्वरांच्या स्वतंत्रप्रज्ञेला अमान्य असल्याने '**श्रिंगाराची माथां । पावो ठेविति'** ( १३ - ११५० ) अशी शांति-कथा आपण निर्मिणार असल्याचा स्पष्ट उल्लेख त्यांनी केला. अर्थात् **ज्ञानेश्वरींतील रसराज शांतरस होय.** ह्या शांताच्या घरीं ११ व्या अध्यायांत 'अद्‌भुत' पाहुणा येतो आणि तेथेच '**वधुवरांचिये मीलणीं । जैसें वऱ्हाडियांहि लुगडीं लेणीं ।**' मिळतात त्याप्रमाणे इतर रसांचाही बहुमान करण्यांत आला आहे. तेथे गंगायमुनेच्या ओघाप्रमाणे शांत व अद्‌भुत हे एकरूप झाले असून गतिच्या गुप्त सरस्वतीचा संगम होऊन त्रिवेणीचें तीर्थ वाचकांना मिळतें असें कवि म्हणतो. (ज्ञा. ११-३,६,७) अकराव्या अध्यायाचा अपवाद सोडल्यास इतरत्र शांतरसच आहे, आणि हा रस श्रीसद्गुरुप्रेम, गीतेंतील तत्त्वज्ञानाचें निरूपण आणि कृष्णार्जुनप्रेमवर्णन यांत प्रामुख्यानें उचंबळून आलेला दिसतो. शृंगाराचा आविर्भाव वास्तविक प्रियकर आणि प्रेयसी यांच्या संयोग--वियोगांत होतो, आणि त्यास संभोगशृंगार आणि विप्रलंभ शृंगार म्हणतात. ज्ञानेश्वरींत या उभय प्रकारांच्या सलग व विस्तृत वर्णनास अवकाश नसतांही श्रीकृष्णार्जुनभेटीस आता असो हे किरीटी । प्रियाचिया गोठी । दूणा थाउ ऊठी । आवडिगा

॥ १२-१६०॥ अशा कांत-कांतेच्या संभोग शृंगारात्मक उपमानांनी गौरवून किंवा गुरुशिष्यप्रेमांतील आर्तता ' गुरुगृह जिये देशीं । तो देश चि आहे मानसीं । विरहिणी जैसी । वल्लभातें ॥ १३--३७४ ॥' अशा कांत-कांतेच्या विप्रलंभशृंगारात्मक उपमानांनी वर्णन करून उभयविध **शृंगाराची खैरात** ज्ञानेश्वरांनी केली आहे. उदाहरणार्थ-- किं प्रथमवयसाकाळीं । लावण्याची नव्हाळी । प्रगटे जैसी आगळी । अंगनाअंगीं ॥ १-४२॥, प्राणनाथाया उचिंत । दीन्हले प्रिय ॥ १३-३७२॥, गांवां गेलेयां वल्लभु । पतिव्रतेचा विरहक्षोभु । १६-७८॥, कां वसंतीं वरवा आरामु । आरामिं प्रियासंगमु । संगतिं आगमिं । उपचारांचा ॥ १८-३४३ ॥ पैं आघवा चि भोगेंसिं। पतिव्रता क्रीडे प्रियेंसि ॥ १८-९० ३॥ इत्यादि. हा उच्च प्रतीचा भक्तियुक्त शृंगार होय. यामध्येच 'एकाधिये वेळे । गुरु माये करीं भावबळें । मग स्तन्य उत्संगिं लोळे । अंका वरि ॥ १३-३९५ ॥ किंवा गुरुस्नेहसलीलीं । आपण होये मासली ॥ १३-३९७ ॥ इत्यादि प्रकारचा **वत्सलरस** समाविष्ट होतो असें प्रा. मा. दा. आळतेकरांचें मत आहे. [१८१] **वत्सलास ज्ञानदेवांनी स्वतंत्र रसपदवी दिलेली नाही, परंतु**

---

१८१ अज्ञानदेव पृ. २३२

उत्कटपणें आस्वाद घेतां येण्याइतपत वात्सल्याचें वर्णन त्यांनी केलें आहे हें नाकारतां येत नाही.

पहिल्या अध्यायांत दुर्योधनाच्या भाषणप्रसंगीं तर दुसऱ्यांत संन्यस्तखड्ग अर्जुनाचें 'मूर्खपण' जाण्यासाठी श्रीकृष्णाने केलेल्या भाषणांत ( २-६ ते २८ ) 'उत्साह' हा स्थायीभाव असून वीररसाचा प्रकर्ष झालेला दिसतो. श्रीकृष्ण म्हणतो, "अरे, तूं कोण आहेस, कुठे आहेस, आणि आहेस तिथे तुझी वागणूक उचित आहे काय याचा विचार केलास का ? हे शूर वृत्तीच्या सम्राटा, तुझ्या बलशालित्वाचा डंका तिहीं लोकीं गर्जत असतांना, गंधर्वादिकांना तर काय पण प्रत्यक्ष पार्वतीशास जिंकून आपल्या कीर्तीपवाड्याला त्रैलोक्य थोकडें करविणाऱ्या अचाट पौरुषाचा तूं धनी, 'ऐसें पौरुष थोखडें। पार्था तुझें' असें असतांना आज खाली मान घालून रडण्याची अवदसा तुला कोठून आठवली ! अंधःकार सूर्याचा ग्रास करावयास निघाला काय ? सिंहाला कोल्हा झोंबूं लागला काय ? बेडकाने उलटें सापास गिळावें किंबहुना अमृताने मरणाची वाट पाहूं लागावें असा हा प्रकार झाला आहे. हे शहाण्या ! 'असती प्रतिष्ठा जाइल आणि परलोक अंतरेल' असलें 'सांडी हें मूर्खपण। उठिं घेइं धनुष्यबाण। संग्रामीं हें कवण। कारुण्य तुझें'....इत्यादि. पुढेही ज्ञानवीर

योगवीर आदींच्या वर्णनांत वीररसाचें उत्कट वर्णन असून तेथील शृंगाराचें मिश्रण वीररसास पुष्ट करतें. आपल्या नातेवाईकांना पाहून त्यांचा कळवळा (दुसऱ्या अध्यायांत) अर्जुनाला आलेला आहे तेथे आणि ११ व्यांत **करुणरसाचा आविर्भाव** झालेला दिसतो; तसेंच इहलोकींच्या इंगळांच्या आंथरुणाची कहाणी सांगतांनाही (अध्याय ९) करुणसूचन पुष्कळच होतें. सांसारिक सुखाची विफलता वर्णन करतांना **बीभत्स रसाचा उत्कर्ष** साधलेला असून '**म्हणे पूयगर्ते रिगालां । मूत्ररंध्रीनि निगालां । कटोरे मियां चाटिला । कुचस्वेदु ॥१३–५३८॥** असलीं वर्णनें तर तत्काल किळस उत्पन्न करतात. ११ व्या अध्यायांतील विश्वरूपदर्शनसमयीं **अद्भुतरसास शांताकडून मेजवानी** मिळाली आहे. सातव्या अध्यायांत 'ब्रह्मादि वाक्यफलें' अर्जुनास मिळण्याच्या प्रसंगीं (१८० ते १९०) **अद्भुतरस आणि हास्यरस यांचा संकर** झालेला दिसेल. हीं वाक्यफलें एकदम तोंडांत घालूं पाहणाऱ्या अर्जुनाची, जिभेवर जेव्हां तीं विरघळत ना, आणि दांतांनी फुटत ना तेव्हा जी फटफजिती झाली ती हास्यरसांत गणतां येईल. संयमित आणि शिष्टसंमत् हास्याचे तुषार ज्ञानेश्वरींत पुष्कळ आहेत. मात्र हास्याची खसखस पिकविण्याचा प्रयत्न हींत कोठेच नाही. **कोटि, विनोद, उपरोध, वक्रोक्ति, व्याजस्तुति, उपहास, परिहास इत्यादि अंगांनी येथील हास्यरस सिद्ध होतो.** ११ व्या अध्यायांत, 'पाताळव्यालांचा

फुत्कारीं । गरलज्वाला लागति अंबरीं ।,' ' काढूनि प्रलय विजूचीं जुंबाडें । मग पानासिले गगनाचे हुडे,' 'कैसें भयातें भेडविति डोले ' इत्यादि वर्णनांतून **रौद्ररस** आहे. ११ल्या अध्यायांत ( ५४ ते ६६ ) मेरुमांदार कंप पावूं लागले, समुद्र उसळूं लागला, नक्षत्रांचा पृथ्वीवर सडा पडला इत्यादि वर्णनांत **भयानक रसाचा परिपोष** केला आहे. अशा रीतीने प्रत्येक रसाला कोठे ना कोठे स्थान मिळालें आहे असें दिसतें.

## १०३ रसराज शांताचें उद्दिष्ट— "अतींद्रिय परि भोगवीन इंद्रियां करवीं."

या सर्व रसांत शांत रस प्रधान आहे. शांताचा स्थायिभाव निर्वेद किंवा शम हा असून ह्याचा वर्षाव परिणामकारक होण्याकरिता तसाच अधिकारी पुरुष लागतो. निर्वेद, शम, वैराग्य यांचा उपदेश करावयास ज्ञानेश्वररामदास-तुकारामादिकांची तपश्चर्या गांठीं असावी लागते. एखाद्या तमासगीर लावणीकाराने लावणीच्या मुशींतून जळजळीत वैराग्याचे शब्द ओतण्याची हटातटाने कितीही खटपट केली आणि निर्वेदाचा पटा रंगविण्याचा आव आणला तरी त्याच्या वाणीस या संतवाणीचें तेज कसें यावें !

ज्ञानेश्वरांच्या शब्दाशब्दांतुन आत्मप्रत्ययाचें तेज नुसतें ओसंडत आहे. ' **तेणें कारणें मी बोलैन । बोलीं अरूपाचें रूप**

**दावीन । अतींद्रिय परी भोगवीन । इंद्रियां करवीं ॥ '** ही आपली प्रतिज्ञा भीष्माप्रमाणेच ज्ञानेश्वरांनीही पूर्ण केली. अतींद्रिय भोग भोगण्याचा सुलभ मार्ग शांतरस होय. ' मराठीच्या नगरीं ब्रह्मविद्येचा सुकाळ करून सुखाची नुसती लयलूट करणारा' हा शांतरस ज्ञानेश्वरींत प्रधान आहे. शांताचा स्थायिभाव ' निर्वेद'. याचीं दोन स्वरूपें संस्कृत शास्त्रयांनी मानिलीं आहेत. व तींच मराठींत रूढ आहेत. आत्मानात्मविवेक, सुखदुःख कल्पना, सत्त्व-रजतमांचीं स्वरूपें, संकल्पविकल्प, इत्यादि विषयांचा सम्यक् विचार करणारें तत्त्वज्ञान ह्यास निर्वेदाचा ' विभाव ' म्हणतात. तसेंच रोग, दरिद्रता, अपमान, मृत्युलोकींच्या दुःखाचे केणें सुटून भोगावे लागणारे कष्टप्रद भोग हेही निर्वेदाचे ' विभाव ' होत. ह्या दोन्ही विभावांपैकी पहिल्या म्हणजे तत्त्वज्ञानजनित निर्वेदास शांताचा स्थायिभाव समजतात आणि दुसऱ्यापासून झालेल्या निर्वेदास व्यभिचारी भावांत स्थान देतात.[१८२] ज्ञानेश्वरींत दोन्ही प्रकारचीं उदाहरणें खच्चून आहेत किंबहुना ज्ञानेश्वरी त्याकरिताच आहे. पुढील ओव्यांतून पहिला प्रकार वर्णिलेला दिसेल.

---

१८२ पहा – स्थायी स्याद्विषयेष्वेव तत्त्वज्ञानोद्भवो यदि । इष्टानिष्ट वियोगाप्तिकृतस्तु व्यभिचार्यसौ ॥ शार्ङ्गदेवकृत ' संगीत रत्नाकर ' किंवा पहा–डॉ. वाटवेकृत ' रसविमर्श पृ. ३३३ते३४५.

स्वप्निचेया राज्य कां मरण । नोहे हर्षशोकासि कारण ।
प्रबोधलेयां जाण । जिया परी ॥ १५--२६४ ॥

तैसें सुखदुःखस्पर्शि । द्वंद्वि जे पुण्य पापिं ।
नेघपिजति सर्पि । गरुड जैसा ॥ १५—२६५ ॥

परि उदकीं जाली बाबुली । उदकांते चि जैसी झांकोली ।
कां वायाचिया आभाळीं । आकाश लोपे ॥ ७-१९ ॥

हांगा स्वप्न हें लटके नोहे । परि निद्रावशें जें बाणलें होये ।
तें आठउ काय देत आहे । आपणपें ॥ ७-६० ॥

तैसी माझीचि हे बिंबली । गुणात्मक साउली ।
किं मजाचि आड ठेली । जबनीक जैसी ॥ ७-६२ ॥

तैसी संकल्प विकल्पाची वोढी । सांडूनि रजतमाची कावडी ।
भोगीति निजधामाची आवडि । बुद्धि उरे ॥ १६-७६ ॥

इंद्रिवर्गें दाखविलेयां । विरुध्दा अथवा भलेया ।
विस्मो काहिं केलेया । नुठी चित्तीं ॥१६-७७॥

आतां शांतिचें जी लिंग .....तरी गीळूनि ज्ञेयातें ।
ज्ञान ज्ञाता चि माघौतें । हारपें तें निरुतें । शांति पैं गा ॥१६-१३५,६॥

पतंगा नावडे वाति...टिटिभें अपांपति...तैसा अहंमानाचेनि मोहें
ईश्वराचें हिं नांव न साहे । वेदांतें हिं म्हणे मज हे । सवति
जाली ॥ १६-२३२,३ ॥

निर्वेदाच्या विभावाचा दुसरा प्रकार कांहीसा किळस उत्पन्न करतो. हा प्रकार असा: —

वेळाभेड बेडुक अडिं । मशकु गुंपिला सेंबुडीं ।
........तैसा स्त्रीदेहीं जो जीवें । पडौनियां सर्वभावें ।

.......स्त्रियेचेनि संदे नाचे । मर्कट गारुडियाचें ।

जैसें होए।....किंबहुना....स्त्री चि सर्वस्व जेया।१३-७८२ते८००॥

म्हणे आजिचां अवसरिं । पुष्टि जे हे शरीरिं ।

ते पाहे होईल काचरी । सिजली जैसी ॥....

पद्मदलेसिं इसालें । भांडताति हे डोळे ।

ते होतील पडवळें । पीकलीं तैसीं ॥

तैसिं होंति नाकाडें । बिडिबिडितील ॥

....तेयाचिया तोंडा । येर जळंबाचा लोंढा ।

....उमलैल दाढा । ....देखौनि थुंकील जगु ।

मरणाचा पडैल पांगु । ....ऐसी वृद्धाप्याची खोंचणी ।

मग जो वीटे ॥ .......आणि....दे अध्यात्मज्ञानिं बुडी ।

सद्भावेंसिं ॥ १३-५११ ते ६१६ ॥

ज्ञानेश्वरींत शांतरसाने इतर रसांना आपल्या घरीं मेजवानी दिली, परंतु आश्चर्य हें की पाहुणे आलेले हे सारे रस शांताचे एकनिष्ठ सेवक बनले आहेत. वर वर्णन केलेले आठही रस स्थलास्थलीं स्वयंपूर्ण वाटतात हें खरेंच आहे, परंतु सबंध ज्ञानेश्वरीचा एकसंध साहित्य-शिल्प या दृष्टीने विचार करतां हे सारे रस आणि भाव रसराज शांताचे हात बळकट करण्याकरिताच अवतीर्ण झालेले आहेत अशी खात्री होते. रसच काय परंतु **ज्ञानेश्वरींतील अलंकार** देखील ह्याच प्रयोजनाने येथे प्राप्त झालेले दिसतात.

## १०४ ज्ञानेश्वरींतील अलंकार—"उपमा श्लेषकोंदा कोंदीं। झाडा देईन प्रतिपदीं।"

ज्ञानेश्वरीमध्ये आपण अगदीं खच्चून अलंकार भरणार आहोंत असें ज्ञानेश्वर वरील अवतरणांत (१३-११५८)स्वतःच म्हणतात, इतरत्र (१८-१७४६) 'अलंकारु म्हणिजे। काइ तें नेणें। असें त्यांनी म्हटलें आहे, तो केवळ विनय होय. मराठी कविता सयमकच जन्माला आली म्हणूनच की काय अन्त्य यमकाची त्यांनी दक्षता घतली आहे. अशीच दक्षता वृत्त्यनुप्रासाथं देखील त्यांनी घेतलेली दिसते. अन्त्य यमकाखेरीज इतर यमकें आणि वृत्त्यनुप्रासाखेरीज इतर अनुप्रास तसेंच यमकानुप्रासाखेरीज इतर शब्दालंकार यांची आवड ज्ञानेश्वरांना दिसत नाहीं.[१८३] ज्ञानेश्वरींत चित्रबंध तर मुळीच नाहीत. ज्ञानेश्वरीमध्ये एकाक्षरी आणि अनेकाक्षरी अन्त्य यमकें वापरलीं आहेत. शक्य तेथे पादान्तीं एक अक्षर, निदान एक स्वर आणि शक्य तेथे उपान्त्य जागींही एक अक्षर किंवा स्वर वापरण्याची दक्षता ज्ञानेश्वर घेतात. ह्या दक्षतेपोटीं क्वचित् दुष्ट यमकेंही साधलीं जातात. उदा. इया इया। (१८-१७३३) रूनि मूनि (७-१०७) किलेक

---

१८३ क्वचित् ठिकाणीं तीजेनि तेणें । अर्थिजे अर्थसिद्धि [ज्ञा. ७-१०७] अशीं छेकानुप्रासाचा भास उत्पन्न करणारी रचना आढळते.

वेळां मुळांत नसलेलीं जीं संबोधनें ज्ञानेश्वर वापरतात तीं यमक प्रियतेमुळेच वापरलीं असावींत असें दिसतें. उदा. माया । आय ।। धनंजया ।।७-६।। अनन्यगति । प्रीति । लक्ष्मीपति ।।७-११९।। दटति । फुटति । सुभद्रापति ।। ७-१८८ ।। इत्यादि ठिकाणीं धनंजया, लक्ष्मीपति, सुभद्रापति हीं संबोधनें वापरण्याचा इतर कोणताही हेतु दिसत नाही. वृत्त्यनुप्रासाकरिताही अशा संबोधनांचा वापर केलेला दिसतो. उदा. 'साधुसंगें सूभटा' (७-१२५) अनुप्रासाचा उपयोग समस्त शब्द किंवा विशेष्यविशेषणांची जोडी, कर्ता--क्रियापदाची जोडी, उपमेयोपमानांची जोडी अशा अनेक ठिकाणीं चातुर्याने केलेला दिसतो. त्यामुळे रचनेंत मार्दव आणि माधुर्य यांचा संगम झालेला आहे, 'उखा उजळली' 'भजनें भोगासाठी' 'मदमीन' 'आस्थेचें अवगाले' 'सागरा एउनी सरिते' 'संसाराचेचि साधन' 'अंतष्करण कुहरीं' 'प्रतीति पांखी, 'पव्हताति पाणियें' इत्यादि ठिकाणीं कविकृतींतील दक्षता सहज नजरेंत भरते. या अनुप्रासाशिवाय अनुप्रासाचे इतर प्रकार वापरण्याची आवड ज्ञानदेवांना दिसत नाही, हें वर सांगितलेंच आहे. अर्थालंकारांत उपमा, दृष्टान्त उत्प्रेक्षा, रूपक, व्यतिरेक, निदर्शना, अपन्हुति, अतिशयोक्ति, अनन्वय, एकावलि इत्यादि अलंकार त्यांना आवडत असें दिसतें त्यांतही उपमा, दृष्टान्त, उत्प्रेक्षा, रूपक यांवर त्यांची विशेष प्रीति आहे.

आंतर्बाह्य शुचित्वाचें महत्त्व सांगतांना एकापेक्षा एक सरस उपमांचा नुसता पाऊस पडलेला दिसेल. ते म्हणतात, (ज्ञा.–१३ ४६६ ते ४७०)

यऱ्हविं तऱ्हीं पांडुसुता । आंतु शुद्ध नव्हतां ।
बाह्य कर्म तत्त्वता । विटंबु गा ॥ ४६६ ॥
मृत्यु जैसा शृंगारिला । गर्दभु तीर्थिं न्हाणिला ।
कडू दूधिया माखिला । गुळें जैसा ॥ ४६७ ॥
वोसिं तोरण बांधिलें । उपवासियें अन्नें माखिलें ।
कुंकुंसेंदुर केलें । कांतहीनें ॥ ४६८ ॥
कलस ढिवांचे पोकळ । जळो वरिचील झळाळ ।
काइ करिसी चित्रफळ । आंतु सेण ॥ ४६९ ॥
तैसें कर्म वरिचिली कडां । न सरे थोर मोला कूडा ।
नव्हे मदिरेचा घडा । पवित्र गंगी ॥ ४७० ॥

देहाचा अभिमान सोडलेल्या स्थितप्रज्ञाची स्थिति सांगतानाही अशाच एकापेक्षा एक सुंदर उपमांचा नुसता खच पडलेला दिसतो. (पहा अध्याय १५ ओवी २५५ ते २७८)
तऱ्हीं मौपणें बुबुळें । झगटितां ही परि नाडले । यऱ्हविं फोडी कराळें । पाणी जैसें ( ज्ञा १६–११६ ) अशा अल्पाक्षररमणीय आणि यथार्थ उपमा सबंध ज्ञानेश्वरींत अनेक ठिकाणीं विखुरलेल्या आहेत.

का कमलकंदा आणि दर्दुरीं । नांदणुक तरि येका चि घरीं । परि पराग सेविजे भ्रमरीं । एरीं चिखल चि उरे ॥ ज्ञा. ९—५७ ॥

अशा सारख्या उपमा तर ज्ञानेश्वरी–वाचकांच्या तोंडीं म्हणीसारख्या खिळलेल्या असतात. उपमा देण्यांत कविकुलगुरु कालिदास जसा संस्कृतांत एकमेवाद्वितीयम् ठरला त्याप्रमाणेच मराठींतही ज्ञानेश्वर हेच एकमेवाद्वितीयम् ठरतात.[१८४] प्रा. आळतेकर म्हणतात "उपमा कालिदासस्य ही म्हण ज्ञानदेवापूर्वी रूढ होती म्हणूनच क्षम्य आहे".[१८५] ज्ञानेश्वरींत एकट्या दुकट्या उपमांपेक्षा मालोपमाच अधिक आहेत. इंग्रजीतील Homeric Simile प्रमाणे प्रदीर्घ उपमानेंही दिसतात.[१८६] उपमेयोपमानांतील साधर्म्य नीट प्रतीत व्हावें म्हणून त्या दोहोंत लिंग–वचन–पुरुष साधर्म्य असलें पाहिजे हा शास्त्रकारांचा नियम ज्ञानेश्वर धुडकावून लावतात हा त्यांचा एक विशेष आहे म्हणून त्यांच्या उपमांना वाक्योपमा म्हणण्या-पेक्षा वाक्यार्थोपमा म्हणावें. त्यांच्या उपमांतून 'जसा-तसा' 'ज्याप्रमाणे–त्याप्रमाणे' इत्यादि साधर्म्य वाचक शब्द येत असले तरी, उपमानवाक्य आणि उपमेय वाक्य यांत बिंब–प्रति-

---

१८४ प्राचार्य दांडेकर 'दृष्टान्तो ज्ञानदेवस्य' म्हणतात. पहा श्री ज्ञानदेव (चरित्र, ग्रंथ, तत्त्वज्ञान). कोणा अज्ञात कवीचा हा श्लोक पहावा. उपमा ज्ञानदेवस्य आचार्यादर्थ गौरवम् । आरण्य पदलालित्यं, ब्रह्मानंदत्रेयो गुणाः ॥ १८५ श्रीज्ञानदेव पृ. २३९ १८६ पहा– ज्ञा. १३-७२० ते ७२२, ६-७६ ते ७९, ३७३ ते ३७६ इत्यादि आणि ज्ञानेश्वरदर्शन साहित्यखंड पृ. १३६ आणि २६०

बिंबभाव असतो, किंबहुना बिंब-प्रतिबिंब भावालाच ज्ञानेश्वर प्राधान्य देतात, उदा. व्यासादि महामतींच्या जोडीने आपणासही सदृश रचना करावयास हरकत नाही हें सांगताना, ज्ञानेश्वर विनयाने म्हणतात, (ज्ञा. १८-१६९० ते १६९६.)

आणि जेथ्या सिंधुतटा । पाणियां येंति गजघंटा ।
तरि काइ मुरकुटां । वारिजतसे ॥ १६९० ॥

पांखिकुटें पांखिरूं । गगनीं उडे तरि काइ करूं ।
नभ क्रमूनि थोरू । गरुडु देखे ॥ १६९१ ॥

राजहंसाचे चालणें । भूतलिं चालावें कवणें ।
तरि आणिकीं हीं कुटेपणें । चालावें लागे ॥ १६९२ ॥
जी आपुलेनि अवकाशें । अगाध घेपे कलशें ।
चूळु चूळु पाणी ऐसें । घेउनि निगे ॥ १६९३ ॥
दिवियेचां आंगीं थोरी । तरि ते बहुतां तेजातें करी
वाति आपुलिया परी । आणीकां ना ॥ १६९४ ॥
जी समुद्राचेनि पैसें । समुद्रीं आकाशें आभासे ।
थिलरीं थिलरा ऐसें । बींबे चि पैं ॥ १६९५॥
तेवि व्यासादिमहामती । वावरों ये इये ग्रंथीं ।
मा आम्ही ठाकों हें युगुति । निमले चि कीर ॥ १६९६॥

यावरून ज्ञानेश्वरीमध्ये उपमा व दृष्टान्तांचा संकर होतो असें म्हणावें लागेल. प्रस्तुत लेखकाच्या मतें त्यांना **दृष्टान्त-गर्भ उपमा म्हणावें** हा उत्तम पक्ष होय. प्रा. जोग म्हणतात '....यावरून हे अलंकार तत्त्वत: दृष्टान्त पण स्वरूपत: उपमा

आहेत' [१८७] शुद्ध दृष्टान्त देखील अनेक ठिकाणीं आढळतात. तप आणि गुरुभक्ति या दोन्ही अंगांनीं युक्त असून ही श्रवणेच्छा नसलेला माणूस गीताशास्त्र शिकण्यास अयोग्य ( अनधिकारी ) होय असें सांगतांना पुढील सुंदर दृष्टान्त वापरलेले आहेत.

तरि तो मागिलीं दोहिं आंगिं । उत्तमु होये किर जगीं ।
परि येया श्रवणा लागिं । योग्यु नोहे ॥ १८-१४८० ॥
मुक्ताफळ भलतैसें । होये परि मुख नसे ।
तंव गुणु प्रवेशे । तेथ काइ ॥ १४८१ ॥
सागरु गंभीरु होए । हें कोण ना ह्मणत आहे ।
परि वृष्टि वाय जाए । जाली तेथ ॥ १४८२॥
धालेया दिव्यान्न सोआवें । मग जें वायां धाडावें ।
तें आर्त्तीं कां न करावें । उदारपण ॥ १४८३ ॥

रूपकाचे विविध प्रकार ज्ञानेश्वरींत दिसतात. समासयुक्त एकशब्दात्मक निरंग रूपकें तर असंख्य आहेत. 'नादाची टाकसाळ, ' 'कल्पना--चिंतामणीचे गांव, ' ' बोलते अर्णव पीयूखाचे, ' मोहवनींची माधवी 'अशीं समासरहित मालारूपकेंही पुष्कळच आहेत. साङ्गरूपकांत समस्तवस्तु विषयरूपकें अत्यंत बहारीचीं आहेत. ७ व्या अध्यायांतलि माया महानदीचें रूपक, १५ व्यांतील गुरुपूजेचें, १३ व्यांतील पुरुष प्रकृतीचें, ७ व्यांतील शंभर जन्म वाटचाल करणाऱ्या साधक प्रवाशाचें,

---

१८७ श्री ज्ञा. दर्शन--माहित्यखंड पृ. १३३

आठव्यांतील योगयज्ञाचें, १८ व्यांतील गीताप्रासादाचें आणि १६ व्यांतील गुरुवरील चित्सूर्याचें,[१८८] इत्यादी रूपकें प्रसिद्ध आहेत. अशा प्रदीर्घ रूपकांत जेव्हा ज्ञानेश्वर एखादी व्यावहारिक गोष्ट सांगू लागतात तेव्हा तीस Allegory म्हणतां येते. उदा. १३ व्या अध्यायांतील प्रकृतिपुरुष यांच्या शेतीची कथा, १४ व्यांत जगत् रूपी बाळाची जन्मकथा, ७ व्यांत 'इच्छा' कुमारीने द्वेषाबरोबर मांडलेल्या कुलवाडीची कथा इत्यादि. ज्ञानेश्वरांच्या सांग समस्तवस्तुविषय रूपकांत सातव्यांतील मायानदीचें आणि १६ व्यांतील चित्सूर्याचें हीं पहिल्या प्रतीचीं रूपकें होत. रूपकालाच ज्ञानेश्वर 'श्लेष' म्हणतात असें एक मत आहे.

## १०५ 'सूर्यश्लेषाचें कांटाळें' आणि ज्ञानेश्वरांचा श्लेष.

सोळाव्या अध्यायांत 'घाळूनि सूर्यश्लेषाचें कांटाळें' ( ओवी २८ ) असा उल्लेख आहे. त्यांत या ओवीपूर्वी श्रीगुरूवर चित्सूर्याचें जें भव्य रूपक केलें आहे त्याबद्दल क्षमायाचना केली आहे. अर्थात् 'श्लेष' शब्द रूपकालाच उद्देशून वापरला हें उघड आहे. 'उपमा श्लेष कोंदाकोंदी' ( ज्ञा. १३-११५८ )

---

१८८ 'हें रूपक प्लेटोच्या 'रिपब्लिक' मधील सूर्यश्लेषासही मागे टाकील' पहा 'पांच संत कवी' पृ. १२७

यांत ' श्लेष ' शब्दाचा उल्लेख असला तरी ' अनेकार्थी शब्दांचा रमणीय उपयोग ' या अर्थाने श्लेषालंकार संपूर्ण ज्ञानेश्वरींत मुळींच नाही. फक्त एका ओवींत ( १७-३१ ) कृष्ण=काळा, विशेषनाम आणि अर्जुन=पांढरा, विशेषनाम असा श्लेष असावासा वाटला तरी तो रमणीय नाही. तात्पर्य, आजच्या रूढार्थाने ज्ञानेश्वरींत श्लेष नाहीत त्याअर्थी ज्ञानेश्वरांनी श्लेष शब्द ' रूपक ' या अर्थीच वापरला असावा किंवा श्लेषाचा तत्कालीन रूढ अर्थच वेगळा असावा. ' रूपक ' शब्द तद्वाचक अलंकारार्थी अनेक ठिकाणीं आलेला आहे उदा० ' रूपकाचिया कुसरी ' ( १५-४२ ), ' जे वृक्षरूपक परिभाषा ' ( १६-४१ ) हें रूपक परि असो ' (७-२७,) इत्यादि उल्लेखांवरून रूपकाच्या अर्थीच रूपक शब्द त्यांना अभिमत असल्याचें सिद्ध होतें. म्हणून प्रा. जोगांच्या मतें " श्लेष शब्दाचा शास्त्रीय अर्थ ज्ञानेश्वरांना अभिप्रेत नाही .... श्लेष व रूपक हे शब्द ज्ञानेश्वर एकाच अर्थी योजितात... अलंकारांच्या परिभाषेत ... ज्ञानेश्वर .... घोटाळा करित ...." [१८९] परंतु ज्ञानेश्वरांना अशा रीतीने ' अशास्त्रीय ' ठरविणें हें कदाचित् न रुचल्याने डॉ. शं. गो. तुळपुळे यांनी यादवकालांत श्लेषाची कल्पनाच मुळीं दुसरी होती व ती शास्त्रीय होती असें श्री. ह. ना. नेने यांच्या एका

१८९ श्री ज्ञा. दर्शन–सा. खं. पृ. १२८,९

लेखाचा[१९०] हवाला देऊन म्हटलें आहे;[१९१] आणि ही कल्पना ज्ञानेश्वरांना संमत् असल्याने ते 'शास्त्रीय' ठरतात असा त्यांच्या प्रतिपादनाचा रोख आहे. त्यांच्या मतें 'उपमा देऊनि दूषिजे आणि पदार्थ निर्धारिजे तो श्लेष' अशी यादव-कालीन कल्पना आहे.[१९२] वास्तविक ही कल्पना कांही महानुभावीय कवींची आहे, फार तर सर्वच महानुभावांची म्हणतां येईल; परंतु म्हणून ती ज्ञानेश्वरांना संमत् होतीच असें नव्हे. ज्ञानेश्वर आणि कांही महानुभाव कवि यांच्या काव्यां तील अलंकारांची चिकित्सा करून डॉ. मा. गो. देशमुख यांनी तर उलट असा निष्कर्ष काढला आहे की, "ज्ञानेश्वरांच्या मतें उपमानोपमेयांची युगपद् इष्टप्रयोग करतां येण्यासारखी एक-रूपता म्हणजे श्लेष होय."[१९२] वर यादवकालीन म्हणून उल्ले-खिलेल्या 'उपमा देऊनि दूषिजे' ह्या कल्पनेचा अर्थ व्यतिरेक अलंकारासारखा होतो अर्थात् 'उपमाश्लेष कोंदाकोंदी' यांत ज्ञानदेवांना व्यतिरेकाचा अर्थ अभिप्रेत होता असें म्हणावें लागेल. प्रत्यक्ष ज्ञानेश्वरींत मात्र उपमेच्या जोडीने व्यतिरेकाची 'कोंदा-

१९० पहा–भा. इ. सं. मं. त्रै. वर्ष १९ अंक १ १९१ पहा यादवकालीन मराठी भाषा पृ. १२५ १९२ पहा–डॉ. देशमुखकृत 'मराठीचें साहित्यशास्त्र' उल्लेख सातवा पृष्ठ १५० ते १७१

कोंदा' कोठेंही दिसत नसल्याने तो अर्थ घेतां येत नाहीं, शिवाय 'सूर्यश्लेषाचें कांटालें' या उल्लेखापूर्वी सूर्य ह्या उपमानाने व्यतिरेक साधलेला नसल्याने तेथेही तो अर्थ घेतां येत नाही. ह्या दोन्ही ठिकाणीं 'रूपक' हा अर्थच बरोबर लागतो; शिवाय त्याची 'कोंदाकोंदी' ही उघडच दिसते म्हणून प्रा. जोगांच्या मताचा स्वीकार अनिवार्य ठरतो. येथे हें लक्षांत ठेवलें पाहिजे की ज्ञानेश्वरांच्या काळच्या कोणत्याही मराठी कवीला श्लेष म्हणजे शब्दाची अनेकार्थता ही कल्पना अभिप्रेत नव्हती, व तत्कालीन समजुतीप्रमाणे वरील दोन्ही कल्पना शास्त्रसंमत् असल्याने ज्ञानेश्वरांनी त्यांपैकी एक स्वीकारली असल्यास त्यांच्यावर अशास्त्रीयतेचा आरोप करावयाचें कारण उरत नाही.

## १०६ अलंकार सृष्टीचें महत्त्व : ज्ञानेश्वरकालीन महाराष्ट्राचा सुलभ विद्वकोश.

वरील प्रमुख अलंकाराखेरीज उत्प्रेक्षेचे विविध प्रकार, निदर्शना, व्यतिरेक, भ्रांतिमान्, परिकर काव्यलिंग, एकावली इत्यादि विविध अलंकारांचे एकापेक्षा एक सरस नमुने ज्ञानेश्वरींतून दाखवितां येतात. त्यांच्यावेळीं ज्ञात असलेल्या साऱ्या कविसंकेतांचा उपयोगही अगदी सढळ हाताने ( क्वचित् औचित्यभंग पत्करूनही ) त्यांनी केला आहे; इंग्रजी पद्धतीप्रमाणे

Metonymy, Synecdoche इत्यादि लक्षणा प्रकारही मधून मधून दिसतात, परन्तु ज्ञानेश्वरी, अमृतानुभव किंवा अभंग यांतून आढळणाऱ्या या साऱ्या अलंकार-सृष्टीचें महत्त्व प्रकारांच्या विविधतेकरिता नसून विषयांच्या विविधतेकरिता आणि व्यापकतेकरिता आहे. यच्चयावत् ज्ञात सृष्टीचें प्रतिबिंब त्यांत पडलेलें दिसून येतें. त्यांत राव आहेत, रंक आहेत, रावांची तिमजली धवळारें आहेत, तर रंकांचीं तणारेंही आहेत; त्यांत वनराजांच्या आतिथ्या बरोबर गर्दभराजानांही पाहुणेर आहे; अर्थात् माणसाच्या पूर्वजाला कवि विसरला नाही हें सांगावयास नको. उंदीर बेडकादि क्षुद्र सृष्टीबरोबर गोचीड, वाळवी, पोर-किड्यासारखी क्षुद्र कीटक सृष्टि देखील येथे येते. कमलकंदाच्या जोडीने मंहाचे ( पर्यायाने अकलेचे ) कांदेही येथे दिसतात. येथे सागर आहे, सरिता आहे आणि 'आडओहळ' देखील आहेत. गाय बैल, म्हशी, रेडे, शेळ्या सर्वांना आवाहन आहे. येथे चक्रवाक मिथुनाच्या जोडीने पारवापारवी देखील येऊन जातात. यांत विशेष हा की या विविध प्राण्यांचा उल्लेख केवळ नांवापुरते नसून त्यांपैकी कांहींचीं वैशिष्ट्यें अशा कांहीं खुबीदार शब्दांनी व औचित्य साधून वर्णिलीं आहेत की त्यांतील योजकतेने मन थक्क होऊन जाते. सूर्य एक परंतु उपमान म्हणून सुमारें ४०

प्रकारांनी त्याचा उपयोग ज्ञानेश्वरांनी करून घेतला आहे. नुसता स्त्रीसमाज घेतला तरी त्यांचीं कितितरी रूपें आणि अवस्था त्यांत दिसून येतात. त्यांत कोवळी कुमारी आहे, तारुण्याची न्हाळी उतटणारी तरुणी आहे, केळवती नावरी आहे, भोगासक्त प्रिया आहे, आवेगाने गळ्यांतच पडणारी प्रमदा आहे, विरहार्त कामिनी आहे. पतीची दृष्टि दुसऱ्या स्त्रीकडे असल्याचें कळतच फुरंगटून बसणारी मानिनी आहे, एकनिष्ठ पतिव्रता आहे 'प्राणेश्वरं देशें' अग्निप्रवेश करणारी साध्वी सती आहे. भागांचा होम करणाऱ्या गतधवाही आहेत. बालकाला लेणें लेववून सुखाचे सोहळे भोगणारी 'माउली' आहे; त्याच्या स्तनपानाची वात्सल्याने दक्षता घेणारी 'वत्सला' आहे तसेंच पुत्र प्रेमाला पारख्या झालेल्या दुर्दैवी वांझोट्या आहेत आणि साठाव्या वर्षी सुंठ फुललेल्या भाग्यवतीही आहेत. पतीशीं गोड बोलून काम साधून घेणारी जारिणीही येथे दिसते. आपले अवयव झाकण्याची दक्षता घेणारी कुलवधू आहे, आणि अवयवाऐवजी वय झाकणारी, टका संपल्यावर दाराशीं उभें न राहूं देणारी बाजारबसवी देखील आहे !!

ज्ञानेश्वरींत कुम्ती आहे, सोंगटी आहे, चेंडूलगोरी आहे. बैठे, मर्दानी व मैदानी असे विविध खेळ तींत आहेत. तत्कालीन लोकव्यवहार, लोकरीति, सामाजिक संकेत, निरनिराळे उद्योग-

धंदे, शास्त्राभ्यास, ज्योतिषादिकांचा प्रचार इत्यादि अनेक गोष्टींचा उल्लेख ज्ञानेश्वरींत अगदी सहजगत्या येऊन जातो. सातव्या अध्यायांतील टांकसाळीचें वर्णन तर या संबंधांत विशेष लक्षांत भरण्यासारखें आहे. सोनें, रुपें, चामड्याच्या तुकड्यावर शिक्के मारलेल्या चलनी नोटा, 'सांडपधरें' हा सोन्याचा भाव इत्यादि उल्लेख इतिहासशास्त्र आणि समाजशास्त्र दृष्टया महत्त्वाचे आहेत. किंबहुना **ज्ञानेश्वरींतील अलंकारसृष्टि म्हणजे ज्ञानेश्वरकालीन महाराष्ट्राचा 'सुलभ विश्वकोश होय.** या अलंकार सृष्टीच्या सहाय्यानें 'ज्ञानेश्वर कालीन समाजरचना,' 'ज्ञानेश्वरकालीन राजकीय परिस्थिति,' 'ज्ञा. स्त्री समाज' 'ज्ञा. लोकाचार,' 'ज्ञा. आर्थिक स्थिति,' 'ज्ञा. उद्योगधंदे' इत्यादि निबंध विद्वानांना लिहितां आले.[१९१] ज्ञानेश्वरींचे हे प्रापंचिक विशेष जितके गौरवून उल्लेखावेत तेवढे थोडेच. परंतु त्यामुळे ज्ञानेश्वरीचा मुख्य विषय मात्र डोळ्याआड कधीही होत नाही हा विशेष होय उलट तो विषय विशेषत्वानें समजतो. ज्ञानेश्वरांच्या सौंदर्यसृष्टींतील रसालंकाराची साखर अध्यात्म–सिद्धान्ताच्या मूळच्याच गोड आणि पौष्टिक गोरसांत

---

१९१ पहा पांगारकरकृत म. वा. इति. खंड १ पृष्ठें ७३९ ते ७९६ वा एतद्विषयक निबंध, 'श्री ज्ञानेश्वर दर्शन' यांत.

पूर्णपणें एक जीव झालेली आहे. अध्यात्म आणि काव्य यांचें असें परमैक्य ज्ञानेश्वरीखेरीज इतर मराठी ग्रंथांतून आढळून येत नाही.

## १०७ ज्ञानेश्वर आणि काव्यशास्त्र[१९४]

## काव्यानंदाचें कारण–सविकल्प 'हृदयसंवाद'.

प्रा. रा. श्री. जोग म्हणतात, "सामान्यपणें बोलावयाचें झाल्यास ज्ञानेश्वरांस साहित्यशास्त्राचा परिचय साधारण बहुश्रुत माणसास जेवढा असतो तेवढाच असावा."[१९५] ज्ञानेश्वरींत साहित्यशास्त्रविषयक अनेक शब्दप्रयोग आलेले आहेत, व त्यावरून त्यांनी साहित्यशास्त्राचा अभ्यास केला होता असा निष्कर्ष काढण्याचे प्रयत्न झाले आहेत.[१९६] परंतु ज्ञानेश्वरांच्या ओव्यांतून व अभंगांतून योगाभ्यासाचा जसा आत्मप्रत्यय दिसतो तसा साहित्यशास्त्राभ्यासाचा कांही दिसत नाही हें ज्ञानेश्वरींच्या अनाग्रही अभ्यासकाला मान्य करावें लागतें.[१९७] ज्ञानेश्वरांचे साहित्यशास्त्रविषयक कांही विचार पुढे दिले आहेत.

---

१९४ हा परिच्छेद लिहितांना डॉ. मा. गो. देशमुख यांच्या 'मराठीचें साहित्यशास्त्र' चा विशेष उपयोग झाला असल्याने लेखक त्या ग्रंथाचा येथे कृतज्ञपणें उल्लेख करीत आहे. १९५ पहा ज्ञा. दर्शन, साहित्य खंड, पृ. १३० १९६ 'श्री ज्ञानदेव' पृ. २२९ १९७ पहा– 'ज्ञानेश्वरी सर्वस्व' ले. न. चिं. केळकर पृ. २८३

'वाणीने बोलले जाणारें शब्दजात' तें सारें 'वाङ्मय' व त्यापैकी संग्राह्य असा चातुर्यप्रधान विदग्ध भाग म्हणजे 'नागर बोल' आणि नागर बोलांपैकी सिद्ध प्रज्ञेमुळे स्फुरलेले रसप्रधान बोल म्हणजे 'साहित्य' अशी ज्ञानेश्वरांची विभागणी दिसते. 'काव्य' हा स्वतंत्र वाङ्मयप्रकार असून परमेश्वरी तत्त्वाचें प्रतिपादन करणारें काव्य सर्वश्रेष्ठ होय. 'साहित्य' म्हणजे पद्यबंधाची बाह्य शोभा व दृश्रृंगारि अलंकारादिकांची सामग्री. ( बोलिया कीं होति लेणें। साहित्यासि ॥ ज्ञा. १०-४१ ॥ ) ईश्वर-यशोगानाने होणारी मोक्षप्राप्ति किंवा आत्मज्ञान हें काव्याचेंच कार्य पण सध्याच प्रापंचिक व्यवहाराचें अंतिम ध्येय असल्याने तें बाजूस ठेवलें तर 'निर्भर आनंद' हें ज्ञानेश्वरांच्या मतें काव्याचें मुख्य प्रयोजन आहे. ( तरि तुम्हा रसिकां जोगें। बाखाण शोधावें लागे । ज्ञा. १३—३३३ ॥ आनंदाचें आवारुं । मांडूं जगा ॥ ज्ञा. १३—११५४ ॥ ). विद्वज्जन परितोषाची आवश्यकता कालिदासाप्रमाणेच[१९८] ज्ञानेश्वरांनाही अभिप्रेत आहे. प्रमुख काव्यकारण ( हेतु ) श्रीसद्गुरूची कृपा होय. काव्याची मूलशक्ति 'प्रज्ञा' व इतर स्वाभाविक शक्ति

---

१९८ 'आपरितोषाद्विदुषां न साधु मन्ये प्रयोगविज्ञानम्' अभिज्ञान शाकुंतल १-२ पहा (ज्ञा. १८-१७२१ ते २८) आणि मराठीचे साहित्यशास्त्र पृ. ९२

मन, बुद्धि, मति, स्फूर्ति व उन्मेष इत्यादि. ( ज्ञा. १४-१९ ते २४ )....तुझा **प्रसादु चंद्रमा** । करूं मज पूर्णिमा । **स्फूर्ति**ची जी ।। जिया पाहिलें मातें । **उन्मेष** सागरिचें भरितें । वोसंडैल तें । **रसवृत्ति** चें ।। १४-२३,२४ ।। असें ते म्हणतात. प्रज्ञेला किंवा स्फूर्तीला उन्मेष फुटले म्हणजे रसवृत्तीचा उत्कर्ष होतो अशी त्यांची **मीमांसा** दिसते. अलंकारासंबंधांत थोडी चर्चा पूर्वी आलेलीच आहे. ज्ञानेश्वर **श्लेष** म्हणजे रूपक समजतात हें तेथे सांगितलेंच आहे. ज्ञानेश्वरांनी **'रेखा'** शब्द तीन ठिकाणीं [१९९] वापरला आहे. 'रसाचा आविष्कार करण्याची शैली' या अर्थीही एक नवीन संज्ञा त्यांनी दिली, असें डॉ. मा. गो. देशमुख यांचें मत आहे.

ज्ञानेश्वरींत **गुणदोष** हा शब्द ' या लागि मी गुणदोष । विर्षी क्षमाविना विशष ।' ( १८–१७४८ ) या ठिकाणीं आला असला तरी तो **काव्यगुण** आणि **काव्यदोष** या साहित्य-शास्त्रीय संज्ञांकरिताच आलेला आहे, असें निश्चयाने म्हणतां येत नाही. प्रसाद माधुर्य ओजादि काव्य गुणांनी मंडित झालेल्या

---

१९९ 'रेखा आंगिकभाव' (१-४) जें साहित्य आणि शांति । हे रेखा दिसे बोलती । (४-२१५), नवल बोलतिये रेखेची वाहणी । (६-१८)

ज्ञानेश्वरींत कांहीं काव्यदोष दिसतात. संधि-पद-विश्लेषादि दोष किंवा भिन्न भाषांतील शब्दांचे समास करण्याने येणारा असाधुत्वाचा दोष, हे त्याकाळीं क्वचित् दोषरूप मानले जात नसतील, परंतु औपम्यावर आधारलेल्या अलंकारांतुन उपमेयोपमानांत स्वभावसाधर्म्य कमी असण्याचा दोष, (ज्ञा. ३-२५५ २५६) किंवा विभिभेदाचा किंवा जातिगत न्यूनत्वाचा दोष (ज्ञा. १३--५००,१,२; ९-६३,६४; १६-१७०,१, इत्यादि अलंकारदोषामुळे क्वचित् अनुचितार्थंतर सूचित होतें 'अमृतें चि मरिजे। जरि विखेंसीं सेविजे। (ज्ञा. २-२२४) येथील उपमा किती सदोष आहे! १५-२२८,२२९* मध्ये विपरीतार्थ आणि ७-१८४ मध्ये अमतपरार्थप्रयोग हे दोष स्पष्ट दिसतात १३-७०४ मध्ये गाढव आणि गाढवी यांच्या रतिविलासाच्या उल्लेखास ग्राम्य तरी म्हणावें लागेल किंवा अश्लील तरी म्हणावें लागेल. आत्मज्ञानसंपन्न संतांवरील प्रेमास कामुकाच्या कामिनीविषयक आकर्षणाची उपमा देणें अश्लील होय असें न. चि. केळकरांचें मत आहे.[२००] ज्ञानेश्वरींत असे कांहीं काव्यदोष असले तरी 'एकोहि दोषो गुणसन्निपाते। निमज्जतींदो किरणेष्विवांक:।' या न्यायाने ते लोपून जातात म्हणून त्यांचा विस्तार न करतां काव्याचा आत्मा जो 'रस' त्याविषयीं ज्ञानेश्वरांची कल्पना बघूं या.

---

२०० 'ज्ञानेश्वरी सर्वस्व' पृ. २९४ * ह्या ओव्या साखरप्रत व चित्रशाळा प्रत यांतील आहेत.

**एः निर्विकल्प हृदय संवाद.**

रसाचें अधिष्ठान श्रोतृहृदय होय, हें ज्ञानेश्वरीच्या नवव्या अध्यायाच्या मंगलाचरणांतील ओव्यांवरून स्पष्ट होतें. रसकारण अर्थात्‌च 'भाव' होत. ह्या भावाविष्कारानें रससिध्दि होते हा आशय 'उदैलेयां भावा रूप। करितां लागे रसवृत्तिचें पडप।' (ज्ञा. १०-४५) ह्यांत आलेला आहे. ज्ञानेश्वरींत अष्टसात्त्विक भावांचा उल्लेख अनेक ठिकाणीं येतो. रस म्हणजे अंतःकरणाची द्रवावस्था, आणि त्याच्या मुळाशीं असलेले तत्त्व 'हृदयसंवाद' हें होय. 'म्हणौनि संवादाचा सुवाऊ ढळे। तरि हृदयाकाश सारस्वतें ऊलें। श्रोता दुश्चिता तरी वितुळे। मांडला रसु ॥' (ज्ञा. ९-२८) यांत हा हृदयसंवाद सांगितला आहे. हा 'संवाद' जेथे असेल 'तेथे अभिप्राऊचि अभिप्रायातें विये' (ज्ञा. ९-२७) अशी स्थिति होते. भरतमुनि, भट्ट लोल्लट, शंकुक, अभिनवगुप्त इत्यादिकांनी रससिध्दीकरिता आवश्यक असणाऱ्या हृदयसंवादाचें जसें महत्त्व वर्णिलें आहे तसेंच चार्ल्स् विलियम्स यांनी '——a conscious communication of emotion' अशी कलेची व्याख्या करतांना, किंवा टॉलस्टाय यांनीही ' To evoke in oneself a feeling one has experienced———and so to transmit that feeling that others experience the same feeling' असें कलेचें कार्य

मांगतांना मानलेलें आहे. मात्र ज्ञानेश्वरांचा 'हृदय संवाद' सविकल्प आहे हें लक्षांत ठेवलें पाहिजे. कै. न. चिं. केळकर, आणि श्री. प्रा. द. के. केळकर यांनी काव्यानंदाची मीमांसा करतांना सांगितलेल्या 'सविकल्प समाधि' व 'स्वायत तादात्म्य ह्या उपपत्तींची आठवण विचक्षण वाचकास येथे होईल. ज्ञानेश्वरांच्या मताने कलानंदांत पाहिजे असलेलें 'तादात्म्य' किंवा 'समाधि' किंवा 'हृदयसंवाद' हा 'स्वायत्त' किंवा 'सविकल्प' नसला तर 'दो होटीं एक बोलणें। दोहीं चरणीं एक चालणें' (ज्ञा. १५-४२१) होऊन 'पाघतें पूसतें' एक होतात. मग कोठला संवादसुखाचा आनंद! मग संवादसुखाचा रस 'नासैल थितें॥ (ज्ञा. १५-४२४) हें साहाजीक होय. अर्थात द्वैत कायम राहिलें तरच म्हणजे आपलें स्थान न सोडलें तरच कलानंद उपभोगतां येईल. ज्ञानेश्वरांच्या प्रतिभेने प्रसविलेला अगदी यथार्थ आणि काव्यपूर्ण दृष्टांत येथे सांगतां येईल. ते म्हणतात, "कां आपुला ठाऊनि न संडितां। आलिंगिजे चंद्रु प्रकटतां। हा अनुरागु भोगितां। कुमुदिनी जाणें॥ (ज्ञा. १-६०). काव्याचा आत्मा रस होय ही कल्पना त्यांना संमत् असल्याचें अनेक ओव्यांवरून सहज स्पष्ट होत असल्याने उदाहरणांची आवश्यकता नाही. 'नवरसीं वरिखैन मीं। (ज्ञा. १३-११६३) असल्या प्रतिज्ञा-वाक्यां

वरून त्यांच्या मतें साहित्यांतील आत्मतत्त्व रसच आहे हें जसें कळतें तसेंच त्यांना रससंख्या 'नऊ' ही मान्य होती हें ही कळतें. त्यांच्या वेळचा रसराज म्हणून शृंगाराला असलेलें महत्त्व त्यांनी नाकारलें असून शृंगाराच्या माथ्यावर पाय ठेवणाऱ्या 'शांतरसाला रसराजत्व मिळवून दिलें आहे. त्यांच्या नवरसांत 'भक्ति' ला स्थान नाही. 'भक्ति-रस' स्पष्ट प्रतिबिंबित होणारा भाग ज्ञानेश्वरींत असला तरी त्यांच्या मतें 'भक्ति' चा समावेश 'शांत' रसांत होत असावा. भास्करभट्ट, दामोदर पंडित, विश्वनाथ आणि तुकाराम हे भक्तिरसाचे मराठींतील पुरस्कर्ते होत. वामन पंडिताने भक्तिरसाचा पुढे हिरिरीने पुरस्कार केला. ज्ञानेश्वरानंतरच्या काळांत मराठी काव्यांत भक्तीला केवळ रसत्वाचा नव्हे तर सर्वोत्कृष्ट काव्यतत्त्वाचा मान मिळालेला आहे. प्रा. देशमुख म्हणतात, "मराठी संत कवींनी आपल्या काव्यमीमांसेंत 'भक्ति' हें काव्यतत्त्व सर्वोत्कृष्ट ठरवून आपल्या नव्या दृष्टीने संस्कृत साहित्यशास्त्राला उजळा दिला व सर्वव्यापी भक्तितत्त्वाच्या आधारावर, प्रत्येक बाबतींत अभिनव अशा विचारसरणीचें व बहुतांशीं स्वतंत्र असें 'मराठीचें साहित्यशास्त्र' निर्माण केलें. [२०१] या विधानांतील अतिशयोक्ति वगळून मराठी संतांनी भक्तीला दिलेलें रसत्व आणि 'शृंगाराच्या माथां पाय ठेवण्याइतपत' तिला प्राप्त झालेलें श्रेष्ठत्व मान्य करावयास हरकत नसावी.

---

२०१ 'मराठीचें साहित्य शास्त्र' पृ. २९५

## १०८ प्रसाद-माधुर्य-ओजः 'कमळपत्रांच्या ताटांत चंद्राच्या अमृतकिरणांचें जेवण.'

साहित्यशास्त्रांत **प्रसाद, माधुर्य** आणि **ओज** हे काव्याचे प्रधान गुण मानले आहेत. ज्ञानेश्वरांची वाणी प्रासादिक आहे याबद्दल दोन मतें नाहीत. त्यांच्या वाणीच्या रूपाने जणु मूर्तिमंत प्रसाद अवतरला आहे असें म्हणतां येईल, कारण प्रसाद नाही अशी ओवी हुडकूनही मिळणें दुर्मिळ ! ऋषींची वाणी अर्थाची वाट पाहात नाही उलट अर्थच त्यांच्या वाणीपुढे हात जोडून उभा असतो असें म्हणतात. येथेही 'अर्थु बोलाची वाट पाहे' अशी स्थिति आहे. जेथे कवीच्या शब्दांची ही योग्यता तेथे ते शब्द ऐकणाऱ्यांची स्थिति 'तेथ मनचि धांवे बाहिरे' अशी होऊन जात असल्यास नवल नाही. 'बोला आधी झोंबिजे प्रमेयासि ॥ '' या उत्तुंग श्रेणीची शक्यता निर्माण करणाऱ्या येथील प्रसाद गुणाला वक्तृत्व गुणाची जोड मिळाली आहे. त्यांचें वक्तृत्व ऐसपैस असतें; त्याचा विस्तार आकाशाप्रमाणे विशाल, त्याचा ओघ गंगेप्रमाणे संथ नि शांत, त्याचें स्वरूप सागराप्रमाणे गंभीर, आणि त्याची शोभा कोजागरीच्या सुषमेप्रमाणे प्रसन्न आहे. आपल्या प्रासादिक व्याख्यानाच्या शेवटीं अविनाशी आनंदाचा प्रसाद हा व्याख्याता सर्व श्रोत्यांना देत असतो. जी गोष्ट प्रसादाची तीच माधुर्याची. ज्ञानेश्वरांना संगीत येत होतें काय हें माहित नसलें तरी ज्ञानेश्वरींतील 'माधुर्या (लाही) मधुरता' आणणाऱ्या गोड स्वररचनेवरून शब्दसंगीताकडे ते किती

कटाक्षाने लक्ष पुरवीत तें स्पष्ट होतें. माधुर्याने माखलेल्या अंतरं गांतूनच '....रसालपणाचेया लोभा। किं श्रवणींचि होथि जीभा। बोलें इंद्रियां लागे कलभा [भांडण] येकमेकां ॥ ज्ञा.६-१६॥ या प्रतीचें स्वर्गसंगीत निर्माण होऊं शकतें. " The man that hath not music in his soul ' can never be a great poet.' असें कोलरीज म्हणतो. त्याच्या मतें ' The delight in richness and sweetness of sound.' हें उत्तम काव्याच पहिलें लक्षण होय. प्रसाद आणि माधुर्य इकडे दृष्टि ठेवून कित्येक शब्द ज्ञानेश्वरांनी नवीनच पाडले, तर कित्येकांना अभिनव पोशाख पेहरले. संगीतांतील स्वरसौंदर्याची जाणीवही त्यांना होती असें दिसतें, कारण गायनाचा उल्लेख ज्ञा. १८-१७१५,१७१६ मध्ये आलेला आहे. चित्तास प्रदीप्त करविणारा ओजोगुण काव्यास सामर्थ्य प्राप्त करून देतो, त्याची परिणामकारता वाढवितो. या गुणाचा वापर वीर, रौद्र, बीभत्सादि रसांत विशेष प्रभावी ठरतो. ' नक्षत्रांचे होत फुटाणे ' बापुड्या त्रैलोक्याचा होतसे हुरडा, ' 'जिभांचा लळलळाट देखिला' यांतील वर्णन किती ओजस्वी आहे ! ' उदोअस्तूंचें लोंढे। पाडित जन्ममृत्युचे चोंढे। जेथ पांच भौतिक बुडडे। होंत जात ' ॥ ज्ञा. ७-७४ ॥, किंवा ' पृथ्वीतळ उळंडों पात। आकाश असे अडदरत। तेथ रासीभा होंत। नक्षत्रांचा ॥ १-५६ ॥ इत्यादि अनेक ओव्यांतून वर्णनाची ओजस्विता आणि कल्पनेची विशालता दोन्ही एकदम प्रतीत होतात. माधुर्य आणि प्रसादा प्रमाणे प्रसाद आणि ओजानें रसपरिपोषक मिश्रण सुंदूर

झालेलें दिसून येतें. प्रसाद माधुर्य ओजादि गुणांनी आणि नवरसांनी रसरसलेलें हे अपूर्व प्रमेयरसायन म्हणजे कमळ-पत्रांच्या ताटांत चंद्राच्या अमृत किरणांचें जेवणच होय. मात्र असें जेवण जेवण्याकरिता चकोराचें हळुवार अंतःकरण पाहिजे.

## १०९ महाकवीच्या प्रतिभेचा साक्षात्कार

'अभिनव वाग्विलासिनी' आणि 'चातुर्यकलाकामिनी' अशा दिव्य प्रतिभेच्या अस्तित्वाशिवाय 'ज्ञानेश्वरी' सारखा ग्रंथ संभवू शकत नाही. 'हे आदिशक्तिच ठेवणें' असून पूर्वसंचिता-मुळे त्याचा लाभ होतो अशी समर्थ रामदासादि अनेक कवींची कल्पना ज्ञानेश्वरांनाही मान्य होती. हजारों तारकांनी आकाशांत चमचमाट करून सोडला तरी अमृत वर्षावाचें सामर्थ्य असलेला चंद्र एखादाच, त्याप्रमाणे या दिव्य प्रतिभेने संपन्न झालेला महाकवि एखादाच. 'नवनवोन्मेषशालिनी शक्ति' ही प्रतिभेची प्रसिद्ध व्याख्या आहे. नवनिर्मितीची सृजनशक्ति म्हणजेच creative imagination होय. कल्पनेचे सोज्वळ स्वरूप उचित रूपाने अवतीर्ण झालें की तेथे 'प्रतिभा' आहे असें आपण म्हणतो. 'प्रतिभेच्या स्वरूपांत उज्वल कल्पनाशक्ति व सौंदर्यसमीक्षक चोखंदळ विवेक यांचा सुवर्ण संगम झालेला असतो.'[२०२] यांतील 'चोखंदळ विवेक' फारच महत्त्वाचा आहे,

---

२०२ 'काव्यालोचन' पृ. ७४ ले. प्रा. द. के. केळकर.

कारण त्या विवेकाच्या वापरावर काव्याचें चिरंतनत्व ठरावयाचें असतें. या विवेकाच्या अ-वापरामुळेच तत्त्ववेत्या कवीश्वरांना नीति आणि कलोपासनेचे धडे उगवल्या साहित्यिकांना द्यावे लागतात, व कधी कधी पावित्र्यविडंबनाचे वाद शमवावे लागतात!

हा विवेक महत्त्वाचा आहे याचें दुसरें कारण असें की काव्यांत सत्यम् शिवम् आणि सुंदरम् असें त्रिविध ऐश्वर्य अभेदाने प्रतीत होण्यावर आणि त्या प्रतीतीच्या कमीअधिक सखोलतेवर कवीच्या कीर्ति-ऐश्वर्याची मदार उभी राहते. ज्ञानेश्वरासारखे कवीश्वर कवि-कीर्ति-ऐश्वर्याचे मेरुदंड किंवा मापनदंड ठरत असल्याने त्यांच्या काव्यांत सत्य-शिव-सौंदर्याचा त्रिवेणी संगम झाला आहे हें सांगावयास नकोच. 'Do not all charms fly at the touch of cold Philosophy' असें म्हणणारे कवि[२०३] Beauty is truth, Truth is beuty' यांतच म्हणजे सत्य नि सौंदर्यांतच 'सर्वस्व'[२०४] मानतात, व राजी होतात परंतु कवींद्रमात्र[२०५] **जें खरोखर मंगलमय आहे तेंच सौंदर्य सौंदर्यमूर्ति हीच पूर्ण मंगलमूर्ति, आणि मंगलमूर्ति हीच सौंदर्यांची परिणती अशी पुस्ती 'सौंदर्य हेंच सत्य व सत्य हेंच सौंदर्य'** या विधानामागे जोडतात. ज्ञानेश्वरं हे अभिजात कवि असल्याने सौंदर्याच्या महत्त्वाची उपेक्षा

---

२०३ आंग्लकवि Keats कीट्स. २०४ पहा—'That is all, Ye know on earth and all you need to know-
२०५ रविंद्रनाथ टागोर.

त्यांनी मुळीच केली नाही. प्रा. जोग 'चक्षुर्ग्राह्य' सौंदर्य, 'बुद्धिगम्य' सौंदर्य, आणि ' भावगम्य ' सौंदर्य असे सौंदर्याचे तीनप्रकार सांगतात.[२०६] या त्रिविध सौंदर्याची माहिती ज्ञानेश्वरांना असल्या-सारखी दिसते, निदान बाह्य किंवा ऐंद्रियिक सौंदर्याचें आकर्षण योग्य रीतीने उत्पन्न करवून तद्द्वारा मानससौंदर्याचा साक्षात्कार घडवावयाचा अशी त्यांची पद्धत आहे. प्रा. ग. वा. कवीश्वर म्हणतात, "........बाह्य इंद्रियग्राह्य सौंदर्याचा उपभोग हा स्वतःच साध्य नसून मानासिक व शेवटीं आध्यात्मिक सौंदर्यानुभवाचें केवळ एक साधन" मात्र होय.[२०७] ज्ञानेश्वरींतील ऐंद्रियिक सौंदर्यसुखाची परिणति आध्यात्मिक अनुभूतींतच होते ज्ञानेश्वरांनी ऐंद्रियिक सौंदर्याचें सामर्थ्य व महत्त्व अनेक ठिकाणीं गायिलें आहे एवढेंच नव्हे तर ज्ञानेश्वरांनी सुचविलेला क्रमही त्यांनी सांगितला असल्याचें सूक्ष्म अभ्यासकास आढळून येईल.[२०८] परंतु सौंदर्य संवेदने बरोबर विश्वाच्या किंवा

---

२०६ पहा–'सौंदर्य शोध व आनंदबोध' ले प्रा. रा. श्री जोग, पृष्ठ २९७

२०७ पहा–नीति आणि कलोपासना' ले. प्रा. ग वा. कवीश्वर, पृ. ७२

२०८ ज्ञानेश्वर म्हणतात, प्रथम कावरदर्शनाने डोळे, व श्रवणाने कान तृप्त होतात. ' जैसी काना आर्दि दोठि उपेगा जाये' ॥ ज्ञा. ७-२०१ ॥ यांत त्यांचा क्रमही सांगितला आहे आणि त्यानंतर अर्थबोध होऊन बुद्धि आणि मन यांची तृप्ति होते. श्रवण सुखाचे महत्त्व ज्ञानेश्वर वर्णितात तें असें की या श्रवणाने मननिदिध्यासाला देखील जिंकून घेतलें असून (ज्ञा. १८-१०२५) हें सुख नुसतें एका इंद्रियाचें ( कर्णेंद्रियाचें ) असलें तरी बाकीचीं सर्वेंद्रियें पोसविलीं।

संसृतीच्या टीकेस[२०९] आवश्यक असणारें तत्त्वज्ञानही त्यांनी आणलें आहे, आणि शिव–अशिवाचा चोखंदळ विवेक करून व त्यास सौंदर्याच्या दृष्टीने समीक्षून आपल्या प्रतिभेचें भांडार विश्वजनासाठी खुलें केलें आहे. कवीचा महाकवि होतो तो अमूर्त तत्त्वविचारांना मांगल्याच्या मुशींत ओतून सौंदर्याच्या रूपांत साकार करतो म्हणून. विश्वाला गवसणी घालूं शकणाऱ्या विचारांचें वैभव, किंवा इह-पर संसृतीच्या सत्-तत्त्वांचें सुंदर

---

श्रवणा करवीं ॥ ज्ञा. १८–१७२६॥ असें त्याचें सामर्थ्य आहे. या ऐंद्रियिक सौंदर्याने मननिदिध्यासादिकाची खटपट करावी न लागतांही मानसिक सौंदर्याची प्रतीति होऊं लागली की संजयाप्रमाणेच '........ सात्विका आठां । चांवरु मांडता उमेठा । संजय जाला असे चौहटा । भावभवणाच्या ॥ ज्ञा. १८–१५८८॥ असा अनुभव येतो. पण एवढ्याने भागत नाही. या मानस सुखाची जात कशी आहे व ज्ञानेश्वर सांगतात की "तेया सुखाची ऐसी जाती । जें आपण पां चि धरी शांति ।" (ज्ञा.-१८–१५८९) व पुढे आध्यात्मिक सौंदर्यानुभवाची परिसीमा असा 'छत्र--आनंद भला' त्यानुळ (ज्ञा. १८-१७२६) प्राप्त होते, 'ब्रह्मविद्येची खाणि' (ज्ञा. १३--११५५) दिसूं लागेत, आणि 'समाधि' घन जोडता येतें (ज्ञा. १३–११५३). केवळ आखरांचिया चि भांभा (शोभेने) इद्रियें, जींति ॥ज्ञा. ७--२०२॥ ह्या पाहिल्या पायरीवरून समाधिसुखाच्या तिसऱ्या पायरीवर जावयाला मुळीही वेळ लागत नाही, असें ज्ञानदेवांचें म्हणणें आहे. 'तैसा प्रबंधु हा श्रवणीं । लागत खे ॐ समाधि आणि ।' (१८--१७२३) किंवा तैसीं पाठाची ते वाटी । लाविजे ना जंव वोठी तंव ब्रह्मतेची पुष्टी । पईल आंगा ॥ ज्ञा. १८--१६७१ ॥ हा ज्ञानेश्वरांच्या सौंदर्यानुभूतीचा उत्कर्षबिंदु आहे.

२०९. मॅथ्यू आर्नोल्डची प्रसिध्द व्याख्या पहा— Poetry is the criticism of life.

आविष्करण हा महाकाव्याचा निकष होय.[२१०] कोलरिज म्हणतो की तत्त्वज्ञता ही तर महाकवीची पहिली आवश्यकता आहे. "No man was ever yet a great poet without being at the same time a profound philosopher" जगाच्या सच्चिदानंद स्वरूपाचा साक्षात्कार घडलेल्या ज्ञानेश्वरांना हें लक्षण यथार्थपणें लागूं पडते यांत संशय नाही.

**११० " आतां विश्वात्मकें देवें । ....तोषोनि मज देयावें । पसाय दान हें ॥ "**

वर विश्वजनासाठी असें एका ठिकाणीं म्हटलें आहे. ज्ञानेश्वरीच्या शेवटीं ज्ञानेश्वरांनी ' विश्वात्मक ' देवाजवळ जें ' पसाय दान ' मागितलें आहे तें पाहतां केवळ वात्सल्याची प्रतिमूर्ति अशा मातेच्या प्रेमळ नि हळुवार हृदयाची साक्ष घडते. कवीची विशाल मानवता त्यांत प्रतिबिंबित झाली आहे. 'जे का रंजले गांजले' अशा 'तापलेया जगा कारणें' ज्ञानेश्वरी जन्माला आली आहे. रावापासून रंकापावेतो, ब्राह्मणापासून अंत्यजापावेतो, आणि साधूपासून अत्यंत दुराचारी पापयोनिपावेतो, किंबहुना मानवापासून क्षुद्र कीटकापावेतो अखिल जीवसृष्टीच्या कल्याणार्थ कवि मागणें मागत आहे. ' **वांछिल तें तें लाहो । प्राणि**

---

२१० संस्कृत साहित्यशास्त्रांतील महाकाव्याची व्याख्या मुख्यत: बाह्यांगाला अनुलक्षून असल्याने येथे अपुरी वाटते.

जात ॥ ' केवळ मांगल्याचा वर्षाव सर्व दूर होत राहावा अशी कवीची इच्छा आहे.

' सर्व मानवांचें ऐक्य व्हावे म्हणून झटणारा, सर्वत्र समता, आणि बंधुभाव हेंच ज्याचे ध्येय, ज्याला आपपर नाही, सर्व मानवजातीच्या हितमंगलासाठी जो उभा आहे........प्रेम हीच ज्याची शक्ति, त्याग हेंच ज्याचें वैभव ...तो महापुरुष होय. तो सत्कलेचा आदर्श.... **संत कृपेचे हे दीप ! करिती साधका निष्पाप** ॥ असे जे मंगल पथ दाखविणारे संत—" जगा हो आवारू । आनंदाचे " हे ज्यांचें जगदैक्याचें ध्येय त्यांच्या पाठोपाठ कलांनी जावें असा खऱ्या कलावंतांना आदेश देऊन के साने गुरुजी विचारतात,[२११]

**' तुम्ही कलावंतांनी कॉलजांतल्या पांखरांच्या लीला वर्णन करण्यांतच सारी कला खर्च करावी, मग महापुरुषानें दाखविलेल्या ध्येयांना कोण पूजील, त्या ध्येयांना कोण रंगविल, राष्ट्र कोण उभें करील ? '**

आजचे साहित्यकलाकोविद् या प्रश्नाची दखल घेतील काय ? आणि प्रत्यक्ष कृतीने उत्तर देतील काय ? प्रत्यक्ष कृतीने उत्तर देतां येण्यासारख्या सामर्थ्याचें पसायदान आम्हांस लाभेल काय ?

---

२११ ' कला म्हणजे काय ' ले. कै. पां स. साने प्रस्तावना पृ. ८ व ११.

## १११ 'आतां विश्वात्मकें देवें। एणें वाग्यज्ञें तोषावें।'

श्री शारदापति मयूरेशाच्या आशीर्वादाने सुरू केलेल्या व त्याच्याच कृपेने पूर्ण झालेल्या ह्या लहानशा वाक्कृतीने विश्वात्मक देवास संतोष व्हावा ही नम्र प्रार्थना आहे. ज्ञानेश्वरांची कृति भावे म्हणतात त्याप्रमाणे 'ज्ञानेश्वरी' आहे आणि 'वागीश्वरी' आहे! **ज्ञानेश्वर हे महाराष्ट्रवाणीचे 'श्रीमदाद्य शंकराचार्य'** होत. बहुजन समाज त्यांच्या अद्वैतसिद्धान्ताच्या कक्षेबाहेर गेला नाही. 'सर्व सुखाचि आदि। जे प्रमेय महानिधि।' त्या **अद्वैत विश्वेचें मराठी मूलपीठ म्हणजे ज्ञानेश्वरी** होय. शारदेच्या लावण्यरत्न भांडाराचें प्रदर्शन येथे उघडलेलें असल्याने आणि रसांची रंगपंचमी साजेशा थाटाने साजरी होत असल्याने मराठी वाङ्मयांत हा ग्रंथ 'गरुवातेचा ठाऊ' झाला आणि महाकाव्यांत 'राजा' म्हणून मिरवला तर नवल नाही. अध्यात्माच्या परिभाषेंत असें म्हणता येईल कीं ज्ञानेश्वर हे '**पुरुषोत्तम**' होत आणि ज्ञानेश्वरी ही त्यांनी निर्मिलेली जगज्जननी '**आदिशक्ति**' होय. या जोडांवर आजपावेतो अनेक साहित्यप्रभूंनी, साधुसंतांनी आणि कलाकोविदांनी सौगंधिक कुसुमांच्या माळा अर्पण करून त्यांना पूजिलें आहे. परंतु एखाद्याजवळ त्या नसतील तर त्याने निराश कां व्हावें! पंचामृताच्या अभावीं साध्या पाण्याचा अभिषेकसुध्दां सदा-शिव महादेवाला चालतोच ना! भक्ति तेवढी पाहिजे. 'भावाचें

पाहुणे ' असलेल्या देवाला भक्तीने अर्पण केलेलें पत्र, पुष्प, फळ काहीही चालत असल्याने प्रस्तुत लेखक विनम्र भावाने आणि दृढ श्रद्धेने हीं एकशें अकरा दूर्वादलें अर्पण करीत आहे. ज्ञानेश्वरांकडून त्यांच्याच शद्वांत किंचित् फरक करण्याची परवानगी घेऊन असें म्हणतां येईल कीं,

अहो हा ज्ञानेश्वरू भोला।
ले वागीशांच्या कुसुममाला।
परि माझेया दूर्वादला। ना न म्हणे॥



'ज्ञानेश्वर चरित्र आणि ज्ञानेश्वरी चर्चा'

व

'श्री सार्थ ज्ञानेश्वरी अध्याय सातवा'

या पुस्तकांवर—

## —: कांही अभिप्राय :—

---

[ 'पुष्पांजलि', 'शाकुंतल सौंदर्य', 'केशवसुत व त्यांची कविता', 'वीरधर्मदर्पण', 'बिल्वदल', 'होळकरांचा फटका', इत्यादींचे कर्ते, मध्यभारतांतील वयोवृध्द साहित्यिक, श्री. न. शं. रहाळकर यांचा अभिप्राय ]

होळकर कॉलेजांतिल मराठी विभागाचे प्रमुख प्राध्यापक श्रीयुत शं. गो. वाळिंबे यांच्या 'ज्ञानेश्वर चरित्र आणि ज्ञानेश्वरी चर्चा' चीं मुद्रितें वाचलीं. ज्ञानेश्वरांच्या उपासकास आणि ज्ञानेश्वरीच्या अभ्यासकास हें पुस्तक अत्यंत उपयुक्त सिद्ध होईल. पूर्वग्रहनिरपेक्ष दृष्टीने केलेली ज्ञानेश्वरीची येथील चिकित्सा तर्कशुद्ध वाटते. ज्ञानेश्वरींतील अध्यात्माचें सुसंगत विवेचन आणि काव्यविषयक मूलगामी चर्चा यांवरून लेखकाचा व्यासंग आणि त्या त्या शास्त्रांचा सूक्ष्म अभ्यास व्यक्त होतो. कांहीं ठिकाणी दिलेली माहिती नवीन असून लेखकाने संशोधनपूर्वक प्राप्त केली आहे. ज्ञानेश्वर आणि मराठी भाषा', 'आता वंदू कवीश्वर', 'या लागिं नवरसीं वरिखैन मीं', 'कमळ पत्रांच्या ताटांत चंद्राच्या अमृत किरणांचें जेवण', 'महाकवीच्या प्रतिभेचा साक्षात्कार' इत्यादि

प्रकरणें मला फारच आवडलीं. लेखकाची मोहक वाग्शैली तेथे बहरून आल्यासारखी वाटते. लेखकाने कोणतेंही विधान निराधार केलेलें नाहीं, व निष्कर्ष काढतांना संदिग्धतेची पळवाटही अनुसरलेली नाही. विवेचन जितके ठसठशीत तितकीच शैली आकर्षक आहे. प्रा. वाळिंबे यांच्या सारख्या तरूण लेखकाची दृष्टि ज्ञानेश्वरींतील अध्यात्मकाव्यगंधाकडे वळूं लागणें हें राष्ट्राच्या उत्थानाचें मी एक सुचिन्ह समजतों. प्रा. वाळिंबे यांच्याकडून असें भरीव लेखन अधिकाधिक होवो अशी इच्छा आहे.

शंकरभुवन,
२२ शीख मोहल्ला इंदूर.

नरहर शंकर रहाळकर.
२४-२-१९५१.

× × ×

[ 'मराठी साहित्य समालोचन', 'सामाजिक वाद', 'आईबापांस चार शब्द' आदि पुस्तकांचे लेखक, मध्यभारतांतील ज्येष्ठ साहित्यिक श्री. वि. सी. सरवटे यांचा अभिप्राय ]

"आपण या ग्रंथासाठी घेतलेले परिश्रम व केलेला व्यासङ्ग आपणांस भूषणास्पद आहे. श्री ज्ञानेश्वररायासंबंधाची सर्व माहिती, त्या दिशेने झालेल्या अद्यावत् संशोधनासह, आपण या ग्रंथांत ग्रथित केली आहे ती अभ्यासकांस फार उपयुक्त होईल. विशेषतः ज्ञानेश्वरीच्या भाषेसंबंधात संकलित केलेले विवेचन ज्ञानेश्वरीच्या मार्मिक आकलनासही उपकारक व्हावें. आपली लेखनशैली रसाळ आणि भावनायुक्त असल्याने, सामान्य वाचकांसही वाचतांना आनंद होतो. ज्ञानेश्वरीतले तत्त्वज्ञान व काव्य यांची चर्चा सुबोध व सरस झाली आहे. प्रि.

दांडेकरांसारख्या अधिकारसंपन्न विद्वानाची प्रस्तावना ग्रंथाला लाभल्याने त्याला साहजिक एक प्रकारची मान्यता आली आहे. ”

नवी दिल्ली, १७-३-'५१ वि. सी. सरवटे

× × ×

[ नीति आणि कलोपासना', 'फुलांची भेट', 'वर्तमानकाळ', 'पावित्र्यविडंबनाचा वाद', 'गीतातत्त्वदर्शन' आदि पुस्तकांचे लेखक, मध्यभारतांतील प्रसिद्ध साहित्यिक प्रा. ग. वा कवीश्वर यांचा अभिप्राय']

प्रा शं. गो. वाळिंबे यांचा 'ज्ञानेश्वर चरित्र आणि ज्ञानेश्वरी चर्चा' हा प्रबंध त्यांच्या व्यासंगाचा व अभ्यासू वृत्तीचा द्योतक आहे. वटवृक्षाच्या एका पारंबींतून दुसरी सहज फुटावी, तद्वत् ज्ञानेश्वरीच्या सातव्या अध्यायाचें सांगोपांग संपादन करीत असतां, प्रा. वाळिंबे यांच्या मूलगामी विवेचनवृत्तीनें त्यांना या पुस्तकांतील महत्त्वाच्या विषयाकडे आकृष्ट केलें; आणि ज्या परिश्रमाने त्यांनीं तें संपादन केलें त्याच परिश्रमानें याही विषयाचा व्यापक अभ्यास करून त्यांनीं हें कार्य देखील पार पाडलें आहे. प्रस्तुत विवेचनांत सर्वत्र लेखकाची नम्रतेची भूमिका आढळून येईल; पण प्रा. वाळिंबे यांची ही नम्रता त्यांच्या सत्यान्वेषण कार्याच्या आड मात्र आलेली नाहीं. या दृष्टीनें त्यांनी ज्ञानेश्वरी रचनाकालासंबंधी प्रा. न. र. फाटक यांच्या मतावर केलेली निर्भीड व विस्तृत टीका पाहण्यासारखी आहे. प्रा. वाळिंबे यांचे कांही शब्दप्रयोग विशेषच मार्मिक व ठसकेदार आहेत; उदाहरणार्थ पाहाः “ संग्रामसक्त योगविद्या आत्मविद्येला नुसती शरण गेली नाहीं तर पुढे तिच्याशी एकरूप झाली. संग्रामेच्छेची परिणति संगमांत झाली ” (पृ. ७२ );

" ज्ञानेश्वरांच्या तीर्थयात्रा या पर्यायानें मराठी भाषेच्या तीर्थयात्रा ठरल्या" (८३) " ज्ञानेश्वरींतील अलंकारसृष्टि म्हणजे ज्ञानेश्वरकालीन महाराष्ट्राचा 'सुलभ विश्वकोश' होय" (२२१) इ. इ. ज्ञानेश्वरीच्या इतरहि अध्यायांचें संपादन करण्याचा त्यांचा मानस आहे. तेंहि कार्य ते इतक्याच कसोशीनें पार पाडतील यांत शंका नाहीं. मात्र प्रा वाळिंबे यांचीं पुढील प्रकाशनें मुद्रणवेषाच्या बाबतींत अधिक नेटकीं राहतील अशी आशा आहे. पुस्तकाची द्वितियावृत्ति काढतांना या दृष्टीनें योग्य व्यवस्था झाल्यास त्यांच्या दीर्घोद्योगाचें व साहित्यसेवेचें अधिक चीज होऊं शकेल अशी खात्री वाटते.

होळकर कॉलेज इंदूर.

ता. २७-१-५१ (प्रा.) ग. त्र्यं. कवीश्वर

× × ×

[ माळव्यांतील प्रथितयश राजकवि, 'वाग्वसंत', 'भावपूर्णा', 'ओळखीचे सूर', 'गीतनिर्वाण' चे लेखक श्री. रा. अ. काळेले म्हणतात—]

...वाचलीं. ज्ञानेश्वरीचें रसग्रहण रसिकाला साजेशा सहृदयतेने आणि अभ्यासकास स्वाभाविक अशा विचक्षण चिकित्सेने लेखकाने केलें आहे. थोडक्यांत पुष्कळ सांगणारी लेखकाची शैली अभिनंदनीय आहे.'

ग्वाल्हेर, दि. २-१ १९५१ रा. अ. काळेले.

× × ×

[ वारकरी संप्रदायाचा इतिहास, 'श्रीज्ञानदेव' चे लेखक, 'प्रसाद' चे संपादक व अध्यात्मशास्त्राचे अधिकारी पुरुष, प्रिन्सिपाल शं. वा. दांडेकर म्हणतात—]

'ज्ञानेश्वर चरित्र आणि ज्ञानेश्वरी चर्चा' हा प्रा. बाळिंबे यांचा प्रबंध म्हणजे श्री. ज्ञानेश्वर व ज्ञानेश्वरी यांच्या अभ्यासकास एक उत्कृष्ट मार्गदर्शिका आहे. या निबंधाचे सांगता येण्यासारखे... विशेष...

(१) प्रा. बाळिंबे यांनी ज्ञानदेव व ज्ञानदेवी या विषयांवरील अद्ययावत् उपलब्ध असलेले इंग्रजी, मराठी वाङ्मय अभ्यासण्याचे... या दोहोविषयीं कालपर्यंत काय म्हटलें गेले आहे याविषयीं अभ्यासूला विनासायास माहिती मिळण्याची सोय...

(२) यांनी हे ज्ञानदेवी वाङ्मय व त्यावरील ग्रंथ निपुणपणाने पाहिले आहेत व त्या अभ्यासाने मिळविलेल्या माहितीचा उपयोग वेगवेगळ्या विषयांची चर्चा करतांना कुसरीने ···

(३) चर्चा करित असतांना व विषयाच्या दोन्ही बाजू मांडतांना शक्य तोंवर आपला समतोलपणा न सोडण्याचा प्रयत्न केला आहे, व तो प्रयत्न चांगला साधला आहे असे म्हणण्यास बिलकुल हरकत नाहीं. एखाद दुसरा आळंदीच्या ब्रह्मवृंदासबंधींच्या वर्णनासारखा .. प्रसंग सोडल्यास चर्चेची भाषासुध्दा विषयाच्या चर्चेस साजेशीच आहे ··

(४) जरी यांत प्रकरणें नाहींत तरी यांत शीर्षकें दिली आहेत व ती चर्चे विषयास अनुरूप, वाचकांची मनोभूमिका विषयग्रहण करण्यांत आगाऊ तयार करून ठेवणारी व आकर्षक अशीं आहेत...

(५) पांचवा विशेष म्हणजे संपूर्ण निबंधाची भाषा ठसठशीत व चटकदार आहे. व विवेचन असंदिग्ध आहे...'

(प्रि.) शं. वा. दांडेकर.

'पदवी परीक्षेसाठी मराठीच्या अभ्यासक्रमांत ज्ञानेश्वरीच्या सातव्या अध्यायाचा समावेश विश्वविद्यालयाने केला आहे. त्या अध्यायावर सुबोध, विवेचनात्मक टीका असणें अत्यंत आवश्यक होतें. ती उणीव प्राध्यापक वाळिंबे यांनी .. लिहिलेल्या श्री सार्थ ज्ञानेश्वरी अध्याय सातवा ह्या पुस्तकाने भरून काढली आहे... अभ्यासपूर्णतेने... विवेचन .. इत्यादि.

—हो. का. पत्रिका, प्रकाशन ३५

× × ×

"आपलें पुस्तक भाविक, अभ्यासक व विद्यार्थी यांना अत्यंत उपयुक्त होईल. आपलें विवरण तुलनात्मक अभ्यासाचें व दीर्घ परिश्रमाचें द्योतक आहे. अशाच पद्धतीने ज्ञानेश्वरीच्या इतर अध्यायांचेंही आपण संपादन केलें तर महाराष्ट्र वाङ्मयास ललामभूत अशा या ग्रंथराजाच्या चिकित्सक अभ्यासास मोठेंच साहाय्य होऊं शकेल; व विद्यापीठांनाही त्याचा अभ्यासक्रमांत समावेश करणें सुलभ वाटेल."

दिनांक १२-११-५०

× × ×

'...यांच्या नवीन ग्रंथाचे नांव 'ज्ञानेश्वर चरित्र आणि ज्ञानेश्वरी चर्चा' ...यापूर्वीच्या त्यांच्या टीका-टीपात्मक ग्रंथांतून ( श्री सार्थ ज्ञानेश्वरी अ. ७ मधून ) प्राचीन संतवाणीविषयक त्यांची डोळस भक्ति आणि तर्कशुद्ध विचारसरणी यांची ओळख वाचकांना पटली आहेच. ...चरित्राचे आपल्या सुगम शैलीने...मुख्य भाग ज्ञानेश्वरींतील काव्याची चर्चा, आणि तींतील अध्यात्मतत्त्वांचे अभिनव दर्शन...पुस्तकाचें स्वरूप प्रबंधात्मक असून परिच्छेदांचे मथळे अन्वर्थक आकर्षक किंवा सूचक घालावयाची दक्षता लेखकाने घेतली आहे.

उदाहरणार्थ 'चांगदेवाचा हॅम्लेट झाला', 'निर्वंश होउनि ठरेल अखंड वंश', 'ज्ञानेश्वरीचें बारसें कोणी केलें', 'आतां वंदू कवीश्वर', 'महाकवीच्या प्रतिभेचा साक्षात्कार', 'सूर्यश्लेषाचें कांटाळें', 'कमलपत्रांच्या ताटांत चंद्राच्या अमृतकिरणाचें जेवण' ...इत्यादि प्रकरणें पाहावींत. एकंदर विवेचन सुलभ आणि आकर्षक शैलीचें आहे. प्रा. न. र. फाटक, प्रा. मा. दा. आळतेकर, आचार्य विनोबा भावे, कै. साने गुरुजी इत्यादि विद्वज्जनांवर लेखकाने केलेली टीका विनम्र वृत्तीने केली असून अनाग्रही पध्दतीने त्याने काढलेले निर्णय तर्कशुद्ध वाटतात 'या लागिं नवरसीं वरिखैन मी', 'उत्तर हिंदुस्थानांतील लाजिरवाणी स्थिति', 'ज्ञानेश्वरांची थोरवी' इत्यादि प्रकरणें लेखकाच्या ओघवत्या शैलीची साक्ष देतील ..'

हो. का. पत्रिका प्रकाशन २६

× × ×

[ 'शांतिस्वरूप', 'All for your Delight', 'The Death of Adolf Hitler', 'पंधरा अगस्त' चे कर्ते प्रा. द. म. बोरगांवकर लिहितात—]

प्राध्यापक शं. गो. वाळिंबे यांचीं 'ज्ञानेश्वर चरित्र आणि ज्ञानेश्वरी रुचीं' व 'श्री सार्थ ज्ञानेश्वरी अ. ७' हीं दोन्हीं पुस्तकें वाचलीं. अभ्यासू वृत्तीने लिहिलेल्या या पुस्तकांचें स्वागत विद्वानांच्या कडून अवश्य केलें जाईल अशी मला खात्री वाटते. यांत केलेलीं विधानें सर्व दृष्टींनी समतोल विचार करून मगच केलेलीं दिसतात. प्रा. वाळिंबे यांची भाषाशैली अत्यंत प्रसन्न आणि ओघवती आहे. अशा उपयुक्त लेखनाबद्दल लेखकाचें मी अभिनंदन करतों.

( प्रा. ) द. म. बोरगांवकर

× × ×

[ हिन्दू कोड बिलावर वे. शा. सं. विनायकशास्त्री टिल्लू यांच्या सहकार्याने समालोचनात्मक भाष्य लिहिणारे प्राध्यापक य. रं. विप्रदास, यांचा अभिप्राय—]

...त्यांच्या लेखनांत...श्री ज्ञानेश्वर महाराज आणि त्यांच्यासारख्या इतर पूजनीय व श्रेष्ठ व्यक्तींविषयीं पूर्ण आदरभाव, त्यांच्या ग्रंथांवर कांही विद्वानांनीं घेतलेल्या निरानिराळ्या आक्षेपांचें समतोल बुद्धीने केलेलें समर्पक खंडन, अनेक ग्रंथांचें अवलोकन आणि ज्ञानेश्वरांच्या वाणींत व विचारांत रंगून जाऊन केलेलें विवेचन...ठळक विशेष आहेत ..

दिनांक, १-३-१९५१ (प्रा.) य. रं. विप्रदास

× × ×

[ 'मुक्तेश्वर सभापर्व', 'वृत्तें आणि अलंकार', आदि पुस्तकांचे संपादक आणि 'पहांट वारा', 'साहित्य दर्शन' आदि पुस्तकांचे लेखक प्राध्यापक वि. म. कुळकर्णी, लिहितात:—]

"...तुमचे दोन शब्द ठसठशीत आहेत...विवेचनाची परिच्छेद पद्धति नवीन व चांगली वाटली. सर्वच विद्यापीठांतील विद्यार्थ्यांना हें पुस्तक उपयुक्त ठरेल यांत शंका नाही. ज्ञानेश्वरीचा अभ्यास बहुतेक सर्व प्रौढ विद्यार्थ्यांना कोठे ना कोठे करावा लागतोच. त्यांच्या बुद्धीस 'खाजें' पुरविणारें व विचारशक्तीला पुढची वाट दाखविणारें तुमचें पुस्तक आहे असें माझें मत आहे..."

ता. ३-३-५१ (प्रा) वि. म. कुळकर्णी (सोलापूर)